# शिक्षण-
## त्याचे उद्देश
आणि
## ते सिद्धीस नेण्याचीं साधनें.

[ गृहशिक्षणासह. ]

प्रोफेसर काल्डरवूड यांच्या मूळ इंग्रजी
पुस्तकावरून म्याक्मिलन आणि कंपनी
यांच्या परवानगीनें भाषांतररूपानें
**विष्णु वासुदेव नाटेकर,**
असिस्टंट मास्तर, ट्रेनिंग कॉलेज पुणें,
यांनीं केलें.

आवृत्ति दुसरी.

पुणें येथें " इंदिरा " छापखान्यांत छापिलें.





सन १९०८.

किंमत १। रुपया.

५४८२९

हें पुस्तक **विष्णु वासुदेव नाटेकर** यांनीं **पुणें** येथें **त्र्यंबक हरि आवटे** यांच्या **इंदिरा** छाप-खान्यांत छापवून **पुणें** पेठ नारायण, घर नंबर ३८१, येथें प्रसिद्ध केलें.

**DEDICATED**

BY

PERMISSION

TO

THE HON'BLE E. GILES, M. A.,

THE LATE

*Director of Public Instruction,*

Bombay Presidency.

मुंबई इलाख्याचे

माजी

डायरेक्टर ऑफ् पब्लिक इन्स्ट्रक्शन

नामदार ई. जाइल्स, एम्. ए.,

ह्यांस

त्यांच्या परवानगीनें

हें पुस्तक

अर्पण केलें आहे.

# अभिप्राय.

( Opinions. )

—:0:—

" I have gone very critically through your Marathi adaptation of Calderwood's '*On Teaching*', and I am very glad to inform you that your *attempt* to render it into Marathi *is eminently successful*. The book is expected to be very useful in Training Institutions as a supplement to Professor Kathawate's adaptation of Fowler's Discipline, now prescribed for the 1st and 2nd Year students. You have tried to make it appear an *original work in Marathi*, and in so doing you have succeeded very well. I, therefore, strongly recommend it for use in Training College, and it is hoped that the book will receives the support it so richly deserves, both at the hands of the Department and teachers in general. "

( Signed ) M. S. Apte, B. A.,
Hd: Master, Training School,
Dhulia.

---

" आपल्या ' **शिक्षण**—त्याचे उद्देश व ते सिद्धीस नेण्याचीं साधनें ' या पुस्तकाचीं कांहीं पृष्ठें आपण मजकडे पाठविलीं तीं वाचून पाहिलीं. मूळ पुस्तक फार चांगलें आहे. त्यांतील विषय शिक्षकाचा धंदा करूं इच्छिणारांस तर फार उपयोगाचा आहेच; पण माझ्या मतें

ज्यांचा ज्यांचा मुलांच्या संवर्धनाशीं संबंध आहे अशा सर्वांसच त्यापासून फायदा झाल्यावांचून राहणार नाहीं. काल्डरवूड यांच्या लेखांतील सर्व आशय आपल्या भाषान्तरांत उतरला आहे; व तें आपल्या इतर ग्रंथांप्रमाणेंच **सुबोध** व **संग्रहणीय** झालें आहे. हल्लीं **पुणें** व **धुळें** येथील **शिक्षक-शाळांत** शिकणारांनीं व त्यांतून नुकतेच बाहेर पडून धंद्यास लागलेल्या शिक्षकांनीं हें पुस्तक वाचल्यास त्यांस फायदा होईल, अशी माझी खात्री आहे. आपण जोडिलेल्या **विषयक्रमामुळें** या पुस्तकाची उपयुक्तता बरीच वाढली आहे.

अशीं पुस्तकें झाल्यानें आमच्या जुन्या शिक्षकवर्गांत पुस्तकें वाचून शिक्षक बनतां येणार नाहीं, अशी जी कल्पना आहे ती बऱ्याच अंशीं दूर होईल. आणि खऱ्या शिक्षकाचीं कर्तव्यें कोणतीं, त्याच्या आंगीं कोणते गुण लागतात व त्यांपैकीं किती गुण पुस्तकांच्या अध्ययनानें येऊं शकतील, हें त्यांच्या लक्षांत येईल. या व अशा पुस्तकांपासून आणखी एक फायदा असा होणारा आहे कीं, शिक्षकाच्या धंद्याच्या बाहेरील लोकांस, शिक्षकाच्या धंद्याचें महत्त्व व त्यांत मनापासून पडणाऱ्या मनुष्यापासून आईबापांस होणारी मदत कळून येईल; आणि त्या योगें या दोघांतील परस्पर प्रेमभाव व दळणवळण वाढून दोघांचेंही हित होईल. ”

(सही) G. N. Khare, B. A.,
डेप्युटि एज्युकेशनल इन्स्पेक्टर, **पुणें**.

---

“ मी आपली काल्डरवूड साहेबांच्या ‘On Teaching

–its Ends & Means' या पुस्तकाच्या भाषांतराची हस्तलिखित प्रत समग्र वाचून व मूळ ग्रंथाशीं ताडून पाहिली. आपलें **भाषांतर** एकंदरींत **चांगलें** व **बरोबर झालें आहे.** आपण मधून मधून इकडील शाळांस लागू पडण्यासारख्या **टिपेंत सूचना केल्या आहेत, त्याही महत्त्वाच्या आहेत** आपण नवीन घातलेल्या '**विषयानुक्रम**' ह्या भागांत ग्रंथांतील महत्त्वाचे मुद्दे सारांशरूपानें दिले आहेत, त्यांवरून ग्रंथाचें महत्त्व सहज कळून येतें. शिक्षणासंबंधीं फार उदात्त विचार ह्या पुस्तकांत आहेत, व शिक्षकाचें काम किती जबाबदारीचें व महत्त्वाचें आहे, हें ह्या पुस्तकांत फार चांगल्या रीतीनें सांगितलें आहे. '**शिक्षण**' **ह्या विषयावर मराठी भाषेंत ग्रंथ फार थोडे आहेत;** ह्मणून विशेषेंकरून मराठी शिक्षक लोकांस व ट्रेनिंग कॉलेजांतील विद्यार्थ्यांस तुमच्या भाषांतराचा फार उपयोग होईल."

(सही) **रामचंद्र गोविंद आपटे, बी. ए.,**
डेप्युटि एज्युकेशनल इन्स्पेक्टर, **ठाणें.**

---

"वि. वि. * * * आम्हा शिक्षक लोकांना अशा पुस्तकाची फार जरुरी आहे. शिक्षकांना साह्य होण्याकरितां लिहिलेलें पुस्तक, व त्यांतून तें मराठी शाळेवरील एका अनुभविक शिक्षकानें लिहिलेलें पाहून तर मला मोठाच अभिमान वाटत आहे. आपण सर्व मराठी मास्तरांना उत्तम कित्ता दाखविला, ह्याबद्दल उपकार आह्मीं मानावे तितके थोडेच आहेत. आपल्या पुस्तकाची **भाषा सोपी व सरळ आहे, तें भाषांतर आहे, असें मुळींच**

**वाटत नाहीं.** प्रत्येक शिक्षकानें आपलें पुस्तक वाचावें एवढेंच नाहीं तर त्यांचीं पारायणें करावीं; असें मला वाटतें. पुस्तक तयार होतांच एक प्रत व्ही. पी. नें मजकडे पाठवावी. ”

( सही ) **सदाशिव लक्ष्मण असगेकर,**
हेड **मास्तर, मॉडेल स्कूल** असोदें ( **खानदेश.** )

---

“ वि.वि. * * * उत्तम शिक्षक होण्याची व आपले विद्यार्थ्यांस उत्तम ‘ नागरिक ’ बनविण्याची ज्यांची सदिच्छा असेल व ज्यांस शिक्षकाचा धंदा मनापासून आवडत असेल अशा मराठी शाळांवरील शिक्षकांस, तसेंच **मुलांच्या शिक्षणाची कळकळ बाळगणारे व ज्यांस इंग्रजी येत नाहीं अशा पालकांस** आणि शिक्षकाचा धंदा शिकणारे ट्रेनिंग कालेजांतील विद्यार्थी यांस **आपलें पुस्तक अत्यंत उपयोगी आहे.** इंग्रजींत शिक्षणविषयक उत्तम पुस्तकें शेकडों आहेत; परंतु त्यांपैकीं हाताच्या बोटांवर मोजण्याइतकीं देखील मराठींत भाषांतररूपानें आलेलीं नाहींत. **मे. डायरेक्टर** सा. बहादूर इलाखा **मुंबई** यांनीं हायस्कुलांतील उपशिक्षकांच्या परीक्षेस नेमलेल्या पुस्तकांपैकीं एका उत्तम **पुस्तकाचा** लाभ आपण सर्व मराठी मास्तरांस करून दिला, ह्याबद्दल मी मनापासून आपलें अभिनंदन करितों. सर्व मराठी मास्तरांनीं आपलें पुस्तक संग्रहास ठेवून त्याप्रमाणें आपलें वर्तन ठेवावें, अशी त्यांस आग्रहपूर्वक विनंति आहे. ”

( सही ) **जनार्दन बाळकृष्ण उपासनी,**
**हे. मा. शा. नं. १, धुळें.**

# प्रस्तावना.



मराठी भाषेंत उपयुक्त पुस्तकांचा भरणा फार कमी अशाविषयीं अलीकडे बरीच कुरकूर ऐकूं येते. मुंबई युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमांत देशी भाषांचा समावेश करण्याविषयीं सूचना अनेक वेळां नामंजूर झाल्या, त्याही मुख्यत्वें अशाच सबबीवर झाल्या. आतां ह्या कुरकुरींत तथ्यांश किती आहे, हें ठरविणें थोडेसें वादग्रस्त आहे. मराठी भाषेंत अलीकडे कित्येक वर्षें होत असलेल्या ग्रंथवृद्धीसंबंधानें परलोकवासी न्यायमूर्ति रानडे यांनीं कांहीं दिवसांपूर्वीं मुंबईच्या टाइम्स नामक प्रसिद्ध वर्तमानपत्रांत कित्येक महत्त्वाचे निबंध प्रसिद्ध केले आहेत; त्यांवरून आपल्या भाषेंत ग्रंथांचा भरणा बऱ्याच समाधानकारक रीतीनें होत आहे, असें दिसून येतें. तथापि ह्या भाषेचा उत्कर्ष इच्छिणारांनीं एवढ्यावरच तृप्त न राहतां स्वतः ग्रंथ लिहिण्याचा व इतरांनीं अशा प्रकारें प्रयत्न केल्यास त्यांस योग्य उत्तेजन देण्याचा क्रम नेहमीं सुरू ठेवणें इष्ट आहे.

आतां मराठींत ग्रंथसमुदाय असावा तितका आहे किंवा नाहीं हा प्रश्न एकीकडे ठेविला तरी शिक्षकाच्या धंद्यासंबंधीं पुस्तकें फार कमी आहेत, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. पुणें ट्रेनिंग कॉलेजांत "शिक्षण आणि अध्यापन" नांवाचें पुस्तक शिकविण्यांत येतें; तेंच मराठींतील ह्या विषयावरील महत्त्वाचें पुस्तक आहे असें मला वाटतें. अलीकडे कोल्हापूर येथेंही ह्या विषयावर एक

पुस्तक प्रसिद्ध झालेलें आहे. तथापि ह्या विषयासंबंधानें मराठींत दोन चार पुस्तकांहून जास्त भरणा असेल, असें वाटत नाहीं. हा विचार मनांत येऊन आपल्या व्यवसाय-बंधूंना थोडा बहुत उपयोग व्हावा अशा हेतूनें हा अ-ल्प प्रयत्न केला आहे.

हायस्कूल, मिड्लस्कूल वगैरे शाळांतील शिक्षकांसाठीं अलीकडे सरकारानें एक परीक्षा ठरविली असून त्या परीक्षेसाठीं शिक्षणविषयक तीन पुस्तकें नेमिलीं आहेत. त्यांतील एका पुस्तकावरून* भाषांतररूपानें हें पुस्तक लिहिलें आहे. सदर्हू पुस्तकांत ह्या विषयाचा विचार सामान्य दृष्टीनें केलेला आहे. ह्मणजे हें विवेचन हाय-स्कुलांतील किंवा प्राथमिक शाळांतील शिक्षकांस सारखेंच उपयुक्त होणारें आहे. किंबहुना प्राथमिक शाळांतील शि-क्षकांना हें विशेष लागू पडणारें आहे, असें मला वाटतें. कारण लहान मुलांस तीं शाळेंत येऊं लागल्यापासून शि-क्षकानें कसकसें वागविलें पाहिजे, ह्याचें ह्यांत उत्तम प्रति-पादन केलें आहे. अर्थात् हायस्कुलांतून जाणारीं मुलें प्रथमतः प्राथमिक शाळांतच तयार होणारीं असल्यामुळें प्राथमिक शाळांतील शिक्षकांस शिक्षण-विषयक मूल-तत्त्वें अवगत असणें हितावह व अवश्य आहे. मूळ पु-स्तकाच्या प्रस्तावनेंतही, हें पुस्तक आपण प्राथमिक शा-ळांतील शिक्षकांसाठींच लिहिलें आहे, असें काल्डरवूड साहेबांनीं स्पष्टपणें ह्मटलें आहे.

---

*" *On Teaching*: its Ends and Means." with a chapter on *Home Training*.

हें पुस्तक मूळ इंग्रजी पुस्तकावरून भाषांतररूपानें केलें आहे; तथापि हें शब्दशः भाषांतर नाहीं. शुद्ध मराठी वाचकांस अर्थबोध सुलभ रीतीनें व स्पष्टपणें व्हावा ह्मणून वाक्यरचना थोडी विस्तृत केली आहे; व इतर कित्येक फेरफार केले आहेत. प्रयत्न कितपत साध्य झाला आहे, हें ठरविणें वाचकांकडे आहे.

सामान्यत्वें हें पुस्तक शिक्षकवर्गाकरितां आहे खरें; तथापि **ह्याचें महत्त्व मुलांच्या पालकांस कमी आहे असें नाहीं. गृहशिक्षण** ह्मणून जें शेवटचें प्रकरण आहे तें तर त्यांनाच अनुलक्षून आहे. **काल्डरवूड** साहेबांच्या तिसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेचा भाग पुढें दिला आहे; त्यावरून हें प्रकरण ह्या पुस्तकांत सामील करण्याचा उद्देश ध्यानीं येईल. तेव्हां मुलांच्या आईबापांनीं ह्या पुस्तकाचें अवलोकन व मनन केल्यास तेणेंकरून मुलांस घरीं वागविण्याच्या पद्धतींत बरीच सुधारणा होण्याचा संभव आहे; व अशा रीतीनें योग्य गृहशिक्षण मिळालेलीं मुलें शाळेंत येऊं लागल्यास शिक्षक, विद्यार्थी आणि त्यांचे पालक ह्या त्रिवर्गांचेंही त्यांत हित आहे.

**धुळें. १।६।१९०१.** **वि. वा. नाटेकर.**

हेड मास्तर, प्रॅक्टिसिंग स्कूल.

## ह्या पुस्तकाच्या दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.

पहिल्या आवृत्तींत शुद्धलेखनासंबंधीं क्वचित् राहिलेले दोष ह्या आवृत्तींतून काढून टाकिले आहेत; इतर कांहीं फेरफार केला नाहीं.

**पुणें, १।४।०८.** **वि. वा. नाटेकर.**

असि.मास्तर, ट्रेनिंग कॉलेज.

# मूळ पुस्तकाच्या तिसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.

--:०:--

हें लहान पुस्तक प्रथमतः मुख्यत्वें शिक्षकाच्या धंद्यांत पडलेल्या लोकांसाठींच केलें होतें. तथापि आपल्या मुलांच्या शिक्षणाची काळजी वाहणारीं आईबापें ह्यांतील विवेचन वरचेवर वाचितात, असें मला आढळून आलें; ह्मणून शाळेंतील शिक्षणाशीं ज्यांचा विशेष संबंध पोहोंचतो, अशा **गृहशिक्षणा**संबंधीं विशेष महत्त्वाच्या गोष्टींचा समावेश ह्या आवृत्तीमध्यें करण्याचा प्रयत्न केला आहे. मला अशी उमेद आहे कीं, **गृहशिक्षणा**संबंधानें जें प्रकरण हल्लीं सामील केलें आहे, त्यामुळें आईबापांस थोडीबहुत मदत होऊन **शिक्षक** आणि **आईबाप** ह्या उभयतांमध्यें अधिक सलोख्याचें दळणवळणही राहूं लागेल; आणि अशा रीतीनें हें पुस्तक विशेष उपयुक्त होईल.

२९-८-१८८१.

( सही ) **हेन्री काल्डरवूड.**

# विषयानुक्रम.

# प्रत्येक प्रकरणांतील विशेष महत्त्वाचे मुद्दे.

## उपोद्घात.



## प्रकरण १ लें.

---

## प्रकरण २ रें.

## प्रकरण ३ रें.

---

## प्रकरण ४ थें.

## प्रकरण ५ वें.



---

## प्रकरण ६ वें.

# शिक्षण—

## त्याचे उद्देश आणि ते सिद्धीस नेण्याचीं साधनें.

### उपोद्घात.

शिक्षणाच्या धंद्यास केवळ विद्वत्ता पुरी पडत नाहीं.

मनुष्याच्या अंगीं कांहीं विवक्षित ज्ञान असलें म्हणजे तो शिक्षकाच्या धंद्यास पात्र होतो, अशी सर्व लोकांची समजूत आहे. ह्यामुळें **शिक्षण** म्हणजे मुलांस केवळ ज्ञानप्राप्ति करून देणें, असें लोकांचें मत होण्याचा संभव आहे. हें मत बरोबर आहे किंवा चुकीचें आहे, ह्याविषयीं अधिक विचार करणें अवश्य आहे. वास्तविक पाहतां **शिक्षण** ह्मणजे मुलांस केवळ ज्ञान करून देणें एवढेंच नव्हे; तर त्यांचे स्वभाव सुधारून त्यांना सन्मार्गास लावण्याचाही त्यांत समावेश होतो. लोकांत विद्येचें पाऊल दिवसेंदिवस पुढें पडत जाऊन दरसाल अधिकाधिक विद्यार्थी मोठमोठ्या परीक्षांत पास होऊं लागले; तरी **शिक्षण** शब्दाचा वर दर्शविल्याप्रमाणें व्यापक अर्थ लोकांच्या ध्यानांत येण्याचा फारसा संभव नसून कोता अर्थच दृढ होण्याचा संभव आहे. देशांत विद्याप्रसार व्हावा म्हणून सरकार शाळाखातें सुरू करून त्याची व्यवस्था ठरवितें, व ती व्यवस्था उत्तम प्रकारें अमलांत आणण्यासाठीं उत्कृष्ट उपाय योजितें,

तेव्हां **शिक्षण** शब्दाचा जितका व्यापक अर्थ घेणें इष्ट आहे, तितका सरकारास घेतां येत नाहीं; हें खरें आहे. कारण ह्या शब्दाच्या व्यापक अर्थाप्रमाणें शिक्षण द्यावयाचें असें ठरविलें असतां तसें शिक्षण शाळांतून उत्तम रीतीनें दिलें जात आहे किंवा नाहीं, ह्याची परीक्षा पाहण्याचीं साधनें उपलब्ध नसतात. ह्मणून ज्या शिक्षणाची परीक्षा पाहण्याचीं साधनें उपलब्ध असतील, तितकाच **शिक्षण** शब्दाचा अर्थ शाळाखात्याची व्यवस्था ठरवितांना सरकार धरितें.. ह्यावरून असें ध्यानांत येईल कीं, शाळांतून शिक्षण खरोखर कोणत्या प्रकारें चाललें आहे, ह्याचें खरें अनुमान हल्लींच्या परीक्षांवरून होत नाहीं. तथापि सार्वजनिक शिक्षणासाठीं उपाय योजावयाचे, तेव्हां सरकारास मुख्यत्वें ह्या परीक्षांवरच अवलंबून रहावें लागतें. ह्यामुळें एकादा तरुण मनुष्य शिक्षकाच्या धंद्यांत शिरण्याची इच्छा धरून ह्या धंद्यास अवश्य ती तयारी करूं लागतो, तेव्हां प्रारंभींच त्याची अनेक कारणांनीं अशी समजूत होते कीं, आपण अधिकाधिक ज्ञान संपादन करून तें आपल्या विद्यार्थ्यांसही करून देत गेलों, ह्मणजे ह्या धंद्यांत आपणास विशेष यश येत जाईल. शिक्षकाच्या धंद्यास पात्र होण्यासाठीं कांहीं विशेष प्रकारचा अभ्यास ट्रेनिंग कॉलेजांतून करावा लागतो; व त्यामुळेंही असाच समज होतो. ह्या धंद्यासाठीं ठरविलेला अभ्यासक्रम, त्या ठरीव परीक्षा, त्यांत पास होण्यास लागणारे गुण, व त्या गुणांच्या मानानें मिळणारे पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या प्रतीचे दाखले ( सर्टिफिकिटें ); ह्या सर्वांवरून असाच ग्रह दृढ होण्याचा संभव

आहे कीं, शिक्षण देणें ह्मणजे केवळ कांहीं विषयांचें ज्ञान मुलांस करून देणें होय. ह्यावरून वरील गोष्टींची अवश्यकता नाहीं असें मात्र कोणीं समजूं नये; त्या तर पाहिजेतच. परंतु शिक्षकाच्या धंद्यास लायक असल्या-बद्दलचें सर्टिफिकीट एकाद्याला मिळालें, ह्मणजे त्याला ह्या धंद्यास अवश्य तितकें ज्ञान आलें, व तो उत्तम प्रकार-चा शिक्षक बनलाच, अशी जी लोकांची समजूत आहे, ती चुकीची होय.

ह्मणून हा धंदा करण्यास आपण लायक आहों अशा अर्थाचें सर्टिफिकीट एकदां मिळविलें ह्मणजे आपलें कर्तव्य संपलें, अशी आपली कोती समजूत शिक्षकांनीं कधींही होऊं देऊं नये. तसेंच ह्या धंद्यास आरंभ केल्यावर आपल्या अंगच्या मानसिक व नैतिक उन्नतीची वाढही खुंटूं देऊं नये. ह्या धंद्याची योग्यता सामान्यतः लोक मानितात त्याहून अधिक आहे; व ही योग्यता कायम राख-ण्यासाठीं सर्व शिक्षकांनीं एकमतानें झटलें पाहिजे. त्यांनीं असें कां करावें ह्याला अनेक महत्त्वाचीं कारणें आहेत; त्यांचा उल्लेख पुढील प्रकरणांतून ठिकठिकाणीं होईल. ह्या धंद्यासंबंधानें वर दर्शविल्याप्रमाणें कोती समजूत शिक्षकांनीं होऊं दिली असतां फार नुकसान होईल; ही गोष्ट स्काटलंदांतील बऱ्याच शिक्षकांच्या[१]

१ आपल्या देशांतील प्राथमिक शिक्षण देणाऱ्या शिक्षकांना ह्या गोष्टीकडे विशेष लक्ष पुरविणें अवश्य आहे. स्काटलंदांतील व येथील वस्तुस्थितींत महदंतर आहे खरें. तथापि आपल्या शिक्षणा-चे सुपरिणाम व्हावे, अशी इच्छा आपल्या शिक्षकांनीं बाळगून त्या धोरणानें काम करणें इष्ट आहे. ( भा. क. )

ध्यानांत आली असून अशी समजूत न होऊं देण्याविषयीं खबरदारी घेण्यासही ते उत्सुक आहेत; ही आनंदाची गोष्ट आहे.

विद्वत्ता व शिकविण्याची शैली हीं भिन्न आहेत.

आतां **शिक्षण** शब्दाचा अर्थ, कांहीं विवक्षित ज्ञान मुलांस करून देणें इतका संकुचित मानिला तरी देखील शिक्षकाच्या आंगीं केवळ अवश्य तितकें ज्ञान असलें ह्मणजे त्याला मुलांस शिकवितां येईल, असें मानितां येत नाहीं. व्याकरण, भाषा, इतिहास, भूगोल, इत्यादि विषयांचें ज्ञान एकाद्यास असलें म्हणजे तो उत्तम शिक्षक बनतो, असा कांहीं अर्थ नाहीं. एकाद्या विषयाचें ज्ञान आंगीं असणें, आणि तें इतरांस करून देण्याचें सामर्थ्य आंगीं असणें, ह्या दोन गोष्टी अगदीं भिन्न आहेत. शिक्षकाच्या धंद्यांत पडणारा मनुष्य शाळेंत शिकत असतो तेव्हां सुद्धां त्याच्या नजरेस हा फरक वारंवार आलेला असतो. सारांश, अति विद्वान् मनुष्य अति उत्तम शिक्षक असतोच, असा कांहीं नियम नाहीं. ह्या धंद्यांत शिरूं इच्छिणाऱ्या इसमानें ही गोष्ट ध्यानांत ठेवणें अवश्य आहे. विद्यार्थीदशेनंतर एकाद्याला शिक्षकाची जागा मिळून त्याच्या ताब्यांत एकादा वर्ग आला म्हणजे दिवसेंदिवस त्याच्या अनुभवास येतें कीं, आपल्या आंगीं असलेली विद्वत्ता आपल्या धंद्यास पुरी पडत नाहीं; तर आणखीही बऱ्याच गोष्टी लागतात. हा धंदा प्रत्यक्ष सुरू केल्यावर त्याला अनेक गोष्टींचें ज्ञान अनुभवानें होत जातें; व हें ज्ञान त्यानें दिलेल्या लेखी परीक्षांनीं त्याला होण्यासारखें नसतें. इतकें

च नाहीं, तर हें ज्ञान न होण्यास कांहीं अंशीं ह्या लेखी परीक्षाच कारणीभूत झालेल्या असतात. शिक्षक आपला धंदा प्रत्यक्ष करूं लागला ह्मणजे नवीन नवीन गोष्टींची त्याला जरूर लागते. म्हणून प्रत्येकानें आपण स्वतःच आपला शिक्षक बनावें; व ह्या नवीन गोष्टींचें ज्ञान धंद्यांत पडल्यावर प्रत्यक्ष अनुभवानें स्वतः मिळवावें. ह्या धंद्यांत त्याला कधीं ठेंचा लागतील, व कधीं थोडेंबहुत यश येईल. तेव्हां ह्या दोन्ही प्रकारच्या अनुभवांवरून शहाणें होऊन त्यानें आपल्या धंद्यांत अधिकाधिक नांवलौकिक मिळवावा. सारांश, ह्या धंद्याचें शिक्षण अशा रीतीनें प्रत्यक्ष अनुभवानेंच मिळणारें आहे, अशी प्रत्येकानें आपली प्रारंभीं खातरी करून घ्यावी.

शिक्षकाच्या धंद्याला केवळ पुस्तकी ज्ञान पुरें पडत नाहीं. त्याहून बरेंच निराळ्या प्रकारचेंही ज्ञान लागतें. पुस्तकी ज्ञानानें त्याच्या माहितींत पुष्कळ भर पडून त्याची स्वतःची अधिक सुधारणा होईल खरी. तथापि त्याहूनही विशेष आवश्यक असें कांहीं ज्ञान त्याच्या आंगीं असलें पाहिजे; व तें आंगीं येण्यास एकच मार्ग आहे. तो हा कीं, आपल्यामध्यें कोणते दोष आहेत, व आपल्या हातून कोणत्या चुका घडतात, इत्यादि गोष्टी प्रत्यक्ष शिक्षण देत असतां त्यानें लक्षपूर्वक पहाव्या; व अनुभवानें ते दोष सुधारून तशा चुका न होऊं देण्याचा प्रयत्न करावा. एकदां एका शिक्षकाविषयीं विचारपूस करीत असतां डा० आर्नोल्ड नामक प्रख्यात शिक्षकांनीं काढिलेले उद्गार मोठ्या महत्त्वाचे

ह्या धंद्यास केवळ पुस्तकी ज्ञान पुरें पडत नाहीं.

आहेत. ते असे:—" शिक्षक मोठा विद्वान् असण्यापेक्षां त्याच्या अंगीं मानसिक उद्योग व धंद्याची आवड असणें, हें मला अधिक महत्त्वाचें वाटतें. कारण विद्वत्ता संपादन करणें सोपें आहे; परंतु धंद्यांत पडल्यावर देखील मानसिक उद्योग सुरू ठेवणें व धंद्याची मनापासून आवड धरणें, हें फार कठीण आहे."

मुलांस ज्ञानप्राप्ति करून देणें एवढेंच कांहीं शिक्षकाचें कर्तव्य नाहीं.

शिवाय हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, आपल्या अंगचें ज्ञान मुलांस करून देणें, एवढाच कांहीं शिक्षणाचा हेतु नाहीं. नुसत्या ज्ञानप्राप्तीपेक्षां कांहीं अधिक फायदा शिक्षकापासून व्हावा, अशी लोकांची सामान्यतः समजूत असते. अगदीं प्रचारांतील उदाहरणावरून देखील ही समजूत स्पष्ट दिसून येते. कल्पना करू कीं, एकाद्या शाळेंतील विद्यार्थी उर्मट, बेपर्वा, व दंगेखोर निघाले; तर त्याचा दोष लोक कोणाच्या माथीं मारतील बरें ? अर्थात् त्या शाळेच्या. वडील माणसें मुलांस शाळेंत पाठवितात तें त्यांस लिहितां वाचतां यावें, एवढ्याच हेतूनें पाठवीत नाहींत; तर चांगल्या रितीभाती त्यांस लागाव्या, असाही त्यांचा हेतु असतो. ह्या संबंधानें जसजसा जास्त विचार करावा, तसतसें स्पष्टपणें दिसतें कीं, लोकांनीं अशा दोन हेतूंनीं मुलांस शाळेंत घालणें ह्यांत कांहीं त्यांचा दोष नाहीं. तथापि विद्यार्थ्यांच्या दोषास्पद वर्तनावरून शिक्षकाची योग्यता आपण कमी ठरवितों, तेव्हां आपणांकडूनही अनेक वेळां चूक घडते. शिवाय मुलांची सुधारणा शिक्षकांकडून किती व्हावी, ह्याबद्दल आईबापांची इच्छाही नेहमीं फाजील

असते. वस्तुतः गृहशिक्षण हें सर्व शिक्षणाचा पाया आहे. म्हणून मुलांस हें शिक्षण घरीं ज्या मानानें मिळालें असेल, त्या मानानें शाळेंतील शिक्षणाचा ठसा त्यांच्या मनावर कमजास्त उमटेल; हें साहजिक आहे. ह्या गृहशिक्षणाची न्यूनता शाळेंत तेव्हांच दिसून येते. गृहशिक्षण मुळींच दिलें नाहीं, अथवा तें अयोग्य प्रकारें दिलें, तर मुलांमध्यें एक प्रकारची न्यूनता उत्पन्न होते. ही न्यूनता केवळ शाळेंतील शिक्षणानें भरून काढितां यईल, असें मानणें वेडेपणाचें होय. तथापि मुलांस गृहशिक्षण न मिळाल्यामुळें शाळेंतील शिक्षणावर जे अनिष्ट परिणाम घडतात, ते न घडूं देण्यासाठीं शिक्षकांनीं हरएक प्रयत्न योजिले पाहिजेत. अशा प्रसंगीं शिक्षकांवर वाजवीपेक्षां फाजील ओझें पडतें, हें निर्विवाद आहे. परंतु ह्या धंद्यांत वेळोवेळीं अनेक अडचणी येणार आहेत हें समजून उमजून हा धंदा एकदां पतकरिला, म्हणजे विद्यार्थ्यांच्या वर्तनावर व स्वभावांवर नजर ठेवणेंही शिक्षकाला भाग आहे.

सामान्य शिक्षण व नीतिशिक्षण ह्यांची सांगड आहे.

सारांश, मुलांस सामान्य शिक्षण देत असतां त्यांच्या वर्तनावरही शिक्षकानें देखरेख ठेवावी; म्हणजे मुलांच्या पालकांचें व पर्यायानें सर्व राष्ट्राचेंही त्यानें हित केल्याप्रमाणें होईल. समाजांतील अगदीं कनिष्ठ प्रतीच्या लोकांत तर तें काम सर्वस्वीं शिक्षकासच करावें लागतें. देशांतील शाळाखात्याच्या व्यवस्थेचा आपण विचार करूं लागलों म्हणजे मुलांस अशा प्रकारें योग्य रीतीनें शिक्षण देऊन तयार करणेंच अवश्य आहे,

असें ठरतें. आतां मुलेंबाळें हीं आईबापांकरितां नसून सर्व देशाच्या हिताकरितां आहेत; म्हणून त्यांस गृह-शिक्षण वगैरे न देतां लहानपणापासूनच सरकारच्या हवालीं करावें, व सरकारानें त्यांच्या सर्व शिक्षणाची व्यवस्था लावावी; असें प्लेटो ह्या प्राचीन तत्त्ववेत्त्याचें मत होतें. परंतु सुधारलेल्या १९ व्या शतकांत लोकांस हें मत मान्य होईनासें झालें, हें ठीकच आहे. प्रत्येक कुटुंबांतील सर्व माणसांनीं नीतिमार्गानें चालणें, हाच सर्व देशाच्या भरभराटीचा मजबूत पाया आहे; असें हल्लीं सर्वांचें मत आहे. ह्या मताप्रमाणें मुलांस लहानपणीं गृह-शिक्षण देणें अवश्य ठरतें. तथापि देशांतील सर्व मुलांस लहाणपणींच सरकारच्या स्वाधीन करून त्यांच्या शिक्षणाची वगैरे व्यवस्था सरकारावरच सोंपवावी; व त्या मुलांकडून मोठेपणीं देशसेवा करवावी; असा साक्रेटीस व प्लेटो यांचा जो हेतु असे, तोही स्तुत्य होता, हें विसरतां कामा नये. सारांश, प्रत्येक मनुष्याचा वर्तनक्रम निर्दोष असेल, तरच त्याच्या जन्माचें सार्थक्य आहे; हें मूलतत्त्व वरील विवेचनावरून व्यक्त होतें. धर्मशास्त्रांतूनही ह्याच तत्त्वाला अनुसरून वागण्याविषयीं लोकांस उपदेश केलेला असतो. ह्यावरून उघड ठरतें कीं, सद्वर्तनाची योग्यता फार मोठी आहे. म्हणून सन्मार्गानें वागण्यांत कितीही अडचणी आल्या तरी धैर्य धरून त्या सर्व दूर केल्या पाहिजेत; व तो मार्ग सोडण्याविषयीं कितीही मोह पडला तरी त्यास जुमानितां कामा नये; असा उपदेश शिक्षकानें तरुण विद्यार्थ्यांस नेहमीं करावा; म्हणजे त्यानें आपल्या शिरावरील महत्त्वाचें काम बजाविल्याप्रमाणें होईल.

सक्तीनें प्राथमिक शिक्षण देण्याच्या पद्धतीवरून सुचणारा एक विचार.

स्काटलंदांत अलीकडे मुलांस सक्तीनें शिक्षण देण्याची पद्धति सुरू झाली आहे, हें समाधानकारक आहे. तेथील मुलांस अशा प्रकारें प्राथमिक शिक्षण सक्तीनें देण्याचें काम सरकारानें आपल्या हातीं घेतलें आहे; व असें करण्यांत सरकारचा कांहीं विशिष्ट हेतु आहे. तो पुढील विवेचनावरून ध्यानीं येईल. कोणत्याही देशांत कित्येक मुत्सद्दी असतात; व कित्येक सार्वजनिक हितार्थ झटणारे असतात. हे लोक कोणतीही सुधारणा करूं लागले म्हणजे अनेक अडथळे येऊन त्यांना हात टेकावे लागतात. हे अडथळे येण्याचें मुख्य कारण देशांतील बहुतेक लोकांस सुशिक्षण मिळालेलें नसतें, हेंच होय. असें शिक्षण लोकांस मिळावें, ह्मणून सरकारानें हें सक्तीनें शिक्षण देण्याची सुरवात केली आहे. हा हेतु फार महत्त्वाचा आहे. स्काटलंदांतील लोकांमध्यें दुराचाराचा व दुर्व्यसनांचा उत्तरोत्तर फैलाव होत चालला; तेव्हां त्याचा प्रतिकार करण्यासाठीं सरकारास कांहीं उपाय योजणें अवश्य झालें. तसा प्रतिकार करण्यास सर्वोत्कृष्ट उपाय म्हटला ह्मणजे त्यांना सक्तीनें शिक्षण देणें हाच होय; असें समजून सरकारानें हें काम हातीं घेतलें आहे. आतां नुसतें चांगलें लिहितां वाचतां येऊन हिशेब वगैरे करितां आले ह्मणजे माणसाची प्रवृत्ति दुराचरणाकडे मुळींच होणार नाहीं, अशी विचारी मनुष्यांची समजूत नाहीं. त्यांना असें वाटतें कीं, सामान्यशिक्षणाबरोबर शाळांतून मुलांस उत्कृष्ट नीतिशिक्षणही मिळावें; ह्मणजेच मुलांची प्रवृत्ति कुमार्गाकडे होणार नाहीं. तसेंच शिक्षकाचें मुख्य कर्तव्य

सामान्यशिक्षण मुलांस देण्याचें असलें तरी त्याच्या अंगभूत कित्येक*कर्तव्यें आहेत, व त्यांपैकींच त्यांस नीतिशिक्षण देणें, हें एक आहे ह्मणून मुलांस शाळांतून नीतिशिक्षण मिळणार नाहीं, तर सक्तीनें प्राथमिक शिक्षण देण्यांत सरकारचे जे महत्त्वाचे हेतु आहेत, ते साध्य होणार नाहींत. सक्तीनें शिक्षण देण्याची पद्धति सुरू करण्यापासून सरकारास फार त्रास पडणार असून खर्चही पुष्कळ करावा लागणार आहे. म्हणून नीतिशिक्षण देण्याचा हेतु साध्य न झाल्यास हा सर्व खटाटोप व्यर्थ होईल. ही पद्धति सुरू केल्यानें शिक्षकाच्या धंद्याला अधिक महत्त्व येतें; कारण ह्यामुळें नीतिशिक्षणाचेंही काम त्याजकडे येतें. परंतु हें काम फार जबाबदारीचें आहे, हें शिक्षकांनीं विसरूं नये. देशांतील शाळांतून मिळणाऱ्या शिक्षणाचा सुपरिणाम कितपत घडत आहे हें पहावयाचें असल्यास, देशाचें पाऊल नीतिमार्गांत दिवसेंदिवस किती पुढें पडत आहे, तें पहावें म्हणजे झालें. मुलांस शाळेंत पाठवावयाचें तें त्यांना नुसतें घोकींव ज्ञान व्हावें, एवढ्यासाठींच केवळ नव्हे; तर त्यांच्या बुद्धीचा विकास होत जावा, व चांगल्या सवयी त्यांच्या आंगीं खिळत जाव्या, असाही उद्देश असतो. कारण मुलें मोठीं होऊन

---

* ह्या प्राथमिक शिक्षणासंबंधानें जर्मन लोकांचे विचार पुढील उताऱ्यांत थोडक्यांत चांगल्या रीतीनें दर्शविलेले आहेतः—" प्राथमिक शिक्षण देण्याचा हेतु इतकाच आहे कीं, त्याच्या योगानें मुलांची मानसिकशक्ति, सद्सद्विचारशक्ति, इंद्रियशक्ति, आणि शरीरशक्ति ह्यांची वाढ होत जावी."

तीं पुढें संसार करूं लागलीं म्हणजे त्यांना ह्या गोष्टींचीच वारंवार जरूर लागते. इतिहासभूगोलाची किंवा व्याकरण-भूमितीची फारशी जरूर लागत नाहीं.

स्काटलंदांतील लोकांत हरएक धंद्यासंबंधानें विलक्षण चढाओढ हल्लीं सुरू आहे; ह्या चढाओढीमुळें एकमेकांचे नफानुकसानीचे प्रसंग येत आहेत; शेंकडो लोक गर्दीगर्दीनें एकत्र राहिले असून अनेक प्रकारच्या उलाढाली करण्याची त्यांना मोठी हौस आहे. सारांश, तेथील सांप्रतची सुधारणा अशा प्रकारची आहे! ह्या सुधारणेचें मुख्य व्यंग म्हटलें म्हणजे नीतिदृष्ट्या लोकांची उत्तरोत्तर होत चाललेली शोचनीय स्थिति हेंच होय. तेथील लहानसहान गल्ल्यांतून चोऱ्या, मारामाऱ्या वगैरे अनीतीचे प्रकार नजरेस येतात. तेथील दाट वस्तीच्या घरांतून मानवी प्राण्यांची अति शोचनीय स्थिति दृष्टीस पडते. तथापि हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, त्यांची दारिद्र्यामुळें अशी स्थिति झालेली नसते; तर दुर्व्यसनामुळेंच बहुधा झालेली असते. हीं घरें ह्मणजे विपत्तीचीं माहेरघरेंच होत; व शेंकडो मुलांना " गृहसुख " ह्मणून जें असावयाचें तें तेथें अशा प्रकारचेंच असतें. जीं गृहसुखें आपणांस अति अमूल्य वाटतात, त्यांचा त्या अर्भकांना गंधही नसतो. जन्मास आल्यापासून त्यांना उत्तरोत्तर अधिकाधिक विपत्तींत दिवस काढावे लागतात; व ही स्थिति त्यांच्या अंगवळणी पडत जाते. सुख मिळण्याचे व अब्रूस चढण्याचे प्रसंग त्यांना फारसे येत नाहींत. तेव्हां अशा मुलांना मोठ्या चातुर्यानें व ममतेनें शिक्षण देऊन स्वतःची स्थिति सुधारण्याची संधि शिक्ष-

कांनीं आणून द्यावी; एवढ्याच उद्देशानें सरकारानें तेथें सक्तीचें शिक्षण सुरू केलें आहे. असें शिक्षण त्यांस दिलें नाहीं तर ही संधी त्यांस कधींही मिळावयाची नाहीं. तेथील मोठमोठ्या शहरांतील मुलांची ही हकिकत झाली. लहानसहान गांवांतील लोकांच्या मुलांसाठीं ज्या प्राथमिक शिक्षणाच्या शाळा तेथें आहेत, त्यांची स्थिति बरीच समाधानकारक आहे. तथापि सक्तीच्या शिक्षणाची सुरवात झाल्यामुळें ह्या शाळांतूनही मुलांची संख्या वाढेल, व तेणेंकरून ह्यांचा उपयोग अधिक लोकांस होऊं लागेल. तसेंच ह्या पद्धतीमुळें ह्या शाळांतील शिक्षकांवरही नीतिशिक्षणासंबंधानें विशेष जबाबदारी पडून परिणामीं अधिक फायदा होईल. सारांश, लहानसहान गांवांतील मुलांसाठीं सक्तीच्या शिक्षणाची फारशी आवश्यकता स्काटलंदांत न्हती खरी. तथापि आईबापांच्या हेळसांडीनें व दुर्व्यसनांमुळें जीं मुलें बिघडतात त्यांच्यासाठीं ह्या शिक्षणाची आवश्यकता होती; ह्मणूनच ह्या शिक्षणाची सुरवात तेथें झाली आहे. ही व्यवस्था करण्यांत सरकारचा हेतु मोठा स्तुत्य आहे; व ती सुरू झाल्यानें तेथील मुलांचें फार कल्याण होणार आहे. इतकेंच नाहीं, तर सर्व समाजाचेंही परिणामीं ह्यांत हितच आहे. सारांश, मुलांच्या कल्याणाची आस्था बाळगणारे आईबाप, पालकांनीं हेळसांड केल्यामुळें ज्या मुलांची काळजी घेण्याचें काम स्कूलबोर्डाकडे आलें आहे त्यांतील सभासद, सरकारी व इतर सर्व प्रकारच्या शाळांतील शिक्षक आणि सामान्य लोक, ह्या सर्वांच्या हिताहिताचा संबंध ह्या सक्तीच्या शिक्षणाशीं आहे. म्हणून **शिक्षण** शब्दा-

च्या खऱ्या व्यापक अर्थाप्रमाणें प्राथमिक शाळांतून शिक्षण दिलें जाईल अशाविषयीं ह्या सर्वांनीं खबरदारी घेतली पाहिजे. तेथील स्कूलबोर्ड व शिक्षकवर्ग ह्या उभयतांत विचाराचें व *सलोख्याचें दळणवळण राहील, तरच अखेरीस ह्या व्यवस्थेपासून फायदा होईल. ह्यास्तव प्रथमपासून सर्व लोकांची अशी समजूत असली पाहिजे कीं, शाळांतून शिक्षण देणें तें केवळ लिहितां वाचतां येण्यापुरतें नव्हे; तर तेथ मुलांना नीतिशिक्षणही मिळालें पाहिजे. ज्या मुलांना गृहशिक्षण मुळींच मिळालें नसेल, अथवा अयोग्य प्रकारें मिळालें असेल, त्यांना शिकवून तयार करणें अवघड आहे खरें, तथापि हें काम शिक्षकाकडे सोंपविलें असतां त्यांत कांहीं अन्याय नाहीं. उलटपक्षीं शाळेंतील सर्व शिक्षणांत ह्याचा समावेश होतोच; व हें काम करण्याचें पूर्ण सामर्थ्य चांगल्या शिक्षकांच्या आंगीं असतें.

स्कूलबोर्डें व शिक्षक ह्यांमध्यें सलोख्याचें दळणवळण पाहिजे.

कित्येक अशी शंका घेतील कीं, सक्तीच्या शिक्षणामुळें शिक्षकांवर फाजील जबाबदारी पडते. परंतु तसें कांहीं, घडत नाहीं. गणित, इतिहास-भूगोल इत्यादि विषय चांगल्या रीतीनें शिकवितांना देखील मुलांच्या वर्तनावर शिक्षकाला नजर ठेवावी लाग-

नीतिशिक्षण देणें हा शिक्षकाच्या कर्तव्याचाच भाग आहे.

---

*आपल्याकडे म्युनिसिपालिटींतील शाळांची व्यवस्था मात्र स्कूल बोर्डांकडे गेलेली आहे; इतर सर्व शाळांची व्यवस्था शाळाखात्यांतील अधिकारीच पाहतात. त्यांजमध्यें आणि शिक्षकांमध्यें सलोख्याचें दळणवळण असणें अवश्य आहे, हेंही उघड आहे. (भा.क.)

ते. खरेपणा, प्रामाणिकपणा व स्वार्थत्याग ह्या गुणांची मनुष्यास व्यवहारांत पदोपदीं जरूर लागते. त्याचप्रमाणें शाळेंत मुलांस उत्तम शिस्त लागण्यास त्यांच्या आंगींही ह्या गुणांची आवश्यकता आहे. ह्मणून सदाचरणाचे सुपरिणाम व दुराचरणाचे दुष्परिणाम शिक्षकानें मुलांच्या नीट ध्यानांत आणून द्यावे, व तीं चांगलाच मार्ग स्वीकारतील असें करावें. नाहींतर मुलांस सन्मार्गास लावण्यास शिक्षकाला पदोपदीं छडीचा उपयोग करावा लागेल; व तेणेंकरून त्यास वारंवार फार त्रास होईल. शिक्षण उत्तम प्रकारें चालावें अशी इच्छा असेल तर मुलांचें पाऊल नीतिमार्गांत प्रतिदिवशीं पुढें पाडण्याबद्दल शिक्षकानें काळजी घेतली पाहिजे. आतां केवळ अधिकाराच्या जोरावर, किंवा खाऊची, नंबराची वगैरे लालूच दाखवून शिक्षक विद्यार्थ्यांस सदाचरणाच्या मार्गाल लावूं पाहील, तर तेणेंकरून नीतितत्त्वें मुलांच्या मनांत चांगल्या प्रकारें बिंबणार नाहींत. सदाचरणाची योग्यता ओळखूनच मुलांनीं तसें आचरण उत्कृष्ट आहे असें मानिलें पाहिजे. आणि तशा मार्गानें जाण्यांतच हित आहे असें समजून त्याप्रमाणें वागलें पाहिजे. असें न घडेल तर मुलांना शिक्षण देण्यासाठीं केलेले सर्व परिश्रम व्यर्थ होतील. विद्यार्थ्यांच्या अंतःकरणांत सद्वर्तनाचा पाया दृढ झालेला नसेल तर शिक्षणाच्या कामीं शिक्षकानें केलेले श्रम निरर्थक होतील; व तेणेंकरून विद्याप्रसारार्थ योजिलेल्या सर्व उपायांचा व्हावा तितका उपयोग होणार नाहीं. म्हणून मुलांच्या शिक्षणाला प्रारंभ झाल्याबरोबर त्यांना आत्मसंयमनाची सवय लावण्यासाठीं

शिक्षकानें पुष्कळ वेळ खर्च करावा; म्हणजे पुढें फार फायदा होईल. अशा प्रकारचें शिक्षण मुलांस देण्यासाठीं अति सुलभ असे उपाय त्यानें मोठ्या खुबीनें योजिले पाहिजेत. सारांश, हरएक उपायांनीं हें शिक्षण मुलांस दिलेंच पाहिजे. तसेंच त्यांस हें शिक्षण जों जों ल्हानपणीं देऊं, तों तों श्रम कमी पडतील; आणि ह्या शिक्षणाचा पाया शाळेमध्यें प्रारंभींच जितका मजबूत घालूं, तितका त्याचा प्रसार पुढें लवकर होईल. आतां विद्यार्थ्यांच्या वर्तनावर दाब ठेवण्याचा शिक्षकाला पूर्ण अधिकार आहे; व त्याचा अंमल त्यानें खालच्या वर्गांतून विशेष केला पाहिजे हें खरें. तथापि मुलें वरच्या वर्गांत गेलीं, तरी देखील ह्या संबंधानें शिक्षकानें थोडीबहुत नजर त्यांजवर ठेविली पाहिजे. विद्यार्थी जसजसे प्रौढ होत जातील, तसतसे ते शाळेंत केवळ ज्ञानप्राप्तीकरितांच येतात, असें शिक्षकानें मानण्यास हरकत नाहीं; तसेंच अशा प्रौढ विद्यार्थ्यांची सामान्य शिक्षणांत जशी बरीच गति झालेली असते, तशी नीतिशिक्षणांतही झालेली असते, असें मानण्यासही हरकत नाहीं. तथापि त्यांची देखील शिक्षकानें स्पष्ट समजूत करून दिली पाहिजे कीं, सद्वर्तनाची योग्यता आपण फार मानितों, व विद्यार्थी सदाचरणी आहेत असें समजूनच त्यांस आपण इतर विषय शिकवितों. जे शिक्षक ह्याप्रमाणें करणार नाहींत, त्यांनीं आपल्या विद्यार्थ्यांच्या कल्याणार्थ अवश्य तितके परिश्रम केले नाहींत, असें होईल.

हें वरील सर्व विवेचन यथार्थ मानिलें तर शिक्षणाच्या कामीं उत्तम यश येण्यास

शिक्षक स्वतः नीति-

मान् असण्याची आवश्यकता.

शिक्षक स्वतः नीतिमान् असले पाहिजेत, हें निर्विवाद ठरतें. विहिरींत पाणी असेल, त्या मानानेंच पोहऱ्यांत येईल. म्हणून शिक्षक स्वतः जितका नीतिमान् असेल, त्या मानानेंच त्याचें वजन विद्यार्थ्यांवर राहील. तसेंच तो स्वतः नीतिदृष्ट्या उत्कृष्ट प्रकारचें आचरण ठेवण्याविषयीं झटेल, तरच तशा उत्कृष्ट रीतीनें वागण्याविषयीं विद्यार्थ्यांचें मनही त्याला वळवितां येईल. म्हणून ह्या धंद्यांत हटकून यश येण्यास ज्या गोष्टींची आवश्यकता आहे, त्या सर्वांत मुख्य गोष्ट म्हटली म्हणजे शिक्षक स्वतः अत्यंत नीतिमान् असणें, हीच होय.

---

# प्रकरण १ लें.

## आत्मसंयमन.

शिक्षकास मुख्य आवश्यक गुण आत्मसंयमन.

शिक्षणाच्या कामीं यश येण्यास मुख्य आवश्यक गोष्ट म्हटली म्हणजे शिक्षकाच्या आंगीं आत्मसंयमन करण्याची शक्ति असणें, हीच होय. वर्गांतील मुलें लहान लहान असलीं तरी देखील त्यांस ताब्यांत ठेवण्यास शिक्षकाला प्रथम स्वतःचें मन ताब्यांत ठेवितां आलें पाहिजे. एकाद्याच्या मनोवृत्ति त्याच्या ताब्यांत असतील, तरच त्याच्या उपदेशाचा फायदा इतरांस चांगल्या रीतीनें होईल. हा नियम सर्व धंद्यांतील लोकांस सारखा लागू पडतो. पहा, वैद्याच्या आंगीं आत्मसंयमन असेल, तरच त्याच्या चातुर्याचा व ज्ञानाचा पुरा फायदा रोग्यास मिळेल. वैद्य रागीट, तिरसट असेल तर तो रोग्याच्या आंगावर संतापेल, व त्याचें म्हणणेंही पुरतें ऐकून घेणार नाहीं. त्याच्या अशा वर्तनानें रोग्याचें मन उलट अधिक अस्वस्थ होईल. वक्त्यांनाही हाच नियम लागू आहे. ज्यांच्या आंगीं उत्कृष्ट वक्तृत्वशक्ति असेल त्यांची छाप श्रोत्यांवर तेव्हांच बसेल, हें खरें. तथापि एकाद्याच्या आंगीं ही शक्ति फारशी नाहीं; परंतु त्याच्या आंगीं आत्मसंयमन आहे; तर त्याचीही श्रोत्यांवर थोडीबहुत छाप बसल्याशिवाय राहणार नाहीं. उदाहरणार्थ, तुमचें भाषण श्रोत्यांस पसंत न पडून ते

गडबड करूं लागलें असतां तुम्ही रागावाल, तर त्यांची गडबड कमी न होतां उलट अधिक वाढेल. परंतु अशा प्रसंगीं तुम्ही आपलें मन आवरून धरून शांत वृत्तीनें त्यांची समजूत घालण्याचा प्रयत्न कराल, तर कार्यभाग होण्याचा बराच संभव आहे. ह्याचप्रमाणें शिक्षकाच्या पदवीस जो खरोखर पात्र होऊं इच्छितो, त्यानें आपल्या आंगीं आत्मसंयमन आणिलेंच पाहिजे; म्हणजे त्याला आपल्या विद्यार्थ्यांवर दाब ठेवितां येईल. इतर कोणत्याही गुणानें असा दाब त्याला ठेवितां येणार नाहीं. खुद्द आपल्या स्वतःच्या मुलाला शिकवावयाचें असलें तरी देखील आत्मसंयमन अवश्य आहे. आतां शिक्षकाला तर शाळेंत अनेक मुलांना शिकवावयाचें असतें; ह्मणून त्याच्या आंगीं आत्मसंयमन फारच असलें पाहिजे, हें उघड आहे.

मुलांच्या दृष्टीनें ह्या गुणाची आवश्यकता.

शिक्षकाच्या आंगीं आत्मसंयमनाची आवश्यकता किती आहे, ह्याचा विचार विद्यार्थ्यांची सर्व स्थिति ध्यानांत आणून आपण करावा; म्हणजे आणखी एक गोष्ट स्पष्टपणें ध्यानांत येईल. लहान मुलांचें अवलोकन फार सूक्ष्म असतें. ह्मणून आपल्या शिक्षकाच्या आंगीं आत्मसंयमन कितपत आहे, हें तीं तेव्हांच ताडितात. ह्मणून त्याच्या आंगीं आत्मसंयमन पूर्णपणें आहे अशी त्यांची खातरी झाल्यास मुलें त्याचे हुकूम बिनतक्रार पाळितात. परंतु ही शक्ति त्याच्या आंगीं नाहीं असें मुलांस आढळल्यास तीं त्याचे हुकूम पाळण्याची उडवाउडव करितात. मुलांना स्वतंत्रतेनें वागण्याची स्वभावतःच हौस असते; व खेळण्याची जराशी संधी सांपडली कीं, ती सा-

धण्यास तीं एका पायावर तयार असतात. म्हणून त्यांच्यावर छाप बसविण्यापुरतें सामर्थ्य शिक्षकाच्या आंगीं नसलें, अथवा ती छाप बसविण्यांत त्यानें किंचित् कसूर केली व त्यांवर चांगलीशी नजर ठेविली नाहीं तर मुलें आपलें काम तेव्हांच साधितात. सर्व मुलांचीच ह्याप्रमाणें साधारणतः खेळाकडे विशेष प्रवृत्ति असते. म्हणून इकडे दुर्लक्ष करून उपयोग नाहीं. ह्या धंद्यांत यश मिळावें अशी इच्छा असेल तर शिक्षकानें मुलांची ही प्रवृत्ति पक्की ध्यानांत ठेविली पाहिजे. आतां मुलांच्या ह्या प्रवृत्तीमुळें शिक्षकाला त्रास पडेल खरा; परंतु तो त्रास आहे असें त्यानें मानूं नये. उलट अशा प्रवृत्तीमुळें मुलांमध्यें जो एक प्रकारचा उल्हास उत्पन्न होत असतो, त्याबद्दल आनंद मानावा; आणि ह्या प्रवृत्तीचा उपयोग त्यांच्यावर दाब ठेवण्याचे कामीं करून घ्यावा. उदाहरणार्थ, वर्गांत बराच वेळ अभ्यास सुरू राहिल्यामुळें मुलांस कंटाळा येऊन तीं गडबड करूं लागतात. अशा वेळीं शिक्षकानें त्यांस दहा पांच मिनिटें खेळण्याची सवड द्यावी, ह्मणजे मुलांना मोठी मौज वाटून पुढील तासांत अभ्यासाकडे तीं चांगलें लक्ष देतील. मुलांची वृत्ति जात्याच चंचल असते. ह्यामुळें कांहीं तरी मौज उडविण्याची त्यांना हौस असते. ह्या हौसेचाही शाळेंतील शिक्षणाच्या कामीं मोठ्या गमतीनें उपयोग करून घेतां येतो. पहा, एकसारखे दोन तीन तास शिक्षणच सुरू ठेविलें तर तें फार कंटाळवाणें होतें. अशा वेळीं एकादें मूल बांकावरून घसरून खालीं पडलें, व त्याबरोबर सर्व मुलें एकदम थोडींशीं हंसलीं; तर त्यांना रागें भरूं नये. मात्र असे प्रकार वारंवार घ-

डणार नाहींत, अशी शिक्षकानें खबरदारी घ्यावी. सारांश, मुलांच्या आंगच्या ह्या स्वाभाविक वृत्ति ध्यानांत आणून त्यांच्या अनुरोधानेंच त्यांजवर दाब ठेविला पाहिजे. विशेष श्रम न पडतां मोठ्या युक्तीनें मुलांवर दाब ठेवण्याची शिक्षकाची इच्छा असेल, तर त्यानें आपली स्वतःची वृत्ति नेहमीं मुलांप्रमाणें उल्हासी ठेवावी; व कधींही चिरडीस जाऊं नये.

शिक्षकानें आपल्या अधिकाराचा उपयोग शाळेंत न्यायानें करावा. शिक्षक आपला अधिकार न्यायानें बजावितो, अशी विद्यार्थ्यांची खातरी झाली पाहिजे; व त्याचा हुकूम न्यायाचा असल्यामुळें तो मानिल्याशिवाय गत्यंतर नाहीं, असें त्यांना वाटलें पाहिजे. परंतु हा अधिकार न्यायानें चालवितां येण्यास शिक्षकाच्या आंगीं आत्मसंयमन असणें फार अवश्य आहे. त्याच्या मनोवृत्ति पूर्णपणें त्याच्या ताब्यांत नसल्या, तर शाळेंत उत्तम प्रकारची शिस्त ज्या पायावर उभारावयाची तो पाया तेव्हांच डळमळीत होईल; व हा अधिकार बजावण्यांत त्याजकडून वारंवार पक्षपात घडेल. तसेंच त्याच्या पक्षपातामुळें शाळेंतील शिस्त तेव्हांच बिघडून जाईल. शिक्षकाचें वर्तन अन्यायाचें असलें म्हणजे ही शिस्त जितकी लवकर बिघडते, तितकी इतर कोणत्याही कारणानें बिघडत नाहीं. शिक्षक आपणास अन्यायानें वागावितो, अशी मुलांची समजूत झाली ह्मणजे तीं त्याचा तिरस्कार करूं लागतात; व ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. शाळेंत चांगली शिस्त न

आपला अधिकार न्यायानें चालवितां येण्यास त्याला ह्या गुणाची आवश्यकता.

राहण्यास ही तिरस्कारबुद्धिच मुख्य कारण होय. आपण रास्त रीतीनें वागत आहों, अशी लोकांची समजूत असतां एकादा सरकारी अंमलदार त्यांस केवळ अधिकाराच्या जोरावर त्या मार्गापासून वळविण्याचा प्रयत्न करील, तर त्याचा परिणाम घातक होईल. हीच गोष्ट शाळेच्या व्यवस्थेलाही लागू आहे. शिक्षक आपणांस अन्यायानें वागवितो, अशी मुलांची समजूत झाल्यास शाळेंत चांगली शिस्त राहण्यास किती अडचणी येतात, त्यांची कल्पना सर्वांस सहज होण्यासारखी आहे. ह्या धंद्याचा थोडाबहुत अनुभव ज्यांस आला असेल, त्यांना कांहीं हें निराळें सांगावयास नको. शिक्षकाच्या अन्यायी वर्तनामुळें कित्येक विद्यार्थ्यांच्या मनांत त्याचा सूड उगविण्याचा विचार घोळत असतो; व त्यांना अभ्यासाचें महत्त्व मुळींच वाटत नाहीं; असें त्यांच्या वर्तनावरून स्पष्ट दिसूं लागतें. ह्याचा परिणाम असा होतो कीं, शिक्षक अगदीं गांगरून जाऊन चवताळतो; व पहिल्या नंबरापासून शेवटच्या नंबरापर्यंत सर्व मुलांना बांकावर उभें करितो. तसेंच, तुह्मांला घोडीवर चढवीन, चाबकानें फोडीन, इत्यादि प्रकारचे धाक घालूं लागतो; परंतु बोलण्याप्रमाणें प्रत्यक्ष कृति त्याच्या हातून घडत नाहीं. अखेरीस आपण कोठें आहों, काय करीत आहों, ह्याचें भान त्याला रागाच्या तडाक्यांत मुळींच रहात नाहीं, व तो कित्येकांस पटापट छड्या मारीत सुटतो. प्रथम तो आपली छडी टेबलावर नुसतीच आपटीत असतो. परंतु ह्यानंतर तिचा विद्यार्थ्यांवर प्रत्यक्ष प्रयोग होऊं लागतो. तोही इतक्या अविचारानें कीं, आपण ह्या तडाक्यांतून कसें सुटूं

ह्याची प्रत्येकास काळजी पडते. अशा प्रसंगीं विद्यार्थ्यांस शिक्षा होते, ती बहुधा अन्यायानें होते. सारांश, पुष्कळदां वड्याचें तेल वांग्यावर निघतें; व शिक्षकाच्या आंगीं मनोनिग्रह नसल्यामुळें त्याचा परिणाम ह्या बिचाऱ्यांस भोगावा लागतो. **प्रो० काल्डरवूड** यांच्या हातूनही एकदां अशी चूक झाली होती. ते ह्मणतातः—"त्या चुकीचें स्मरण झालें ह्मणजे मला अद्यापि फार वाईट वाटतें; व आपली चूक नवीन शिक्षकांस दाखवून द्यावी, अशी इच्छा उत्पन्न होते. माझा हेतु इतकाच आहे कीं, माझ्या उदाहरणावरून त्यांनीं जागें व्हावें. आत्मसंयमन आंगीं आणण्यास भगीरथ प्रयत्न करावे लागतात खरे; परंतु मोठमोठ्या माणसांच्या हातूनही आरंभीं आरंभीं चुका होतात, हें त्यांनीं ध्यानांत धरावें; व आपण एक दोन वेळां फसलों तरी नाउमेद न होतां प्रयत्न सुरू ठेवावा." आतां आत्मसंयमन हा गुण प्रयत्नानें आंगीं येण्यासारखा आहे खरा. तथापि आपल्या आंगाचा संताप केव्हांच होऊं द्यावयाचा नाहीं, इतकी शांतवृत्ति शिक्षकाला कधींच ठेवितां येणार नाहीं, परंतु आपला राग होईल तितका लवकर घालवून ही शांतवृत्ति आंगीं आणण्याची त्यानें खटपट केली पाहिजे. सर्व स्थिति नीट रीतीनें ध्यानांत आणून शिक्षकानें वर्गाचें काम चालविलें पाहिजे; परंतु तो शांत स्वभावाचा नसेल तर त्याला तसें काम चालवितां येणार नाहीं.

ह्याप्रमाणें आत्मसंयमन आंगीं आणण्यासाठीं परिश्रम करीत असतां शिक्षकाला थोडाबहुत त्रास पडावयाचाच, प्रत्यक्ष अनुभवानेंच हें शिक्षकाचा धंदा पतकरणारांनीं

शिक्षक धंद्यांत तरबेज होत जाईल.

ध्यानांत ठेविल पाहिजे; व हा त्रास कांहीं केल्या चुकावयाचा नाहीं असें समजून तो मुकाटयानें सोशिला पाहिजे. मात्र आपणास त्रास पडतो ह्मणून विद्यार्थ्यांस त्यानें त्रास देऊं नये. एकाद्याच्या आंगीं आत्मसंयमनाची सवय खिळलेली नसली, आणि त्याच्यावर अनेक मुलांचें वर्तन सुधारून त्यांस शिक्षण देण्याचें काम पडलें; तर त्याची फार तारांबळ उडेल. प्रारंभींच कोणालाही शाळा उत्तम रीतीनें चालवितां येणार नाहीं. मनुष्य कोणत्याही धंद्यांत पडो, अनुभवानेंच तो शहाणा होत जावयाचा; असा साधारण नियम आहे. ह्मणून शिक्षकाच्या धंद्यांत अनुभवानें सुधारणा होणार नाहीं, तर वरील नियमाला मोठा अपवाद येईल. हा अनुभव शिक्षकाला प्रत्यक्ष धंदा सुरू केल्यावर मिळावयाचा असतो; व तो शाळेंतच मिळवावयाचा. हा अनुभव फार थोडच्या काळांत मिळवावयाचा असेल, तर त्याला अति परिश्रम केले पाहिजेत; व तसे परिश्रम करितां येण्यास त्याच्या आंगीं दोन गुण असले पाहिजेत; एक अवलोकन व दुसरा धोरण. पुस्तकी अभ्यास कितीही केला तरी हा अनुभव मिळावयाचा नाहीं; मग तीं पुस्तकें कितीही अमूल्य असोत, व त्यांतील सूचना कितीही उपयुक्त असोत. ह्या धंद्यासंबंधीं पुस्तकांतील विवेचन वाचून त्याजवर पुष्कळ मनन केलें, तरी तेवढयानें शिक्षकाच्या धंद्यास लागणाऱ्या सर्व गोष्टी कधींही साध्य होणार नाहींत. तथापि पुढल्यास ठेंच मागला शहाणा; ह्या ह्मणीप्रमाणें इतरांच्या अनुभवापासून ज्ञान मिळविण्यास अशा रीतीनें मनन करणें अवश्य आहे, हें

विसरतां कामा नये. परंतु प्रत्यक्ष शिकवावें कसें, हें ज्याचें त्यानेंच अनुभव घेऊन शिकावें; जगांतील अगदीं खराब मुलें आपले वांट्यास आलीं आहेत, असें मानून वेळोवेळीं येणाऱ्या अडचणी दूर कराव्या; केव्हां यश, केव्हां अपयश आलें, तरी आपलें काम तसेंच नेटानें चालवावें; आपल्या ढोबळ चुका लक्षांत आणून तशा चुका पुन्हां न होऊं देण्याविषयीं जपावें; आणि केव्हां केव्हां यश येईल त्यामुळें मनाला हुरूप आणावा. सारांश, कोणत्याही धंद्यांत मनुष्य कांहीं एकदम तरबेज होत नाहीं, हें लक्षांत ठेवावें. एकादा वर्ग चालविण्यासाठीं शिक्षक उपाय योजील, ते जितके न्यायाचे, विचाराचे व ममतेचे असतील, त्या मानानें तो आपले धंद्यांत खरा तरबेज झाला आहे; असें समजावें. परंतु हे उपाय तो रागाच्या किंवा इतर मनोविकारांच्या आवेशांत योजील, अथवा केवळ अधिकाराच्या जोरावर योजील, तर धंद्यांत त्याची प्रगति मुळींच झाली नाहीं, असें ठरेल. ह्मणून ह्या सर्व गोष्टींचा फार लक्षपूर्वक विचार करून शिक्षकानें वर्गाच्या व्यवस्थेसाठीं उपाय योजावे. विद्यार्थ्यांस आपले उपाय पसंत पडतील किंवा नाहीं, इकडे त्यानें फारसें लक्ष देऊं नये; तर आपल्या धंद्यांत आपणास यश देण्यासारखे ते आहेत किंवा नाहींत; इकडे विशेष लक्ष द्यावें. आपणास अखेरीस मोठ्या पदवीस चढावयाचें आहे, असें शिक्षकानें नेहमीं लक्षांत बाळगावें, व त्या धोरणानें दिवसेंदिवस अधिक योग्यतेस चढण्याचा पक्का निश्चय करावा; म्हणजे त्याला आपलें काम करण्यास उत्तरोत्तर विशेष उमेद येईल. आरंभीं आरंभीं अनेक

वेळां अपयश आल्यामुळें त्याचें मन निरुत्साह होण्याचा संभव आहे; परंतु त्यानें धीर सोडितां कामा नये. तसेंच मुलांच्या वर्तनानें आपणास चीड आली असतां, त्याचा सूड त्यानें विद्यार्थ्यांवर काढूं नये. सारांश, हरएक प्रसंगीं त्यानें आपल्या बुद्धीचा व सदसद्विचारशक्तीचा चांगला उपयोग करावा; आणि आपल्या आंगचा राग व इतर मनोविकार, ह्यांवर पगडा बसविण्याकरितां त्यानें नवे नवे उपाय योजावे.

आत्मसंयमन आंगीं आणण्यास कित्येक अडचणी आहेत, त्या शिक्षकानें अवश्य ध्यानांत ठेवाव्या. कारण त्या अनिवार्य आहेत. उदाहरणार्थ, शाळेंतील गोंगाट अति शांत स्वभावाच्या शिक्षकांस अगदीं दुःसह आहे. परंतु तो बंद कसा होणार ? केव्हां केव्हां अशा कांहीं गोष्टी घडतात कीं, तेणेंकरून मनुष्यास रागच आला पाहिजे; न येईल तर तो एक चमत्कार समजावयाचा. शिक्षकाचा धंदा तर असा आहे कीं, त्याला राग येण्याचे प्रसंग पदोपदीं येतात. आपलें कर्तव्य योग्य रीतीनें बजावितां येण्यासाठीं त्यानें आपली वृत्ति शांत ठेवण्यास फार झटलें पाहिजे. एकादा कठीण विषय सुरू असेल तेव्हां मुलांनीं गडबड अगदीं करूं नये, अशी शिक्षकाची इच्छा असते; हें साहाजिक आहे. परंतु मुलें अगदीं हूं कीं चूं केल्याशिवाय कशीं राहणार ? त्यांनीं अगदीं गडबड करूं नये अशी इच्छा करणें म्हणजे ह्या धंद्यांत आपणास अडचणी मुळींच येऊं नयेत; उलट सर्व गोष्टी अनुकूल असाव्या, अशी इच्छा करणें होय. वर्गांत

आत्मसंयमनास प्रतिकूल गोष्टी—शाळेंतील गोंगाट.

एकाचें वाचन ऐकत असतां इतर वीस पंचवीस मुलांवर शिक्षकाला लक्ष ठेवावें लागतें;व कोणीं किंचित् गडबड केली तरी तिकडे कान द्यावा लागतो. मात्र हें सर्व कृत्य अभ्यासाच्या कामांत मुळींच व्यत्यय न येऊं देतां त्यानें केलें पाहिजे.

शिवाय हेंही ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, शिक्षकाला कमजास्त त्रास पडणें, हें वर्गांतील विद्यार्थ्यांच्या स्थितीवर अवलंबून आहे. ज्यांच्याकडून अगदीं त्रास पोहोंचणार नाहीं असे विद्यार्थी त्याला कधींच मिळावयाचे नाहींत. आतां शाळेंतील मुलांचे स्वभाव भिन्न भिन्न प्रकारचे असल्यामुळें त्या सर्वांस वागविण्यास शिक्षकास त्रास पडेल हें खरें. तथापि शाळेंत मुलांची संख्या जितकी जास्त असेल व त्या मुलांस गृहशिक्षण जितकें कमी मिळालेलें असेल, त्या मानानें शिक्षणाच्या कामीं अधिक त्रास पडतो. उदाहरणार्थ, एका वर्गांत तीस मुलें असून, त्यांना शाळेंत पुष्कळ दिवस उत्तम प्रकारचें वळण लागलें आहे अशी कल्पना केली; तर त्या वर्गाचा बंदोबस्त ठेवण्यास शिक्षकाच्या आंगीं फारसें आत्मसंयमन नको. परंतु शाळेंत मुलें व मुली मिळून दोन-तीनशेंपर्यंत असून त्यांस चांगलेंसें वळण लागलेलें नसेल; तर ती शाळा चालविण्यास त्याच्या आंगीं फारच आत्मसंयमन असलें पाहिजे. एवढी मोठी शाळा चालविण्यास शिक्षकाला विद्यार्थ्यांवर अधिक नजर ठेवावी लागेल; व मुलें भिन्न भिन्न स्वभावाचीं असल्यामुळें त्यांना ताब्यांत ठेवण्यास विशेष धोरणें राखावीं लागतील. शिवाय अशी शाळा चालवि-

वर्गांत मुलें फार असणें व त्यांस चांगलें गृहशिक्षण नसणें.

ण्यास मानसिक आणि शारीरिक श्रमही जास्त पडल्यामुळें शिक्षकाचा स्वभाव जास्त चिरडखोर होण्याचा संभव आहे. प्राथमिक शिक्षणाच्या शाळांतील शिक्षकांना वरिष्ठ प्रतीच्या शाळांतील शिक्षकांइतकीं विद्वत्ता नको खरी. तथापि मुलांस नीतिशिक्षण देऊन व उत्तम प्रकारची शिस्त लावून त्यांस ताब्यांत राखण्याचे कामीं प्राथमिक शाळांतील शिक्षकांना श्रम अधिक पडतात. सारांश, मोठमोठ्या मराठी शाळा चालविण्यास जी विलक्षण हुषारी लागते ती एक प्रकारची; आणि हायस्कुलें, कॉलेजें वगैरे चालविण्यास लागते ती एक प्रकारची. ही गोष्ट शाळाखात्यांतील अधिकाऱ्यांनीं शिक्षकांच्या नेमणुका करितांना ध्यानांत ठेविली पाहिजे. तसेंच आपणास कोणत्या प्रकारच्या शाळेंत शिक्षकाचें काम चांगलें साधेल ह्याचा विचार नौकरी पतकरण्यापूर्वीं ज्या त्या शिक्षकानें करणें अवश्य आहे. मराठी शाळांसाठीं काय, किंवा हायस्कुलें, कॉलेजें वगैरेसाठीं काय; चांगले हुशार शिक्षक पाहिजे असल्यास त्यांस पगारही जास्त दिले पाहिजेत. तसेंच मराठी शाळांतील शिक्षकांचे पगार ठरवितांना त्यांच्या आंगची विद्वत्ता लक्षांत घेऊन शिवाय त्यांना वर्गाचा बंदोबस्त कसा काय ठेवितां येतो, हेंही पाहिलें पाहिजे. कारण ही शक्ति त्यांच्या आंगीं नसेल तर त्यांची सर्व विद्वत्ता व्यर्थ आहे.

विद्यार्थ्यांच्या स्वभावांतील वैचित्र्य.

आतां एकाद्या शिक्षकाच्या विद्यार्थ्यांपैकीं कित्येकांच्या स्वभावांत कांहीं विशेष प्रकारचे दोष असतील तर ते घालविण्यास त्या शिक्षकाच्या

आंगीं विशेषच आत्मसंयमन असलें पाहिजे. अशा प्रकारचे थोडे बहुत विद्यार्थी प्रत्येक शिक्षकाच्या वर्गांत बहुधा असतातच. म्हणून ही गोष्ट बहुतेकांस लागू आहे. विद्यार्थ्यांच्या स्वभावांत अशा विशेष प्रकारचे दोष जितके अधिक असतील, तितका ते घालविण्यास शिक्षकाला त्रास अधिक पडेल. शाळेची व्यवस्था आणि आत्मसंयमन ह्यांचा परस्पर फार निकट संबंध आहे; हें ह्यावरून स्पष्ट होतें. सर्व विद्यार्थ्यांचा बंदोबस्त अगदीं एकाच धोरणावर ठेवितां येणार नाहीं. मूल फार कोंवळ्या मनाचें व सहज वळण्याजोगें असेल, तर शिक्षकानें त्याला विशेष ममतेनें वागविलें पाहिजे. ह्याप्रमाणें मुलांस त्यांच्या स्वभावाच्या अनुरोधानें कमजास्त सवलती देणें जर इष्ट आहे तर सर्वांस सरसकट एकाच पद्धतीनें वागवून उपयोग नाहीं. परंतु असें करावयाचें म्हणजे तर शिक्षकाच्या आंगीं अधिकच आत्मसंयमन असावें लागतें. वर्गांतील तऱ्हेवाईक मुलें ऐन अभ्यास सुरू असतां देखील आपआपल्या स्वभावानुसार खोड्या करण्यास कधीं चुकणार नाहींत. परंतु अशी एकादी खोडी कोणीं केली असतां शिक्षकानें उतावीळपणानें व तावडतोब त्याचा कांहीं तरी निकाल लावून उपयोग नाहीं. अशा प्रसंगीं फार विचारपूर्वक वागणें हेंच महत्त्वाचें आहे. उतावीळपणा केल्यास त्यांत फार नुकसान आहे. अशा भिन्न भिन्न स्वभावांच्या मुलांना अति न्यायानें व तारतम्यानें वागविण्याचे प्रसंग शिक्षकाला वरचेवर आले म्हणजे ह्या धंद्यांत तो अधिकाधिक निष्णात होत जाईल. एकाद्या शांत स्वभावाच्या मुलाला शिक्षण देऊन तयार कर-

ण्यास शिक्षकाला फारसें विचारानें वागावें लागणार नाहीं; परंतु तापट स्वभावाच्या मुलाला योग्य प्रकारें शिकविण्यास फारच काळजीपूर्वक वागावें लागेल. ज्या वर्गांतील मुलें शांत स्वभावाचीं आहेत अशा वर्गावर नुसती देखरेख ठेवितां आली, म्हणजे शिक्षकाच्या आंगीं अवश्य तें पाणी आहे असें ठरत नाहीं. परंतु हट्टी मुलांना ताब्यांत ठेवून त्यांच्या आंगीं आत्मसंयमन त्यांस आणितां येईल तर शिक्षक खरोखर हुषार ठरेल. ह्मणून कितीही भिन्न भिन्न स्वभावाचीं मुलें वर्गांत असलीं, तरी त्यांचें शिक्षण उत्तम प्रकारें चालण्यास शिक्षकाच्या आंगीं मुख्य आवश्यक गुण आत्मसंयमनच होय. वर्गांतील गरीब गरीब मुलांवर शिक्षकास छाप बसवितां आली; परंतु द्वाड मुलें त्याचें ऐकत नसलीं; तर त्याच्या आंगीं पुरें आत्मसंयमन आलें नाहीं, असें समजावें. आपण ह्या धंद्यांत किती निष्णात झालों आहों, हें पाहण्यासाठीं शिक्षकानें एकाद्या अति द्वाड मुलाला ताळ्यावर आणण्याची खटपट करावी. ह्या कामीं त्याला यश येईल तरच तो धंद्यांत प्रवीण झाला आहे, असें समजावें. अशा मुलाला वठणीवर आणण्यास शिक्षकाला अतोनात श्रम पडतील हें खरें; परंतु तेणेंकरून त्याचें सामर्थ्य फार वाढेल. त्याला ताळ्यावर आणण्यांत यश आलें असतां त्या एकाच मुलाचा फायदा होतो असें नाहीं; तर वर्गांतील सर्व मुलांचा होतो. कारण तेणेंकरून मुलें शिक्षकाचे हुकूम बिनतक्रार पाळूं लागतात; व त्याचें वजन पूर्वीपेक्षां फार वाढून अभ्यासाच्या कामांत व्यत्यय येईनासा होतो. यामुळें परिणामीं सर्वांचाच फायदा होतो. अति खराब मुलेंच अति चांगलीं;

असें म्हणण्यांतही कांहीं तथ्य आहे. कारण अशीं मुलें मोठेपणीं फार चांगलीं निपजतात, असा वारंवार अनुभव येतो. तेव्हां मुलें लहानपणीं त्रासदायक असलीं तरी शिक्षकानें त्यांची हयगय करूं नये. पहा, वैद्याकडे एकादा मरणोन्मुख रोगी आला तर चांगला वैद्य त्याचा कंटाळा करीत नाहीं. उलट त्याला बरें करण्यासाठीं तो जिवापाड श्रम घेतो; व तो बरा झाल्यास त्याला विशेष प्रकारचें समाधान वाटतें. तसेंच एकाद्या वकिलाकडे बिकट खटला आला असतां तो खटला वकील नाकारीत नाहीं; तर त्याची इत्थंभूत माहिती करून घेऊन आपल्या तर्फे अति महत्त्वाचे आधार तो न्यायाधीशाला दाखवितो. खटला कठीण आहे तेव्हां त्यांत डोकें कशाला घाला, असा विचार तो मनांत आणीत नाहीं. तसेंच एकाद्या धर्मनिष्ठ मनुष्याची नास्तिकाशीं गांठ पडली असतां त्याची ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं खातरी करण्यासाठीं तो अति परिश्रम करितो. त्याचप्रमाणें जो मुलगा शिक्षकाचा अधिकार अजी झुगारून देऊं पाहतो, त्याला शिक्षण देऊन सुमार्गास लावण्यांतच खऱ्या शिक्षकाला फार महत्त्व वाटलें पाहिजे. एकादें मूल इतकें रागीट असतें कीं, शेजारच्या मुलानें त्याची किंचित् खोडी केली तरी तें खवळून जातें; एकादें इतकें निगरगट्ट असतें कीं, आपल्या गुन्ह्याबद्दल आपला संशय कोणीं घेऊं नये म्हणून शेंकडों लबाड्या तें सांगतें, व त्याजबद्दल त्याच्या मनाला कांहींच वाटत नाहीं; आणि एकादें असें असतें कीं, आपल्या सोबत्याला फसविण्याची थोडीशी संधी सांपडली कीं ती तें फु-

विलक्षण स्वभावाच्या मुलांस सुधारण्यांतच शिक्षकाचें खरें कौशल्य आहे.

कट दवडीत नाहीं. अशा प्रकारच्या मुलास सुधारण्यासाठीं शिक्षकाला आपलें काम फार काळजीपूर्वक करावें लागेल; व त्या संबंधानें त्याला रात्रंदिवस मनन करावें लागेल. अशीं मुलें शारीर शिक्षेनें खरोखर सुधारत नाहींत. शिक्षकाचा धंदा कांहीं इतका सुलभ नाहीं कीं, नुसत्या छडीनें काम भागेल. हजारों रोगांवर एकच रामबाण मात्रा मिळणें अशक्य आहे. त्याप्रमाणें मुलांचे अनेक दोष घालविण्यास शिक्षकाला सर्वसाधारण असा एकच उपाय सांपडावयाचा नाहीं. मुलांचे अपराध कांहीं जागच्या जागीं दाबून टाकावयाचे नाहींत; तर ते अपराध घडण्याचें बीजच त्यांच्या स्वभावांतून अजी काढून टाकावयाचें आहे. परंतु हें बीज काढून टाकण्यास अधिकाराच्या जोराचा किंवा शरीरशिक्षेचा फारसा उपयोग होत नाहीं; युक्तिप्रयुक्तीचा व विचाराचा अधिक होतो. एक शिक्षक उठल्या बसल्या छडीशीं गांठ ठेवीत असे; व एकादा शेतकरी धान्य झोडपतो त्याप्रमाणें मुलांस झोडून काढीत असे. म्हणून एका कल्पक मुलानें तर त्याचें नांव "झोडप्या" असेंच ठेविलें होतें. अशा प्रकारचें शिक्षकाचें वर्तन निंद्य होय. छडीचा उपयोग मुळींच नाहीं असें नाहीं. तथापि विचारानें काम जितकें उत्तम साधेल, तितकें छडीनें साधारण नाहीं. शिक्षा केल्यानें मुलांच्या मनांत भीति उत्पन्न होऊन त्या भीतीमुळें तीं कदाचित् चांगलें वर्तन ठेवितील; परंतु तसें होण्यास ती शिक्षा न्यायाची असून गुन्ह्याच्या बेतानें असली पाहिजे. शिक्षेच्या भीतीमुळें मुलें आपला संताप तितक्या वेळेपुरता मनांतल्या मनांत दाबून टाकितील. परंतु चिडखोर

मुलें ह्या भीतीलाही जुमानणार नाहींत. ही गोष्ट मुलें लघवीस किंवा पाणी पिण्यास सुटलीं असतां शिक्षकानें त्यांजवर थोडें लक्ष ठेवावें, ह्मणजे त्याच्या ध्यानांत येईल. छड्यांच्या भीतीमुळें मुलें कदाचित् खरें बोलतील, तथापि ह्यामुळें कपटानें वागण्याकडे त्यांची प्रवृत्ति होण्याचा संभव आहे. आपला गुन्हा उघडकीस येण्याची भीति असल्यामुळें मुलगा गुन्हा करीत नसेल, तर त्याची सुधारणा झाली असें म्हणतां येणार नाहीं; कारण अशी भीति मुळींच नसेल तेव्हां गुन्हा करण्यास तो एका पायावर तयार होईल. तात्पर्य, केवळ शिक्षेची भीति घालून मुलांस सुमार्गास लावण्याचा प्रयत्न केल्यास तीं वर दर्शविल्याप्रमाणें कपटी होण्याचा संभव आहे. ह्मणून ह्या धंद्यांत यश येण्यास अति सुलभ मार्ग म्हटला ह्मणजे शिक्षकानें अति परिश्रम घेऊन आत्मसंयमन आंगीं आणावें आणि मुलांची सुधारणा कोणत्या रीतीनें होईल, ह्याविषयीं काळजीपूर्वक स्वतः अनुभव घ्यावा.

ह्याप्रमाणें शिक्षकाच्या आंगीं आत्मसंयमन आलें म्हणजे ह्या धंद्यांत यश येण्याचें अति महत्त्वाचें साधन त्याला अनुकूल झालें, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. आतां कोणताही धंदा उत्कृष्ट साधण्यास मधून मधून अडचणी येतात; त्याप्रमाणें शिक्षकालाही येतील. तथापि हा गुण आंगीं आल्यावर शाळा चालविण्याचें काम त्याला पूर्वीपेक्षां सुलभ जाईल. आपल्या शिक्षकाच्या आंगीं पक्कें आत्मसंयमन आहे, अशी विद्यार्थ्यांची खातरी झाली पाहिजे; म्हणजे गडबड करून तो कातावतो किंवा नाहीं, हें पाहण्याचा विचार त्यांच्या

ह्या धंद्यांत आत्मसंयमनाची योग्यता.

मनांत कधींही येणार नाहीं. ज्याच्या सामर्थ्याविषयीं मुलांची खातरी झाली आहे, अशा एकाद्या शिक्षकाची बदली होऊन त्याच्या जागीं नवीन शिक्षक येतो, तेव्हां हा फरक नीट लक्षांत येतो. जुन्या शिक्षकाच्या कारकीर्दींत मुलांची पक्की खातरी झालेली असते कीं, आपल्या शिक्षकाच्या आंगीं अधिकार चालविण्याचें पूर्ण सामर्थ्य आहे; ह्यामुळें तेव्हां गडबड न होतां काम अगदीं सुरळीत चालत असतें. परंतु ह्या नव्या शिक्षकाच्या सामर्थ्याविषयीं मुलांची खातरी झालेली नसल्यामुळें प्रथम प्रथम घोंटाळे उत्पन्न होतात. तेव्हां शिक्षक कितीही विद्वान् असो, त्याच्या आंगीं मनोनिग्रहशक्ति मुळींच नसेल तर मुलांच्या मनांत त्याच्याविषयीं पूज्यबुद्धि उत्पन्न होणार नाहीं; व तीं त्याचे हुकूम मानणार नाहींत. लहान लहान मुलांना विद्वत्तेची फारशी योग्यता कळत नसते. प्रोफे० काल्डरवूड यांस एका विद्वान् शिक्षकाचा अनुभव लहानपणीं आला होता. त्या अनुभवावरून त्यांची खात्री झाली कीं, लहान मुलांच्या शिक्षकाला नुसती विद्वत्ता कांहीं पुरी नाहीं. त्यांनीं त्या शिक्षकासंबंधानें असें लिहिलें आहे:-" आमचा शिक्षक मोठा विद्वान् असून तो मोठा नीतिमान्ही होता. तसेंच तो शरीरानेंही सुदृढ होता, परंतु त्याचा स्वभाव अति चिडखोर होता, ही गोष्ट मोठी दुःखाची होती. त्याच्या ह्या स्वभावामुळें आह्मां उभयतांचेंही नुकसान होत असे. शरीरशिक्षा फार घातक, असें लोकांचें अलीकडे मत बनत चाललें आहे. तथापि त्याला हें मत अगदीं मान्य नव्हतें. उलट

एका चिडखोर स्वभावाच्या शिक्षकाची हकिकत.

अशी शिक्षा करण्याचा त्याचा सपाटा सारखा सुरू होता. त्याची समजूत अशी होती कीं, मुलांस तरवारीच्या धारेवर धरून जबर शिक्षा केली, म्हणजे आपणास तीं त्रास देणार नाहींत. परंतु ही समजूत अर्थात् चुकीची होय. त्याच्या ह्या वेडगळ समजुतीमुळें त्याच्या मनाला शांतता मुळींच नसे. उलटपक्षीं आम्हां उभयतांनाही ह्यामुळें सारखाच त्रास होत असे. तो आम्हांला दररोज फोडून काढी, व ह्यामुळें जिकडे तिकडे एकच कल्होळ उडे. त्याला भली लांबलचक छडी आवडत असे; व तिनें तो आमच्या पाठी फोडून काढी. एके दिवशीं शाळा उघडल्यावर लवकरच विलक्षण गोंगाट सुरू झाला. तेव्हां तो कावराबावरा होऊन सभोंवतीं पाहूं लागला; व संतापानें छडी उगारूं लागला. लवकरच एक गरीब बिचारें मूल कांहीं खोडी करितांना त्याला आढळलें. वस्तुतः त्याचा गुन्हा अगदीं क्षुल्लक होता, व शिक्षक थोडें रागें भरता तर काम झालें असतें. परंतु शिक्षक देहभानावर असेल तेव्हां त्याच्याकडून इतका विचार होईल. आमच्या ह्या शिक्षकाच्या आंगीं आत्मसंयमन मुळींच नसल्यामुळें थोडी शिक्षा करून त्याचें समाधान केव्हांच होत नसे. म्हणून ह्या लहान मुलाच्या क्षुल्लक गुन्ह्यामुळें देखील अगदीं चवताळून जाऊन त्यानें छड्यांचा तडाका सुरू केला; व लवकरच त्याचा अंमल सरसकट होऊं लागला. तेव्हां आपल्यावर देखील ही गदा येते कीं काय, अशी प्रत्येकाला धास्ती पडली. तथापि असा दंगा म्हणजे मुलांना एक मोठी मौज वाटते; व ह्यामुळें त्यांना मनांतून आनंदही होत असतो. अशा स्थितींत शिक्षका-

चा अंमल विद्यार्थ्यांवर कधींही चालावयाचा नाहीं. अति दिलगिरीची गोष्ट ही कीं, तो निर्दयपणानें विद्यार्थ्यांस छड्या मारी, त्यांत त्याच्या हातून वारंवार अन्याय होत असे; म्हणजे ज्यांचा अपराध क्षुल्लक त्यांस छड्या जास्त बसत, व ज्यांचा मोठा त्यांस कमी बसत. ह्यामुळें ज्यांना विनाकारण जास्त शिक्षा होई, त्या गरीब बिचाऱ्यांबद्दल सर्वांच्या मनांत करुणा उत्पन्न होऊन शिक्षकाविषयीं मात्र तिरस्कार उत्पन्न होत असे. एकदां वर्गांतील एका अति धाडशी मुलानें शिक्षकाच्या अंगावर एक पुस्तक झुगारिलें. तेव्हां शिक्षक चवताळून उतावीळपणानें भलत्याच एका मुलाच्या अंगावर घसरला; व त्याला त्यानें खूप ठोक दिला. अखेरीस गोष्ट निकरास गेली. ज्यानें खरोखर गुन्हा केला होता, तो मुलगा शिक्षकापुढें आला; तेव्हां त्याचा चेहरा रागानें लाल झाला होता. तो ओरडून शिक्षकाला म्हणाला, ‘ तुम्ही त्या बिचाऱ्याला कां मारितां ? त्यानें गुन्हा केलेला नाहीं; पुस्तक मीं झुगारिलें. ’ हें ऐकून शिक्षकाचा मोरचा त्याच्याकडे वळला; व त्यानें त्या खऱ्या गुन्हेगारावर छड्यांचा वर्षाव सुरू केला. तेव्हां दोघांची प्रत्यक्ष झोंबाझोंबी सुरू झाली. आतां ह्या झटापटींत शिक्षकाची शरीरशक्ति कदाचित् मुलापेक्षां जास्त ठरली असेल. परंतु त्याच्या आंगीं आत्मसंयमन नाहीं असें त्याच्या वर्तनावरून उघड ठरलें. अशा शिक्षकाच्या हातून शिक्षणाचें काम चालण्याची आशाच नाहीं; व तसा परिणामही त्या वेळीं घडून आला. म्हणजे हा धंदा सोडून देऊन तो शिक्षक नंतर व्यापारांत शिरला; व लवकरच त्यांत त्याची भरभराट झाली.

सारांश, आत्मसंयमन हा गुण शिक्षकाच्या आंगीं असलाच पाहिजे. पुष्कळ लोकांस ही गोष्ट माहीत नसून ते ह्या धंद्यांत शिरतात, व पुढें पश्चात्तापांत पडतात. हा गुण आंगीं नसल्यास वरील उदाहरणांत दर्शविल्याप्रमाणें वर्गात घोंटाळे उत्पन्न होण्याचा संभव असतो, हें त्यांस कळत नसतें. शिक्षकाच्या आंगीं आत्मसंयमन नसेल तर हल्लींच्या काळांत त्याचे अति हाल होतील; इतर कोणत्याही धंद्यांत इतके होणार नाहींत. तथापि सर्व धंद्यांत अति लोककल्याणाचा धंदा हाच आहे; व ह्यांत त्याचें स्वतःचें हित असून त्याला वारंवार उत्तेजन मिळण्याचा संभव आहे. मात्र दुसऱ्यावर अंमल कोणत्या रीतीनें चालवावा, ह्याची गुरुकिल्ली साध्य होण्यास त्याच्या आंगीं आत्मसंयमन पूर्णपणें आलें पाहिजे; ह्यांत तिळमात्र शंका नाहीं.

---

# प्रकरण २ रें.

## शाळेचा बंदोबस्त.

शिक्षकाच्या आंगीं आत्मसंयमन आल्यानंतर त्याच्या मदतीनें विद्यार्थ्यांचा बंदोबस्त त्यानें कसा ठेवावा, हा विषय ओघानेंच येतो. त्याच्या आंगीं आत्मसंयमन पाहिजे, तें कांहीं विशिष्ट हेतु सिद्धीस नेण्यासाठीं पाहिजे; म्हणजे दुसऱ्यास चांगल्या रीतीनें ताब्यांत ठेवितां यावें, म्हणून प्रथमतः त्याला स्वतःस ताब्यांत ठेवितां आलें पाहिजे. शिक्षकानें शाळेचा बंदोबस्त प्रत्यक्ष कोणत्या रीतीनें ठेवावा, ह्याचा आपणांस येथें विचार करावयाचा आहे. हा बंदोबस्त ठेवण्याचे हेतु दोन आहेतः–( १ ) मुलांस निरनिराळ्या विषयांचें ज्ञान करून देणें; व ( २ ) त्यांस सुशिक्षित करणें. म्हणून शाळेंतील हरएक व्यवस्था हे दोन उद्देश सिद्धीस जातील अशा बेतानें ठेविली पाहिजे.

शाळेंत बंदोबस्त ठेवण्याचे दोन उद्देश.

शाळेचा बंदोबस्त उत्तम रीतीनें ठेवण्यासाठीं उपाय योजावयाचे ते मुलांच्या स्वभावांस जुळतील असे असावे. त्यांच्या आंगीं बुद्धिमत्ता कितपत आहे हें ध्यानांत आणून ते योजिले पाहिजेत; आणि मुलांचें बुद्धिसामर्थ्य वाढवून त्यांच्या वर्तनास वळण लावणारे कांहीं उपजत अंकुर

उपाय योजणें ते मुलां-

त्या स्वभावास जुळतील असे असावे.

त्यांच्या स्वभावांत असतात, त्यांची वाढ ह्या उपायांनीं खुंटवून उपयोग नाहीं. तसेंच कित्येक अनिष्ट अंकुरही त्यांच्या स्वभावांत असून तेणेंकरून दुष्परिणाम घडतात. असें शिक्षकाच्या ध्यानीं येईल. म्हणून त्यांच्या स्वभावांतील दुर्गुणांचें बीज नाहींसें होण्याचे उपायही त्यानें योजिले पाहिजेत. सारांश, हे सर्व उपाय योजावयाचे ते शाळेंत मुलांस उत्तम प्रकारचें वळण लागावें, एवढ्याकारितांच योजावयाचे आहेत. आत्मसंयमन आंगीं आणण्यास शिक्षकास फार त्रास पडतो, हें मागील प्रकरणांत दाखविलेंच आहे. त्याचप्रमाणें मुलांस उत्तम वळण लावण्यांतही पुष्कळ त्रास पडतो, असें पुढील विवेचनावरून ध्यानीं येईल. तथापि शिक्षणाचें काम सुयंत्र चालावें म्हणून शिक्षकाला हा त्रास सोशिला पाहिजे. विद्यार्थ्यांस उत्तम वळण लावितां येण्यास शिक्षकाच्या आंगीं धिमेपणा व सारासारविचार असणें जरूर आहे. म्हणून ह्या धंद्यांत नांवालौकिकास चढण्याची ज्यांची इच्छा असेल त्यांनीं हे दोन गुण प्रथम संपादावे.

अध्यापनाचें काम मुख्य, तथापि बंदोबस्ताशिवाय तें चालावयाचें नाहीं.

येथें हेंही सांगितलें पाहिजे कीं, मुलें आपापले धडे शिकत असतां त्यांचा बंदोबस्त उत्तम प्रकारचा राहिला ह्मणजे कार्यभाग झाला असें नाहीं; तर शिक्षक एकादा विषय प्रत्यक्ष शिकवीत असतांही त्यांनीं नीट रीतीनें तिकडे चांगलें लक्ष दिलें पाहिजे. वर्गाचा नुसता बंदोबस्त ठेवणें ही गोष्ट निराळी, आणि अभ्यास वगैरे सुरू असतां बंदोबस्त ठेवणें ही गोष्ट निराळी.

आपणास हा दुसऱ्या प्रकारचा बंदोबस्त ठेवावयाचा आहे. हें शिक्षकानें विसरतां कामा नये. शिक्षकाचा सर्व काळ शिकविण्यांत गेलेला दिसतो; जणूं काय त्याचें कर्तव्य तेवढेंच आहे. परंतु ह्या सर्व काळांत त्याला विद्यार्थ्यांवर अंमल ठेवणें जरूर असतें; व तसा अंमल तो ठेवीतही असतो; मात्र तें विद्यार्थ्यांच्या लक्षांत येत नाहीं. हा बंदोबस्त शिक्षकानें होईल तितका गुप्त रीतीनें ठेवावा; ह्मणजे तेणेंकरून शिक्षक व विद्यार्थी ह्या उभयतांचेंही हित होईल. त्यानें मुख्य लक्ष शिक्षणाकडे देऊन त्याच्या अनुषंगानें हा बंदोबस्त ठेविला म्हणजे पुरे आहे. वळण लावण्याकरितां शिक्षण नसून शिक्षण सुरळीत चालावें म्हणून वळण लावावयाचें आहे. गवयाचें गाणें तबल्याच्या योगानें जसें एकसारखें खुलत जातें, त्याप्रमाणें मुलांस चांगलें वळण असल्यानें सर्व अभ्यास सुरळीत चालून तो मुलांच्या मनावर चांगला ठसतो. सारांश, मुलांस शिक्षण देणें हें शिक्षकाचें मुख्य कर्तव्य असून वळण लावणें हें गौण किंवा अंगभूत कर्तव्य आहे. म्हणून त्यानें ही गोष्ट ध्यानांत ठेवून त्या धोरणानें आपल्या वेळाचा उपयोग करावा ह्मणजे काम चांगलें चालेल. त्यानें बहुतेक वेळ शिक्षणाकडे खर्च करून त्याच्या अनुषंगानें थोडासा वेळ मुलांस उत्तम वळण लावण्याकडे घालवावा. तसेंच हें वळण लावण्यास भानगडीचे उपाय त्यानें योजूं नयेत. कारण तसे उपाय सुरू केल्यास त्याचा बहुतेक वेळ तिकडे खर्च होईल. वर्गाचा बंदोबस्त ठेवण्याचे कामीं शिक्षकाला फारसें लक्ष ठेवावें लागणार नाहीं, व फारसा त्रास पडणार नाहीं, तरच त्याला बंदोबस्त फार चांगला

ठेवितां येतो, असें म्हणतां येईल. एकदां त्याची छाप बसली ह्मणजे सर्व मुलें मुकाट्यानें त्याच्या आज्ञेंत राहतात; व शिक्षणाचें मुख्य काम सुयंत्र चालतें.

येथें महत्त्वाचा प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, शाळेंत उत्तम बंदोबस्त राखण्याचे उत्कृष्ट उपाय कोणते? लहान लहान मुलांवर आपणास कोणत्या उपायांनीं छाप बसवितां येईल ह्याचा शिक्षकानें आपल्याशीं नीट रीतीनें विचार करून नंतर असे उपाय योजिले पाहिजेत. सर्वच शिक्षकांचा विद्यार्थी मान ठेवीत नाहींत, व सर्वांवरच त्यांची श्रद्धा बसत नाहीं. विद्यार्थ्यांकडून मान मिळण्यास व त्यांची श्रद्धा बसण्यास शिक्षकाच्या आंगीं कित्येक गुण असावे लागतात; व हे गुण त्याच्या आंगीं आहेत किंवा नाहींत हें पाहण्याकडे विद्यार्थ्यांचें साहजिक लक्ष असतें. म्हणून हे गुण आंगीं आणण्याकडे शिक्षक लक्ष देईल, तरच त्याची छाप विद्यार्थ्यांवर बसेल. आपला शिक्षक चांगला विद्वान् आहे किंवा नाहीं, एवढेंच मुलें पाहतात असें नाहीं. तर त्याच्या आंगीं व्यवहारज्ञान व आपल्याविषयीं खरी कळकळ आहे किंवा नाहीं, हेंही तीं पहात असतात. "शिक्षकामध्यें कोणते गुण असावे?" असा प्रश्न वर्गांतील मुलांना केला असतां ह्या वर दर्शविलेल्या गुणांचीं नांवें जरी कदाचित् त्यांना सांगतां आलीं नाहींत, तरी हे दोन गुण त्याच्या आंगीं आहेत किंवा नाहींत हें मुलें फार बारकाईनें पाहत असतात; ह्यांत शंका नाहीं. सारांश, शिक्षकानें विद्यार्थ्यांवर नजर ठेवावी, त्यांस हरएक प्रका-

व्यवहारज्ञान व विद्यार्थ्यांविषयीं खरी कळकळ ह्या दोन गुणांची शिक्षकास आवश्यकता.

रचें शिक्षण द्यावें, व त्यांच्या एकंदर वर्तनावर दाब ठेवावा. मात्र असें करितांना नेहमीं लक्षांत ठेवावें कीं कोणतीही सयुक्तिक गोष्ट सांगितली असतां मुलें त्याविरुद्ध वागत नाहींत; व शिक्षकाचें आपल्याविषयीं नेहमीं चांगलें मत असावें अशाविषयीं तीं नेहमीं उत्सुक असतात. ह्या नियमांना अनुसरून शिक्षकानें वागावें; म्हणजे त्याला अनेक मुलांचा बंदोबस्त ठेवितां येईल; व तो ठेवितांना विशेष त्रासही पडणार नाहीं.

विद्यार्थ्यांचा बंदोबस्त ठेवणें म्हणजे त्यांस एकाद्या निर्जीव पदार्थाप्रमाणें वागवावयाचें नाहीं.

तथापि वर्गाचा बंदोबस्त ठेवीत असतां शिक्षकाची केव्हां केव्हां अशी इच्छा असते कीं, मुलांनीं अगदीं हूं कीं चूं करूं नये. ही इच्छा अयोग्य आहे, असें येथें सांगणें अवश्य आहे. वर्गांत एकादा विषय सुरू असतां त्या विषयाच्या शिक्षणास अडथळा येणार नाहीं, इतका बंदोबस्त व शांतता वर्गांत रहावी, म्हणजे झालें. मुलांनीं अगदीं वर मान करूं नये अशी इच्छा त्यानें धरूं नये. उदाहरणार्थ अंकगणित व मोडी वाचन हे विषय घेऊं. अंकगणिताचें उदाहरण सोडवीत असतां मुलांस अगदीं मुकाट्यानें बसण्यास शिक्षक सांगेल तर त्यांत कांहीं दोष नाहीं. परंतु मोडी वाचनाच्या फायली किंवा पत्रें तीं वाचूं लागतील, तेव्हां तितकी शांतता राहणें अशक्य आहे. मुलें स्वभावतः चंचल असावयाचींच; व त्यांचा हा चंचलपणा अगदीं घालवून उपयोग नाहीं. म्हणून एकाद्या मुलानें किंचित् चळवळ केली कीं, त्यानें आपला हुकूम तोडिला असें मानणें अन्यायाचें होईल; व तेणेंकरून

विद्यार्थ्यांस निर्दयपणानें वागविल्याप्रमाणें होऊन त्यांचा बंदोबस्त ठेवितां येणार नाहीं. सारांश, मुलांचा स्वभाव चंचल असतो हें नेहमीं ध्यानांत ठेविलें पाहिजे, व त्या बेतानेंच शाळेंत व्यवस्था ठेवण्याचे उपाय योजिले पाहिजेत. हे उपाय योजितांना मुलांच्या आरोग्याचाही विचार केला पाहिजे. म्हणजे वर्ग अशा जागीं बसवावे कीं, तेथें शुद्ध हवा सतत खेळती रहावी; मात्र हवेचा प्रत्यक्ष लोट मुलांच्या अंगावर येऊं नये. तसेंच उन्हाळ्यांत उन्हापासून व हिंवाळ्यांत थंडीपासून इजा त्यांस होईल तितकी कमी व्हावी; व पावसाळ्यांत जमिनीस ओल वगैरे नसावें. इतके उपाय योजिले असतां साधारणतः कोणत्याही ऋतूंत मुलांच्या आरोग्यास इजा पोहोंचणार नाहीं. तथापि ह्या संबंधानें शिक्षकानें आणखी असें करावें कीं, मुलांस एकाच स्थितींत फार वेळ ठेवूं नये; ह्मणजे तास अर्धतासानें त्यांजकडून थोडीशी कवाईत वगैरे करवावी. तसेंच मुलांचें लक्ष अभ्यासाकडे एकसारखें राहील अशा रीतीनें विषय वरचेवर बदलावे. एकादा कठीण विषय फार वेळ शिकवीत बसल्यास मुलांच्या ग्रहणशक्तीवर फाजील ओझें पडून तीं कंटाळतात, व तेणेंकरून त्यांच्या मेंदूस फार त्रास होऊन त्यांच्या आरोग्यासही धक्का पोहोंचण्याचा संभव असतो. सारांश, कोणते उपाय केव्हां योजावे ह्याविषयीं अजमासानें नियम ठरवितां येणार नाहींत. कोणता विषय केव्हां बंद करावा, पुढें कोणता सुरू करावा इत्यादि गोष्टींचा निर्णय शिक्षकानें प्रत्यक्ष अवलोकनानें ठरविला पाहिजे. शर्यतीच्या घोड्याप्रमाणें हल्लीं शाळांची स्थिति झाली आहे. त्या घोड्याला जसें वर्तुळाबाहेर

किंचितूही जातां येत नाहीं, तसें शिक्षकाला वेळापत्रका-बाहेर थोडें देखील पाऊल टाकितां येत नाहीं. ह्यामुळें नेहमीं उठून तोच तो क्रम शाळांतून सुरू राहतो, व तेणें करून मुलांस फार कंटाळा येतो. तेव्हां हें वेळापत्रकांचें बंधन थोडें बहुत शिथिल केलें असतां हा कंटाळा शिक्षकांस घालवितां येईल. अभ्यासाचा मुलांस कंटाळा आला आहे असें वाटल्याबरोबर शिक्षकानें त्यांस लष्करी कवायतीप्रमाणें थाटानें वर्गांतून थोडा वेळ उघड्या जागेंत न्यावें; व साधल्यास अशा प्रसंगीं बाजाचा किंवा दुसऱ्या एकाद्या वाद्याचा उपयोग करावा, ह्मणजे मुलांचा कंटाळा तेव्हांच जाईल. अशा प्रकारच्या उपायांनीं त्यांचा बंदोबस्त ठेवण्यास शिक्षकाला फारसा त्रास पडणार नाहीं. मुलांचें लक्ष शिक्षणाकडे उत्तम प्रकारें लागलें पाहिजे खरें; परंतु त्यांच्या शरीराला समाधान नसेल तर तसें लक्ष लागणार नाहीं. ह्यासाठीं कवायतीसारखे उपाय शिक्षकानें वारंवार योजिले पाहिजेत. तथापि त्यानें हेंही पक्कें लक्षांत ठेवावें कीं, शिक्षणाचा मुख्य हेतु ह्मटला ह्मणजे, मुलांचें बुद्धि-सामर्थ्य वाढून तीं उत्तरोत्तर अधिक नीतिमान् होत जावीं, इतकाच आहे. हा हेतु साध्य व्हावा, एवढ्याचसाठीं हे इतर उपाय आरंभीं योजावयाचे आहेत.

अभ्यासाचा कंटाळा घालविण्यास कवाईत वगैरेची जरूर.

शिक्षणाचे हेतु सिद्धीस जावे ह्मणून तें सुरू असतां वर्गांत एक प्रकारचा बंदोबस्त रहावा लागतो; व तो ठेवितां यावा म्हणून शिक्षकाला कांहीं

विद्यार्थ्यांनीं शिक्षकाचा अधिकार बिनतक्रार मानणें जरूर आहे. तथापि शि-

क्षकानें आपला अधिकार मिरवितां कामा नये.

अधिकार असतो. हा अधिकार विद्यार्थ्यांनीं बिनतक्रार मानणें, ह्यालाच उत्तम वळण असें म्हणावयाचें. शाळेंतील सर्व विद्यार्थ्यांना असें वळण लागलें पाहिजे; परंतु हें लावण्याकडे शिक्षकानें सर्वकाळ लक्ष देऊन उपयोग नाहीं. हवा विद्यार्थ्यांच्या सर्वांगाभोंवतीं सर्वकाळ असते, परंतु ती त्यांस कळून येत नाहीं; तथापि ती आपलें कार्य करीत असते. त्याचप्रमाणें मोठेपणीं देखील विद्यार्थ्यांस कोणत्याही गोष्टींत व्यंग पडूं नये; म्हणून हें उत्तम वळण त्यांस शाळेंत सर्वकाळ लावावयाचें आहे. असें वळण त्यांस लागलें असतां तीं उत्तरोत्तर चांगलींच होत जातील (म्हणून शिक्षकाचे हुकूम आपणांस निमूटपणें पाळणें इष्ट आहे, अशी विद्यार्थ्यांची समजूत झाली पाहिजे; व ही समजूत आपल्या अधिकाराचा जोर न दाखवितां जितकी गोडीगुलाबीनें होईल तितकी करावी.)

विद्यार्थ्यांच्या वर्तनावर दाब ठेवण्यास अनेक उपाय

त्यांच्या वर्तनावर छाप वसविण्याचे अनेक उपाय.

शिक्षकाला योजितां येण्यासारखे आहेत. ह्यांपैकीं कोणत्या उपायाचा कितपत उपयोग करावयाचा तसेंच प्रथम कोणता योजावयाचा, नंतर कोणता योजावयाचा ह्याचा निर्णय शिक्षकानेंच केला पाहिजे; व तो वर्गाची प्रत्यक्ष स्थिति ध्यानांत आणून तिच्या अनुरोधानें केला पाहिजे. वर्गांत बंदोबस्त राहिलाच पाहिजे; ह्मणून आपले हुकूम पाळण्यास शिक्षकानें विद्यार्थ्यांस भाग पाडिलें पाहिजे. मग क्वचित् प्रसंगीं त्यांजवर सक्ती करावी लागली तरी हरकत नाहीं. विद्यार्थी आज्ञाधारक होण्यास उत्तम उपाय

कोणते, हा प्रश्न अति महत्त्वाचा आहे. हे उपाय तीन आहेत:-( १ ) त्यांजवर नजर ठेवणें, ( २ ) प्रसंगानुसार त्यांस शाबासकी देणें किंवा ताकीद, धमकी वगैरे देणें; आणि ( ३ ) गैरशिस्त वागल्यास त्याबद्दल योग्य शासन करणें. ह्या तीन उपायांनीं विद्यार्थ्यांचे विचार त्याला सुधारतां येतील. उत्तम प्रकारच्या वळणाचा मजबूत पाया शाळेंत घालावयाचा असेल, तर मुलांवर वजन ठेवण्यास सर्वोत्कृष्ट उपाय कोणता, तें शिक्षकानें प्रथम ठरविलें पाहिजे; व तो उपाय त्यानें प्रतिदिवशीं अमलांत आणिला पाहिजे. ह्या गोष्टीचा निर्णय त्यानें स्पष्ट रीतीनें आपल्याशीं एकदां कायमचा ठरवून टाकावा. शिक्षकाचें विद्यार्थ्यांवर वजन बसण्याचें मुख्य साधन त्याचें **नेत्रेंद्रिय** किंवा **नजर** हें होय. ह्याच्या खालोखाल **वाचाशक्ति** अथवा **स्वर** किंवा इतर सांकेतिक खुणा. अशा खुणा ठरविल्यानें त्याला प्रत्यक्ष बोलण्याचा प्रसंग येत नाहीं. अगदीं शेवटचा उपाय **शिक्षा**. हा अगदीं निदानीचा असून अति जरूर पडेल तेव्हांच योजावयाचा आहे.

पहिला उपाय—नेत्रेंद्रिय किंवा नजर.

शिक्षकाचें विद्यार्थ्यांवर वजन पडण्यास जीं अनेक साधनें आहेत, त्यांतील मुख्य साधन त्याचें नेत्रेंद्रिय होय. मुलांस प्रत्यक्ष रागें भरल्यानें त्यांजवर लवकर दाब बसत नाहीं; परंतु नजरेनें फार लवकर बसतो. नजरेनें दाब जितका लवकर बसतो तितका नुसत्या रागें भरण्यानें बसत नाहीं, अशी मुलांची एकदां खातरी मात्र झाली पाहिजे. म्हणून ज्या विद्यार्थ्यांस उत्तम वळण लावावयाचें असेल, त्यांच्या वर्तनावर नजर

ठेवणें शिक्षकाला अवश्य आहे. ह्यासाठीं शाळेंत घडणाऱ्या हरएक गोष्टीवर होतां होई तों शिक्षकानें नजर ठेवावी. ही गोष्ट तो लक्षांत ठेवणार नाहीं, तर मोठी चूक होईल. मुलांवर नजर ठेवितां यावी, म्हणून वर्ग अशा रीतीनें बसविला पाहिजे कीं, शिक्षकाची नजर सर्वांवर सहज पोहोंचेल. सर्व मुलांवर त्याची नजर राहणार नाहीं, तर त्यांच्यावर दाब ठेवण्याचें एक मोठें साधन त्यानें आपण होऊन गमाविल्याप्रमाणें होईल; व ह्यामुळें पर्यायानें विद्यार्थ्यांचेंही त्यानें विनाकारण नुकसान केल्याप्रमाणें होईल. मुलांवर छाप बसविण्यासाठीं शिक्षकानें शब्दांचा उपयोग कितीही शहाणपणानें केला तरी त्यावरून त्याच्या आंगचें पाणी विद्यार्थी ओळखीत नाहींत; तर त्याच्या नजरेवरूनच ओळखितात. शब्दांचा परिणाम मुलांवर होण्यास कांहीं काळ लागतो; नजरेचा क्षणांत होतो. तसेंच मुलांनीं सद्वर्तन ठेविलें असतां त्यांना शाबासकी देणें अवश्य असतें, व दुर्वर्तन केलें असतां रागें भरणें अवश्य असतें; आणि नजरेनें हें काम जितकें लवकर होतें, तितकें दुसरें कशानेंही होत नाहीं; कोणत्या प्रसंगीं शिक्षकाची नजर कशी बदलते, इकडे विद्यार्थ्यांचें नेहमीं लक्ष असतें; व ह्यामुळें त्याच्या नजरेवरून तो रागांत आहे किंवा आनंदांत आहे, हें तीं बहुधा बिनचूक ओळखितात. शिवाय नजरेचें काम अति जलद व अति गुप्त रीतीनें चालतें. वर्ग सुरू असतां शिक्षकाचें मनोगत विद्यार्थ्यांस कळण्यास नजरेसारखें दुसरें तारायंत्र नाहीं. तसेंच आगगाडीवरील तारायंत्रानें बातमी पाठवितांना एकादे वेळीं कमजास्त शब्द पडून भलताच अर्थ होण्याचा संभव असतो. परंतु

ह्या नजरेच्या तारायंत्रानें मुलांची भलती समजूत होण्याचा मुळींच संभव नाहीं असें म्हटलें तरी चालेल. मुलांस शाबासकी किंवा ताकीद, धमकी, वगैरे देतांना शिक्षक पदोपदीं शब्दांचा उपयोग करूं लागेल तर तिकडे त्याचा फार वेळ मोडेल. परंतु नजरेनें हेंच काम एका क्षणांत अधिक चांगल्या रीतीनें होईल. शिवाय ह्यामुळें वर्गांतील अभ्यासास मुळींच व्यत्यय येणार नाहीं. ह्मणून आपले हेतु मुलांस कळवावयाचे असतां शिक्षकानें नजरेचा उपयोग करावा. एऱ्हवीं त्याला मुलांवर चांगलेंसें वजन ठेवितां येणार नाहीं; व त्याचें अति नुकसान होईल. ह्या नजरेच्या योगानें शिक्षक आणि विद्यार्थी ह्या उभयतांना एकमेकांचे हेतु हळू हळू बिनचूक कळूं लागतात; व हें सर्व कृत्य गुप्त रीतीनें होत असतें. ह्यामुळें शाळेचा बंदोबस्त ठेवण्याचे कामीं ह्या नजरेचा उपयोग फार होतो. एकाद्या मुलानें कांहीं गुन्हा केला असतां त्याचा चारचौघांत डंका वाजवून त्यास उघड रीतीनें शिक्षा करण्यापेक्षां होईल तितकी गुप्त रीतीनें केली असतां अधिक फायदा होतो. तसाच फायदा केवळ नजरेनें विद्यार्थ्यांवर दाब ठेविला असतां होतो. तारायंत्रासाठीं एक प्रकारची सांकेतिक भाषा ठरविलेली असते; ती तारमास्तरांना मात्र कळते. त्याचप्रमाणें ज्या मुलानें गुन्हा केला असेल, त्याजकडे शिक्षकानें हळूच पहावें, ह्मणजे त्या नजरेचा बोध त्याला मात्र होईल. शाळेंत मुलांनीं गुन्हे केले असतां त्यांबद्दल त्यांना अशा गुप्त रीतीनें शासन करावें; ह्मणजे गुन्हेगारास मात्र त्याचा बोध व्हावा; इतरांच्या लक्षांत तें येऊं नये. अशा गुप्त रीतीनें

नजर ठेवणें फार महत्त्वाचें आहे. वर्गांत सर्व मुलांस एकदम शिक्षण देण्यांत शिक्षक गढून गेलेला असतो खरा. तथापि विद्यार्थ्यांस सूचना करण्याचे प्रसंग त्याला वेळोवेळीं येतात; व त्या सूचना अशा असतात कीं, त्यांचा संबंध सर्व मुलांशीं नसून एकाद्याशींच असतो. म्हणून ज्या मुलास सूचना देणें असेल त्यासच ती कळावी, इतरांस कळूं नये; अशा रीतीनें शिक्षकानें ती दिली तरच तिचा उपयोग होईल. एकादा मुलगा गैरशिस्त मार्गास लागणार आहे, असें शिक्षकास कळलें असतां त्या मुलाला त्या मार्गापासून परावृत्त करण्यासाठीं कित्येक वक्तशीर सूचना करणें शिक्षकाचें कर्तव्य आहे. अशा प्रसंगीं तर ह्या सूचना गुप्त रीतीनें करणेंच अवश्य आहे. मुलास हरएक प्रकारची ताकीद शिक्षकानें त्याच्या सर्व सोबत्यांसमक्ष दिली असतां तिचा फारसा उपयोग होत नाहीं; व ह्याचा दोष त्याच्याच माथीं आहे. मुलाला रागें भरावयाचें तें सर्वांसमक्ष भरलें असतां आपण निरपराधी आहों, असें सिद्ध करण्यास तो मुलगा झटतो; परंतु त्याच्या मनांत असले खोटे विचार उत्पन्न होणें फार अनिष्ट आहे. मुलांना सुद्धां स्वाभिमान असतो; ह्मणून सर्वांदेखत आपली फजिती व्हावी हें त्यांस पसंत नसतें. ह्मणून त्यांस ताकीद द्यावयाची ती नुसत्या नजरेनें द्यावी; ह्मणजे सर्व वर्गांत त्याची फजिती होत नाहीं. तसेंच अशा गुप्त रीतीनें ताकीद दिली असतां आपल्या वर्तनांत होईल तितकी सुधारणा करण्यास तीं झटतात. मुलांनीं सद्वर्तन ठेविलें असतां त्यांना शाबासकी देणें तीही अशा गुप्त नजरेनेंच द्यावी; ह्मणजे तसें आचरण करण्यास त्यांना अधिक उत्तेजन

येईल. शिवाय अशा गुप्त रीतीनें शाबासकी दिली असतां मुलांना असें वाटतें कीं, शिक्षकाचा ग्रह आपल्याविषयीं चांगला होत चालला आहे. परंतु हीच शाबासकी वर्गांत सर्व मुलांस कळेल अशा रीतीनें प्रत्यक्ष बोलून दिली तर विद्यार्थ्यांस गर्व होण्याचा संभव आहे; तसा संभव नुसत्या नजरेनें दिल्यास नाहीं. सारांश, मुलांवर छाप बसविण्यास शिक्षकाला इतर अनेक उपाय योजितां येतील; परंतु ह्या नजरेप्रमाणें काम कोणत्याही उपायानें होणार नाहीं. तसेंच हा उपाय सर्व प्रसंगीं सारखा लागू पडणारा असून ह्यानें इष्ट कार्य अति त्वरित होतें; आणि ह्याच्या इतका ममतेचा व मुलांस उत्तेजन देणारा दुसरा एकही उपाय नाहीं; हें वरील सर्व विवेचनावरून स्पष्ट रीतीनें ध्यानांत येईल. शाळा सुटेपर्यंत शिक्षकाची नजर सर्वांवर सारखी असते, अशी एकदां मुलांच्या मनाची खातरी झाली, म्हणजे त्याची अधिकाधिक छाप बसल्याशिवाय राहत नाहीं; आणि अशी छाप एकदां बसली म्हणजे त्याचा अधिकार तीं अगदीं मुकाट्यानें मानितात.

दुसरा उपाय—वाचाशक्ति किंवा स्वर.

मुलांवर वजन बसविण्याच्या कामीं नेत्रेंद्रियाच्या खालोखाल उपयोग वाचाशक्तीचा किंवा स्वराचा होतो. त्यांस नुसतें वळण लावावयाचें असतां नजरेचा उपयोग जितका वरचेवर होईल, तितका स्वराचा होणें अशक्य आहे. स्वराचा उपयोग सामान्य शिक्षण देण्यासाठींच प्रायः करणें इष्ट आहे. प्रत्येक मुलाच्या आंगचा दोष घालविण्यासाठीं नजरेचा उपयोग करणें इष्ट आहे; व तोही अगदीं गुप्त रीतीनें. परंतु

स्वराची गोष्ट तशी नाहीं. मुलांस उत्तम वळण लावण्या-साठीं शिक्षक जेव्हां जेव्हां प्रत्यक्ष उपदेश करील किंवा रागें भरेल, तेव्हां तेव्हां त्या भाषणापासून सर्व मुलांवर एकसारखा परिणाम झाला पाहिजे. अशा रीतीनें सर्व मुलांना एकदम शिक्षण देण्याचें सामर्थ्य शिक्षकाच्या भाषणांत असलें पाहिजे. तथापि हें सामर्थ्य त्याच्या भाष-णांत येण्यास त्यानें शब्दांचा उपयोग फार थोड्या वेळीं व मोठ्या विचारानें करावा. पुष्कळ शिक्षकांची अशी समजूत असते कीं, आपण मुलांस वारंवार रागें भरलों असतां आपली छाप त्यांजवर अधिक बसेल. परंतु ही समजूत चुकीची आहे. विद्यार्थी विनाकारण फाजील बोलूं लागले असतां त्यांना वळण नाहीं असें आपण म्हणतों. तीच गोष्ट शिक्षकांनाही लागू आहे. म्हणजे चांगला बंदो-बस्त ठेवण्यासाठीं त्यांनींही विद्यार्थ्यांस वारंवार बोलणें बरें नाहीं. शिक्षक जेव्हां जेव्हां रागें भरेल तेव्हां तेव्हां सर्व मुलांना पक्कें वाटलें पाहिजे कीं, ह्या वेळीं रागें भरणेंच योग्य होतें. शिवाय हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, शिक्ष-काचा उपदेश कितीही अमूल्य असला तरी तो वारंवार करून उपयोग नाहीं; कारण तेणेंकरून त्याची किंमत कमी होते. तसेंच माराची, शाळेंतून घालवून देण्याची किंवा इतर कोणत्याही प्रकारची धमकी शिक्षक उठल्या बसल्या देऊं लागला तर तिचीही भीति मुलांस वाटेनाशी होते. कित्येक शिक्षक धमकी द्यावयाची ती मोठ्यानें ओरडून देतात; कारण त्यांस वाटतें कीं, मोठ्यानें धमकी दिली असतां मुलें फार भिऊन जातील. परंतु वास्तविक परि-णाम उलट घडतो; ह्मणजे मुलांस तशा धमकीचें भय

लवकरच वाटेनासें होतें. एका ग्रंथकाराचें ह्या विषयासंबंधानें ह्मणणें मोठें सयुक्तिक आहे. तो ह्मणतोः—" अधिकाराचा उपयोग उठल्या बसल्या किंवा अविचारानें केला, तर त्याचा बोज जितका कमी होतो, तितका दुसऱ्या कोणत्याही कारणानें होत नाहीं. पहा, गिरणींतील यंत्रांचा आवाज सारखा सुरू असतो, परंतु त्याची कोणास भीति वाटत नाहीं. त्याचप्रमाणें मेघगर्जनाही सतत सुरू राहील तर तिजपासून लोकांच्या मनांत भीति उत्पन्न होणार नाहीं." सारांश, शिक्षक मुलांचे दोष वरचेवर काढीत बसेल तर नीतिदृष्ट्या त्याची छाप त्यांजवर बसेनाशी होईल. ह्या गोष्टीचा अनुभव आपण आपल्यावरून पहावा. आपणास कोणी उठल्या बसल्या शहाणपणाच्या गोष्टी सांगूं लागला तर तें आपणास आवडेल काय? मुलांची स्थितिही आपल्याप्रमाणेंच आहे; ह्मणजे त्यांना देखील ह्या गोष्टीचा तिटकारा आहे; व हें वाजवीच आहे. वरचेवर एकाच प्रकारच्या धमक्या दिल्या असतां त्यांपासून कांहींएक फायदा न होतां उलट शाळेंतील शिस्त मोडण्याचा संभव आहे, अशी शिक्षकाची सहज खातरी होईल.

तिसरा उपाय—शिक्षा.

ज्या तीन उपायांचा विचार आपणांस करावयाचा होता, त्यांपैकीं शेवटचा उपाय राहिला. तो गुन्ह्यांबद्दल शिक्षा करणें हाच होय. हा अगदीं निदानीचा असून ह्याचा उपयोग क्वचित् प्रसंगींच करावयाचा आहे. शिक्षा कधींच करूं नये, असें येथें प्रतिपादन करावयाचें नाहीं, कारण शिक्षक आपलें कर्तव्य बजावीत असतां ह्या उपायाचा क्वचित् उपयोग केल्यावांचून त्याचें चालावयाचें नाहीं.

कोणत्याही प्रकारचा बंदोबस्त ठेवावयाचा ह्मणजे तो ठेवणाऱ्या अंमलदारास कांहीं अधिकार द्यावा लागतो. तसेंच हा अधिकार कोणी जाणून बुजून झुगारून देईल तर त्याला शिक्षा करण्याची त्या अंमलदारास परवानगी असली पाहिजे. नाहींतर त्याचा अधिकार कोणी जुमानणार नाहीं. ह्मणून शिक्षा करण्याचा अधिकार शिक्षकाला असला पाहिजे. तथापि अति क्षुल्लक गुन्ह्यांबद्दल शिक्षा करणें इष्ट नाहीं. स्कॉटलंदांत पूर्वी लहानसान अपराधाबद्दलही शिक्षा करण्याचा प्रघात होता, परंतु तो अति अविचाराचा व निर्दयपणाचा होता,* हें उघड आहे. तथापि हल्लीं तेथें सुरू केलेल्या नवीन शिक्षणपद्धतीमुळें हा प्रकार बंद होत चालला आहे. आतां स्कॉटलंदांत मुलांस शिक्षा करण्यासाठीं शिक्षक पूर्वी असुरी उपाय योजीत; परंतु त्यांपासून सुपरिणाम घडतात असें ते तेव्हां सिद्ध करून दाखवीत; ह्मणून त्यांस फारसा दोष देण्यास जागा नसे. तसेंच असेही पुष्कळ लोक त्या देशांत अद्यापि हयात आहेत कीं, चांगल्या विचारी शिक्षकांच्या हातून त्यांनीं लहानपणीं चावकाचा मार खाल्लेला आहे; आणि त्यांचें असेंही ह्मणणें आहे कीं, त्या मारामुळें आपली सुधारणा झाली आहे. मूळ पुस्तकाचे कर्ते प्रोफे० काल्डरवूड ह्यांनीं देखील अशी शिक्षा भोगिली असून

---

* हें वर्णन आपल्या इकडील स्थितीलाही जुळतें, असें ध्यानीं येईल. तात्या पंतोजींच्या घोड्या, मिरच्यांच्या धुऱ्या, कोलदांडे, खुर्च्या वगैरे प्रकार आतां राहिले नाहींत. तथापि शिक्षकानें होतां होईतों छडीलाही शिवावयाचें नाहीं, असा निश्चय केला असतां फार बरें होईल. ( भा. क. )

तेणेंकरून आपला फार फायदा झाला आहे, असें त्यांनीं म्हटलें आहे. अशा शिक्षांपासून तेव्हां कितीही फायदे झाले असले तरी एक गोष्ट निर्विवाद आहे. ती ही कीं, स्काटलंदांत शारीर शिक्षा करण्याचे अति निंदास्पद प्रकार पूर्वीं सुरू होते, असे लेख आहेत. त्यांवरून असें ठरतें कीं, लोकांत शिक्षणप्रसार कसा करावा, ह्यांचें तेथील लोकांस तेव्हां फारसें ज्ञान नव्हतें; व मानवी स्वभावाचें ज्ञानही त्यांना तात्पुरतेंच होतें. ही स्थिति फार दोषास्पद होती,हें उघड आहे. तथापि हल्लीं ह्या शिक्षा तिकडे बहुतेक बंद होत आल्या आहेत. पूर्वीं शारीर शिक्षा करण्याच्या साधनांचा तेथें वारंवार उपयोग करीत असत; व असा पदोपदीं उपयोग केल्यामुळेंच त्यांचा मुलांना मुळींच बाऊ वाटत नसे. ह्यामुळें अधिकाधिक लज्जास्पद असे शिक्षा करण्याचे प्रकार शोधून काढण्याची इच्छा शिक्षकांस होत असे. परंतु ही इच्छा फार घातक होय. अशा रीतीनें शारीर शिक्षेचे अति लाजिरवाणे प्रकार तिकडे प्रचारांत आले. ह्यासंबंधानें स्काटलंदांतील एका शाळेंतील एका दुर्दैवी मुलाच्या स्थितीचें वर्णन पुढें दिलें आहे:—"एकदां एका वर्गांतील सर्व मुलांनीं एकदम मोठा गोंगाट केला. तेव्हां शिक्षकानें गरीब बिचाऱ्या एका मुलाला पकडून त्याला धुरांड्यांतून गजांच्या जाळींत डोकें वर काढून उभें राहण्याची शिक्षा दिली; व तीही ऐन उन्हाळ्याच्या दिवसांत. तो बिचारा ह्या निंद्य प्रकारच्या कैदेंतून सुटला तेव्हां त्याचें तोंड जळमटांनीं भरून काळें झालें होतें. तशा स्थितींत तो वर्गांत येऊं लागला; तेव्हां त्याची थट्टामस्करी करण्याची शिक्षकानें त्याच्या

सोबत्यांस फूस दिली. कारण त्याची जास्त फजिती उडविण्याचा शिक्षकाचा हेतु होता. परंतु हे सर्व सोबती त्याच गुन्ह्यांत सामील होते; आणि त्यांपैकी पुष्कळजण तर पुढारी होते." अशा प्रकारच्या शिक्षा ऐकून कोणाच्याही आंगाचा थरकांप होणें साहजिक आहे. तसेंच, ह्या शिक्षा मुलांनीं निमूटपणें सहन केल्यानें त्यांच्या नैतिक मनोवृत्तींवर फार वाईट परिणाम घडतात. ह्मणून ह्या शिक्षा अति निंद्य होत. छडीनें किंवा चाबकानें मुलांस फोडून काढणेंही निंद्य होय. कित्येक शिक्षक बुक्यांनीं किंवा पुस्तकांनीं ठोक देतात; परंतु अशा रीतीनें शिक्षा करणें अगदीं अन्यायाचें आहे. क्वचित् प्रसंगीं मुलांस लाथ मारण्याचीही इच्छा शिक्षकास होते. परंतु असा विचार मनांत उद्भवल्याबरोबर त्याच्या मनाला इतका उद्वेग झाला पाहिजे कीं, तसला विचार त्याच्या मनांत पुन: कधीं येऊं नये. शाळेंत चांगल्या गोष्टींचें वळण लावण्यास लत्ताप्रहारांचा उपयोग करणें अति निंद्य होय. स्काटलंदांत पूर्वीं चाबकानें शिक्षा करण्याची वहिवाट होती; व तेव्हांही शिक्षण काळजीपूर्वक व पूर्णपणें मिळत असे, हें खरें. तथापि तेव्हां शिक्षण कितीही चांगलें मिळत असलें तरी मुलांस शिक्षा होत असे ती वारंवार अविचारानें व अन्यायानें होत असे. तेथील शिक्षेचे कित्येक लज्जास्पद प्रकार वर दर्शविले आहेत. तशा शिक्षा क्वचित् प्रसंगींच होत असत, हें खरें. तथापि उठल्या बसल्या चाबकाशीं गांठ ठेवण्याची मात्र शिक्षकांना संवय असे. ह्यामुळें बहुतेक शिक्षक शिक्षा करीत ती वर्गांत योग्य बंदोबस्त ठेवितां न आल्यामुळें

चिरडीस जाऊन करीत. मुलांनीं गुन्हा केला असतां त्यांनीं तसा गुन्हा पुनः करूं नये म्हणून त्यांस शिक्षा करावयाची; परंतु हा उद्देश अशा प्रसंगीं ते शिक्षक अगदीं विसरत, ह्यांत तिळमात्र शंका नाहीं. सारांश, मुलांना वारंवार शिक्षा करण्याचा मोह तेव्हां शिक्षकांस पडत असे. अशा प्रकारच्या शिक्षांमुळें मुलांची मनें उन्नत स्थितीस न पावतां तीं कोडगीं होण्याचा मात्र संभव आहे. प्रोफे. काल्डरवूड ह्यांनीं स्वतः लहानपणीं शाळेंत कित्येक दिवस एका शिक्षकाच्या हाताखालीं मोठ्या विपत्तींत काढिले असून त्यांचें आपणास पक्कें स्मरण आहे; असें त्यांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे. मागील भागांत एका शिक्षकाची हकिकत दिली आहे. त्या शिक्षकाप्रमाणें ह्यालाही केव्हां केव्हां देहभान मुळींच राहत नसे; ह्यामुळें तो निर्दयपणानें सरसकट सर्वांस मारीत सुटे. ह्याचा परिणाम लवकरच असा झाला कीं, वर्गांत जिकडे तिकडे बेबंदशाहीचीं चिन्हें दिसूं लागलीं. अखेरीस असें झालें कीं, मुलांच्या मनांत आपल्या संबंधानें कुतर्क सुरू आहेत, असा संशय शिक्षकास नेहमीं येऊं लागला. ह्या संशयानें त्याला इतकें ग्रासिलें कीं, आपल्याविरुद्ध कट करणाऱ्या मुलांचा सूड उगविण्यास तो फार आतुर असे; व तशी संधी लवकर सांपडावी म्हणून चाबूक हातांत घेऊन तो वर्गाच्या दरवाज्यामागें आंतल्या बाजूस उभें राहून बाहेर काय चाललें आहे हें चोरून फटींतून पाही. परंतु मुलांनाही त्याचा संशय येऊं लागला. म्हणून दरवाज्याच्या फटींतून प्रथम चोरून पाहिल्याशिवाय मुलें वर्गांत शिरतनाशीं झालीं. दरवाज्याच्या फटीच्या आड

कांहीं आल्यामुळें उजेड बंद झाला आहे, असें त्यांस आढळलें म्हणजे एकजण दरवाजा जोरानें मागें ढकलून दाबून धरी, व बाकी सर्व मुलें एकदम खोलींत घुसत. ह्यामुळें शिक्षकाचा उद्देश फसे, व मुलें केव्हांच आपापल्या जागीं जाऊन बसल्यामुळें त्यांना हर्ष होई; पुढें शिक्षक मागें वळून निर्दयपणानें सर्वांवर चाबूक उगारूं लागला, म्हणजे दरवाजा दाबून धरलेल्या मुलालाही चटकन तोंड फिरविण्यास व फटका चुकविण्यास चांगली संधी सांपडे. पुढें लवकरच गोष्ट निकरास गेली. शिक्षकाविरुद्ध मसलत करण्यासाठीं मुलांनीं सभा भरविली; तेव्हां त्या सभेंत ठरलें कीं, शिक्षकाचा चाबूकच प्रथम नाहींसा करावयाचा; कारण तोच सर्व दुःखाचें कारण आहे. ह्मणून चांगलीशी संधी मिळाल्याबरोबर मुलांनीं चाबूक लपवून ठेविला; व शाळा सुटल्यावर मोठ्या आनंदानें तो हळूच बाहेर आणिला. त्याचें पुढें काय करावें अशी त्यांस पंचाईत पडली; परंतु तिचें निवारण लवकरच झालें. कारण एक रिकामी गाडी रस्त्यानें चाललेली त्यांस आढळली, तेव्हां तींत तो चाबूक त्यांनीं टाकून दिला. परंतु गाडीवानाच्या लक्षांत तें न आल्यामुळें गाडीबरोबर तो चाबूक गेला. तिसरे प्रहरीं गाडी तळावर गेल्यावर गाडीवानानें नित्यक्रमाप्रमाणें कोणाचें कांहीं सामान गाडींत राहिलें आहे कीं काय हें शोधून पाहिलें; तेव्हां हा विलक्षणच जिन्नस त्याला त्या दिवशीं आढळला. अर्थात् ह्या जिनसाचा ताबडतोब तपास करण्यास कोणी येण्याचा संभव नव्हता. इकडे आपला चाबूक कसा नाहींसा झाला, ह्याचें शिक्षकास कित्येक दिवस मोठें गूढ

पडलें. अखेरीस त्यानें जुन्या चाबकाऐवजीं एक चामड्याची वादी आणिली; व ती चोरीस जाऊं नये ह्मणून त्यानें ती कुलपांत ठेविली. ह्यास्तव ती डोळ्यासमोर नसल्यामुळें तिचा उपयोग वारंवार होईनासा झाला. जुना चाबूक नेहमीं टेबलावर असल्यामुळें त्याचा उपयोग वारंवार होत असे. अशा रीतीनें शिक्षक व विद्यार्थी ह्या उभयतांचीही साडेसाती संपली.

शारीर शिक्षेची क्वचित् आवश्यकता.

सारांश, पूर्वीच्या काळांत शारीर शिक्षा वारंवार करीत, व तीही फार कडक असे, ही मोठ्या दिलगिरीची गोष्ट आहे, असें वरील विवेचनावरून ध्यानीं येईल. तथापि अशी शिक्षा करण्याचा अधिकार शिक्षकास असला पाहिजे, हें उघड आहे. शारीर शिक्षा ह्मणजे घातकच, मग ती कोणत्याही प्रकारची असो, असें मत सांप्रत बहुतेक लोकांचें झालें आहे. इतकेंच नाहीं, तर ज्यांचा अनुभव मोठा व विचार पोक्त आहेत, असे कित्येक विद्वान्ही ह्या मताचें पुष्टीकरण करितात. तथापि हें मत सयुक्तिक दिसत नाहीं. शिक्षणप्रसारासंबंधीं व्यवस्था युनायटेड स्टेट्समध्यें अगदीं शिखरास जाऊन पोहोंचली आहे; व तेथील विद्वानांचें मतही शारीर शिक्षेच्या विरुद्धच आहे. तेथील न्यूयार्क शहरांतील शाळाखात्याकडून शिक्षकांस पुढें लिहिल्याप्रमाणें सूचना आहे:—" विद्यार्थ्यांचें लक्ष अभ्यासाकडे लागावें ह्मणून त्यांस धक्के देणें, ओढणें, किंवा गदगदां हालविणें, इत्यादि जबरीचे उपाय शिक्षकांनीं योजूं नयेत."

ह्या शिक्षेविषयीं युनायटेड स्टेट्समधील मत.

ही सूचना देण्याचें कारण असें दिलें आहे:—अशा तऱ्हेचे हरएक उपाय योजणें म्हणजे ती एक प्रकारची शारीर शिक्षाच होते; व हे उपाय दोषास्पद असून बोर्डानें ते मुद्दाम मना केलेले आहेत." युनायटेड स्टेट्समध्यें मेरीलंड नांवाचें एक संस्थान असून त्यांत बाल्टिमोर म्हणून शहर आहे. तेथील शाळाखात्याचे नियमांत ह्या शिक्षसंबंधानें न्यूयार्क येथील नियमांप्रमाणेंच तिटकारा दर्शविलेला आहे. तथापि न्यूयार्क येथील नियमांइतका स्पष्टपणें ह्या शिक्षेचा निषेध त्या नियमांत केलेला नाहीं. "शाळेंत मुलांस वळण कसें लावावें" ह्या संबंधानें तेथें कित्येक नियम ठरविलेले आहेत; त्यांत पुढील एकच उल्लेख ह्या शिक्षेसंबंधानें आढळतो:—"शाळांचा बंदोबस्त होतां होईतों शरीरशिक्षेशिवाय ठेविला पाहिजे; व अशा प्रकारची शिक्षा करणें भागच पडेल तेव्हां असिस्टंट मास्तरानें ती कधींच करावयाची नाहीं. मात्र हेड मास्तर गैरहजर असून शाळेची व्यवस्था पाहण्याचें काम असिस्टंट मास्तरकडे असेल, तेव्हां हा नियम त्यास लागू नाहीं." ही अमेरिकेंतील स्थिति झाली. आतां प्रशिया देशाकडे लक्ष देऊं.

प्रशिया देशांतील मत.

ह्या विषयासंबंधानें तेथें जो कायदा मंजूर झाला आहे, त्याचा एकंदर भावार्थही अमेरिकेप्रमाणेंच आहे. प्रशियांतील सार्वजनिक शिक्षणाच्या व्यवस्थेचा सामान्य कायदा (जनरल लॉ) १८१९ त मंजूर झाला. पुढें मानसूर व्हिक्टर कझिन ह्यांनीं १८३१ त "प्रशियांतील सार्वजनिक शिक्षणाच्या स्थिती" संबंधानें फ्रेंच सरकारास

एक रिपोर्ट केला असून त्यांत ह्या कायद्याचें फार सूक्ष्म रीतीनें विवेचन केलेलें आहे. ह्या कायद्यांत शिक्षेसंबंधानें स्पष्ट रीतीनें पुढें लिहिल्याप्रमाणें अभिप्राय दर्शविला आहे—" जिच्या योगानें मुलांच्या अब्रूस थोडाबहुत तरी धक्का पोहोंचण्याचा संभव आहे, अशी कोणतीही शिक्षा मुलास कांहीं झालें तरी करावयाची नाहीं; शरीरशिक्षा आवश्यकच असतील तर त्यांत निर्दयपणाचा भाग मुळींच असूं नये; व त्यांच्या योगानें विद्यार्थ्यांच्या विनयवृत्तीस किंवा आरोग्यास कधींही इजा पोहोंचून उपयोग नाहीं. " तेव्हां शरीरशिक्षेचा वरचेवर उपयोग करण्यासंबंधानें अलीकडे पुष्कळ दिवस लोकांस किती तिटकारा आलेला आहे, ह्याचें अनुमान वाचकांस वरील उताऱ्यांवरून पुरतें होईल. शिक्षणाच्या कामीं ह्या शिक्षेचा उपयोग कितपत करावा, ह्या संबंधानें एकमत मुळींच नाहीं. कित्येकांच्या मतें ती थोडीबहुत करण्यास हरकत नाहीं; व कित्येक ह्मणतात कीं, ती अगदींच करावयाची नाहीं. तथापि ह्या सर्व मतांचा ज्यांनीं विचार केला आहे, त्या सर्वांचें मत असें आहे कीं, अशी शिक्षा वारंवार करणें निंद्य होय. शाळेंत मुलांस उत्तम वळण लावण्यास शिक्षा करण्याची फारशी आवश्यकता नाहीं; विद्यार्थ्यांची मानसिक आणि नैतिक उन्नति जसजशी होत जाईल तसतसें हें वळण लागत जाईल. तसेंच विद्यार्थ्यांवर छाप कोणत्या रीतीनें बसवावी ह्याविषयीं नवीन शिक्षकांस मोठी विवंचना पडते; व त्यांस वाटतें कीं, शरीरशिक्षा केल्यानें अशी छाप बसेल. परंतु ह्यांत कांहीं तथ्य नाहीं, असें वरील उताऱ्यांवरून सर्वांच्य

ध्यानांत येईल. तथापि कित्येक गुन्हे असे आहेत कीं, त्यांजबद्दल शिक्षा करणेंच योग्य आहे. मात्र अशी शिक्षा क्वचित् करणें युक्त असलें तरी तो अगदीं निदानीचा उपाय शिक्षकानें समजावा. मुलें प्रौढ होत जातील व त्यांचे आंगीं आत्मसंयमन अधिकाधिक येत जाईल, तसतसा ह्या शिक्षेला फांटा दिला पाहिजे. सारांश, ही शिक्षा केव्हां करावयाची व केव्हां नाहीं, ह्या संबंधानें शिक्षकानें पूर्ण विचार करून आपलीं मतें ठाम ठरविणें अवश्य आहे. शाळेसंबंधीं जीं जीं कामें शिक्षकास करावीं लागतात, त्यांपैकीं शिक्षा करण्याचें काम त्यानें मनांत आल्याबरोबर कधीं करूं नये.

शाळेचा बंदोबस्त शिक्षकास किती चांगला ठेवितां येऊं लागला आहे, ह्याची प्रत्यक्ष परीक्षा पाहण्यास एक बिनचूक साधन आहे. तें असें:—**ज्या शाळेंत शिक्षेचा प्रसंग फार कमी, तेथील बंदोबस्त अति चांगला.** आतां मुलांस उत्तम वळण लावण्याचे कामीं कानाडोळा केला असतां शिक्षा करण्याचे प्रसंग कांहीं दिवस कमी येतील खरे; परंतु तशी स्थिति फार वेळ टिकणार नाहीं. कारण अयोग्य प्रकारची सवलत विद्यार्थ्यांस दिल्यानें वारंवार शिक्षा करण्याचें प्रसंग उत्पन्न होतात. ह्याप्रमाणें शिक्षकाच्या फाजील सवलतीमुळें असे प्रसंग येऊन त्यामुळें विद्यार्थ्यांस शिक्षा भोगावी लागेल, तर त्याचा दोष शिक्षकाकडे येईल. तसेंच विद्यार्थ्यांस सवलती देण्यांत शिक्षकाचा हेतु चांगला असला तरी त्यांनाच त्या फाजील सवलतींचा कंटाळा येतो. कारण अशा कारकीर्दीपासून परिणामीं सर्व विद्यार्थ्यांस दुःख भोगावें लागतें. ह्मणून अशा पोकळ

कारखान्यापेक्षां सर्व वर्गांत एक प्रकारचा उत्कृष्ट बंदोबस्त रहावा, अशी मुलांची नेहमीं इच्छा असते. कारण खरोखर उत्तम बंदोबस्त ठेवण्यास छडीवर कांहीं मुख्य भिस्त ठेवावी लागत नाहीं. शाळेंतील कर्तव्य उत्तम रीतीनें बजावण्याविषयीं हरएक प्रकारें शिक्षक यत्न करील, तरच तो आपलें कर्तव्य इमानें इतबारें बजावितो, असें म्हणतां येईल. अशा रीतीनें मनोभावानें काम करणाऱ्या शिक्षकास विद्यार्थ्यांना शिक्षा करण्याचे प्रसंग आले असतां, फार वाईट वाटेल.

मुलांस शिक्षा कोणत्या प्रकारें करावी ?

मुलांस शिक्षा करण्याचे योग्य * प्रकार कोणते, ह्याचें उत्तर देणें फार कठीण आहे. तथापि पुष्कळ आईबापांना हा प्रश्न इतका घोंटाळ्याचा वाटत असेलसें दिसत नाहीं. आपल्या मुलांस शिक्षक शाळेंत नीट रीतीनें वागवीत नाहीं, अशी टीका त्यांना तेव्हांच करितां येते; परंतु मुलांस त्यानें कोणत्या रीतीनें वागवावें, ह्याविषयीं कांहीं उपयुक्त नियम त्यांना ठरवून देतां येणार नाहींत. शरीरशिक्षेच्या ऐवजीं दुसऱ्या कित्येक प्रकारच्या शिक्षा करण्याचा प्रघात हल्लीं सुरू झाला आहे. परंतु त्या शिक्षाही निर्दोष आहेत असें म्हणतां येणार नाहीं.

---

* **मि. गा**लिंक ह्यांनीं आपल्या शिक्षणपद्धतींत शिक्षा करण्याचे प्रकार पुढें लिहिल्याप्रमाणें दिले आहेत:—(**अ**) दोष देणें; (**ब**) लाजविणें; (**क**) खेळाचा वगैरे तास बंद करणें; (**ड**) मुलांना आनंद देणारी गोष्ट बंद करणें; (**ई**) धडे वगैरे उतरण्यास देणें; (**फ**) मार्क उणे करणें; (**ग**) शरीरशिक्षा; आणि (**ह**) शाळेंतून अर्जी काढून देणें. (भा. क.)

च्यामड्याच्या वादीनें हात फोडून काढण्याची जुनी शिक्षा एक वेळ पतकरेल; पण हल्लीं सौम्य प्रकारच्या म्हणून ज्या कित्येक शिक्षा सुरू झाल्या आहेत, त्या फार वाईट आहेत. शिक्षणप्रसारास त्यांचा कितपत उपयोग आहे ह्याचा कोणीं विचार केला असतां त्याची खातरी होईल कीं, त्या फार अविचाराच्या आहेत. उदाहरणार्थ, मुलांकडून धडे लिहून आणविण्याची शिक्षा घेऊं; मग ती धडे चांगले न केल्याबद्दल असो, अथवा कांहीं गैरशिस्त वर्तन केल्याबद्दल असो. अशा प्रकारची शिक्षा देऊन तिजपासून काय परिणाम घडतात, ह्याचा कोणी लक्षपूर्वक प्रत्यक्ष अनुभव घेईल, तर त्याला ही शिक्षा तेव्हांच बंद करावीशी वाटेल. शिक्षा कोणत्याही प्रकारची असली तरी ती त्रासदायक असणारच. परंतु एकाद्या मुलास त्यानें कांहीं गुन्हा केला असतां त्या दिवसाचे बहुतेक अभ्यास दुसऱ्या दिवशीं लिहून आणण्याची शिक्षा दिली असतां अनेक तोटे आहेत. ह्या शिक्षेमुळें शिक्षणाचे हेतु फार चांगल्या प्रकारें सिद्धीस जावे, असें प्रथमदर्शनीं वाटण्याचा संभव आहे. कारण जो धडा तयार करावयाचा तो लिहून काढिल्यानें मुलांच्या मनांत तो अधिक पक्का ठसेल, अशी कल्पना होणें साहजिक आहे. परंतु ह्या गोष्टीचा शिक्षकानें प्रत्यक्ष अनुभव घेतला असतां त्याला आढळून येईल कीं, अशा तऱ्हेचा इष्ट परिणाम मुळींच घडून येत नाहीं. कारण, दुसऱ्या दिवसाचे अभ्यास तयार करण्यासाठीं मुलांस घरीं जो वेळ मिळणार त्या वेळांतच केव्हां तरी त्यांना हे धडे लिहून काढावे लागतात. कित्येकांस असें

धडे लिहून आणविण्याच्या शिक्षेपासून तोटे.

वाटतें कीं, लहान मुलांनीं देखील मोठ्या माणसांप्रमाणें नऊ दहा तास काम केलें पाहिजे; म्हणून ह्या शिक्षेपासून मुलांस किती त्रास पोहोंचतो, हें त्या लोकांच्या नीटसें लक्षांत येणार नाहीं. आतां मुलांच्या खेळण्याच्या वेळापैकीं कांहीं वेळ कमी होऊन त्याची भर अभ्यासाच्या वेळांत पडावी, अशाच हेतूनें ही शिक्षा द्यावयाची आहे, असें कित्येक ह्मणतील. परंतु तशा दृष्टीनें विचार केला ह्मणजे तर ही शिक्षा अधिक दोषास्पदच ठरते. मुलांच्या मनाला व शरीराला समाधान असेल, तेव्हांच त्यांचें लक्ष अभ्यासाकडे लागेल. परंतु त्यांची खेळाची वेळ कमी केल्यास त्यांच्या मनाला फार वाईट वाटल्याशिवाय राहणार नाहीं. अभ्यासाच्या वेळांत कांहीं कारणानें मुलांस सुटी मिळाली असतां त्यांच्या मनास उत्तेजन येतें; परंतु नियमित वेळापलीकडे त्यांस अभ्यासास लाविल्यानें त्यांचें मन खट्टू होतें. आतां दुसऱ्या दिवसाचे धडे तयार करण्याकरितां जो वेळ घरीं मिळतो त्यांतच मुलांनीं हे धडे लिहून काढावे, असा शिक्षकाचा उद्देश असेल, तरीही परिणाम वाईट घडणार. ह्या दुप्पट अभ्यासामुळें मुलांच्या मानसिक शक्तीवर जास्त ओझें पडून त्यांची हिंमत खचते; व ह्यामुळें अभ्यासाचें सर्व काम मंदावतें. दुसऱ्या दिवसाचे बहुतेक अभ्यास कच्चे राहिले असतां त्याचा दोष ह्या शिक्षेच्या माथीं येतो. कारण हिच्या धास्तीमुळें अभ्यासाकडे मुलांचें नीटसें लक्ष लागत नाहीं व तीं त्रासून जातात. त्यांच्या मनाची ही वृत्ति दुसऱ्या दिवशींही कायम राहते; व तेणेंकरून जास्तच नुकसान होतें. हे दुप्पट अभ्यास नेमिलेल्या वेळांत

चांगल्या प्रकारें करणें मुलाला अशक्य वाटतें; ह्मणून तो धडे फार निष्काळजीपणानें व घाईघाईनें कसे तरी ओरखडून काढितो. ह्यामुळें मुलाच्या शिक्षणांत भर न पडतां उलट नुकसान होऊं लागतें.

सुटीनंतर मुलास कांहीं वेळ अडकावून ठेविल्यापासून तोटे.

तसेंच शाळा सुटून सर्व मुलें घरोघर गेल्यावर एकाद्या मुलास केव्हां केव्हां शाळेंत कोंडून ठेवितात. परंतु अशी शिक्षाही वरील शिक्षेप्रमाणेंच बहुतेक दोषास्पद आहे. मुलानें मोठा गुन्हा केला असतां त्याला एकट्यालाच शाळेंत तास, अर्धा तास अडकावून ठेविल्यानें त्याच्या मनावर कांहीं विशेष चांगला परिणाम घडत नाहीं; परंतु शिक्षकानें ममताळूपणानें त्यास दहा पांच मिनिटें खाजगी रीतीनें दोन गोष्टी सांगून त्याची कानउघाडणी केली तर त्याच्या मनावर बराच सुपरिणाम घडतो. तसेंच ह्या उपायानें मुलांना उत्तम वळणही शिक्षकाला सहज लावितां येतें. केव्हां केव्हां शिक्षकाला इतकीं द्वाड मुलें आढळतात कीं, त्यांना ताळ्यावर आणण्यास काय उपाय योजावे हें त्यास अगदीं सुचत नाहीं. तथापि खाजगी रीतीनें चार गोष्टी सांगण्याचा हा उपाय अशा वेळीं योजिला असतां फारच उपयोग होईल.

शिक्षा करण्याचे मार्ग कोणते ह्या विषयीं बरेंच मतवैचित्र्य असणें साहाजिक आहे. तथापि कोणत्या तरी प्रकारची शिक्षा क्वचित् प्रसंगीं करणें जरूर पडतें, असें मानिल्यास तिचा उपयोग होणें न

शिक्षा मोठमोठ्या गुन्ह्यांकरितांच केली पाहिजे.

होणें हें ती ज्या उद्देशानें दिली असेल, त्यावर बहुतांशीं अवलंबून राहील. ज्यानें प्रत्यक्ष गुन्हा केला असेल त्याच्या मनांत ती पक्की बिंबलीच पाहिजे. शिवाय, वर्गांतील इतर विद्यार्थ्यांच्या मनांवरही तिचा सुपरिणाम झाला पाहिजे. त्यांची खातरी झाली पाहिजे कीं, गुन्हा फार मोठा असल्यामुळेंच शिक्षकाला ती करणें भाग पडलें. गुन्हा इतका मोठा असला पाहिजे कीं, त्यामुळें शिक्षकाच्या मनाला साहजिकपणें वाईट वाटलें पाहिजे, व अगदीं निरुपाय झाल्यामुळेंच शिक्षा करण्याचें कष्टदायक कृत्य त्याला करावें * लागलें असलें पाहिजे.

येथें इतकेंच सिद्ध करावयाचें आहे कीं, शाळेचा बंदोबस्त ठेवण्यासाठीं शिक्षेवरच सर्वकाळ भिस्त ठेवून उपयोग नाहीं. एकादा मोठा गुन्हा मुलांकडून घडेल तेव्हां हा निदानीचा उपाय ह्मणून योजावयाचा आहे व असा प्रसंग प्राप्त झाल्याबद्दल शिक्षकाच्या मनाला वाईट वाटलें पाहिजे. तसेंच शाळेंत बंदोबस्त ठेवावयाचा तो सर्वांच्या हितार्थ असून कितीही त्रास पडला तरी त्यास व्यत्यय येऊं द्यावयाचा नाहीं; असा शिक्षकाचा निर्धार असला पाहिजे. ह्मणून असत्य भाषण किंवा अप्रामाणिकपणाचें, निर्दयपणाचें अथवा इतर कोणत्याहीप्रकारचें

---

* अपिंगहाम येथील शाळेचे हेड मास्तर रेव्हरेंड ई. थ्रिंग एम्. ए., ह्यांनीं "शिक्षण आणि शाळा" (Education and School) ह्या नांवाचें पुस्तक लिहिलें असून त्यांत शिक्षेसंबंधीं सर्व विषयांचें विवेचन मोठ्या मार्मिक रीतीनें केलें आहे. हें पुस्तक म्याक्मिलन आणि कंपनी यांनीं १८६४ त छापिलें असून त्याच्या २२१ व्या पृष्ठांत हें विवेचन सांपडेल.

अनीतीचें वर्तन कोणी मुलगा करील व तेणेंकरून ह्या बंदोबस्तास व्यत्यय आणील; तर ती गोष्ट आपणास खपावयाची नाहीं, अशी सर्व मुलांची खातरी करण्यासाठीं शिक्षा करावयाची आहे.

वर कित्येक प्रकारचे गुन्हे दर्शविले आहेत तेवढ्यांपुरताच ह्या शिक्षेचा उपयोग कसा करितां येईल, असा प्रश्न उद्भवतो. ह्याचा उलगडा होण्यासाठीं कित्येक सूचना करणें इष्ट आहे.

क्षुल्लक अपराधांबद्दल किती शिक्षा असावी.

विशेष क्षुल्लक गुन्हे असतील त्यांवर नुसती नजर ठेवावी; वर्गांतील सर्व मुलांदेखत त्यांची चर्चा करूं नये. एकादा विद्यार्थी आपण होऊन सुमार्गानें चालण्यास झटत आहे असें स्पष्टपणें ध्यानांत आलें तर त्याचा अपराध आपल्या लक्षांत आला आहे असें देखील शिक्षकानें त्याला दर्शविलें नाहीं तरी चालेल. परंतु इतर मुलांच्या संबंधानें शिक्षकानें असें करावें कीं, गुन्ह्याबद्दल सर्वांसमक्ष त्यास बोलूं नयेच; तथापि तो आपल्या ध्यानांत आला आहे, इतकें गुन्हेगाराच्या लक्षांत येईल असें करावें. अशा रीतीनें वर्तलें असतां अनेक वेळां फार फायदा होतो. नुसत्या नजरेनें गुन्ह्याबद्दल मुलांची पुरी फजिती होते; असें अनुभवास येईल. विद्यार्थ्यांच्या गैरवर्तनाबद्दल होतां होई तों बारीकसारीक शिक्षा कराव्या, व त्याही गुप्त रीतीनें कराव्या; ह्मणजे शिक्षकाकडून मुलांस फाजील शिक्षा होण्याचा संभव आपोआप नाहींसा होईल.

शिवाय हेंही ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, विद्यार्थ्यांचें वर्तन मर्यादशीर असून त्यांच्या आंगीं मनोनिग्रह अस-

ला पाहिजे. तथापि शिक्षकानें त्यांस फाजील सवलती दिल्यास ह्या दोन गुणांना अनुसरून मुलांचें आचरण राहीनासें होतें. ह्यामुळें पुढें शिक्षकाची त्यांजवर गैरमर्जी होते. शिक्षक आपण होऊन मुलांना सवलती देतो, व अशा सवलती मिळाल्यामुळें मुलें निर्भयपणें मनसोक्त वागूं लागतात. अखेरीस गोष्ट निकरास गेली म्हणजे त्यांना पुन्हां ताळ्यावर आणणें शिक्षकास भाग पडतें. वास्तविक पाहिलें असतां प्रथम मुलांस मोकळें सोडून तीं भकल्यानंतर त्यांना ताळ्यावर आणण्यासाठीं सक्तीचे उपाय योजणें, हा न्याय कोठला? म्हणून सद्वर्तनाविषयीं मुलांच्या मनांत उत्कट इच्छा उत्पन्न करा; आणि ती नेहमीं जागृत ठेवा. असें झालें असतां त्यांना वांकडया मार्गानें जाण्यास फारसा मोह पडणार नाहीं. शिक्षकाचें मत आपल्याविषयीं चांगलें असावें अशी विद्यार्थ्यांना स्वभावतः इच्छा असतेच; तिचा उपयोग लक्षपूर्वक करून घेतला पाहिजे. ह्यास्तव मुलांनीं सत्कृत्य केलें असतां त्याबद्दल आपली पसंती दर्शवून त्यांस *उत्तेजन देण्याचे प्रसंग अगदीं फुकट घालवूं नका. मुलांच्या मनाची प्रवृत्ति दुराचरणाकडे न होऊं देण्याचे जे उत्तम उपाय आहेत त्यांतीलच, तीं सदाचरणानें चालत असतां त्यांस उत्तेजन देणें, हा उपाय आहे. शि-

सद्वर्तनाबद्दल उत्तेजन देऊन त्यांस दुर्वर्तनापासून परावृत्त करावें.

* मि. गार्लिक यांनीं उत्तेजन देण्याचे मार्ग पुढील सुचविले आहेत :—( अ )वर नंबर देणें; ( ब ) संमानदर्शक फीत, टोपी, वगैरे देणें; ( क ) वर्गांत सेक्रेटरीचा किंवा इतर अधिकार देणें; ( ड ) बक्षिसें देणें; आणि ( ई ) शाबासकी वगैरे देणें. (भा. क.)

क्षकानें आपल्या सद्वर्तनाबद्दल शाबासकी दिली म्हणजे त्यांना समाधान वाटतें, व आपल्या वर्तनांत अधिकाधिक सुधारणा करण्यास तीं विशेष उत्सुकतेनें झटतात. आपली अति निराशा किंवा मोठें नुकसान होऊं नये, अशी मुलांची इच्छा असते; त्याचप्रमाणें मुलांना नेहमीं वाटतें कीं, सर्व गोष्टी आपल्या मनाप्रमाणें व्हाव्या. तसेंच चारचौघांत आपली फजिती कधींही होऊं नये अशीही त्यांची इच्छा असते; म्हणून गुन्हे करण्यास तीं फारशीं प्रवृत्त होत नाहींत.

विशेष लक्ष पुरविण्यासारखी गोष्ट ही आहे कीं, आज्ञाधारकपणाचा गुण मुलांस अगदीं लहानपणापासून लावणें फार अवश्य आहे. उजळणीच्या वर्गापासूनच सांकेतिक शब्दांच्या आधारानें मुलांच्या चलनवलनादि सर्व क्रिया ठरविल्यास त्यांना वळण लावण्यास फार सुलभ जातें. जाग्यांवरून उठणें; जाग्यांवर बसणें; किंवा लघवीस जाणें; इत्यादि क्रिया सर्व मुलांकडून एकदम करविल्या असतां ह्या कामीं फार मदत होते; व अशा रीतीनें शिक्षण मिळालें असतां, त्यांना मोठी मौजही वाटते. अशा प्रकारची पद्धति अमेरिका खंडांतील कित्येक शाळांतून आढळते, व ती वाखाणण्यासारखी आहे. वर्गांतील अभ्यास सुरू होण्यापूर्वीं तिकडे मुलांची थोडी कवाईत घेतात, व ह्या कवायतीस मुलें शाळेंतील मुख्य दालनांत शिरल्याबरोबर आरंभ होतो. लंडन शहरांतील स्कूल बोर्डानें तेथील शाळांकरितां एक प्रकारचीं घडी करितां येण्याजोगीं मेजें पसंत ठरवून दि-

आज्ञानुवर्तनाचा गुण आरंभींच लाविला पाहिजे.

लेलीं आहेत. त्यांचा उपयोगही अशा प्रकारचें शिक्षण देण्यासाठीं तेथील शिक्षक चांगल्या रीतीनें करून घेतात. प्रत्येक मेज दोन दोन मुलांपुरतें असतें. हीं मेजें रांगांनीं मांडिलेलीं असतात; परंतु जाण्यायेण्याचा रस्ता नेहमींप्रमाणें मागल्या बाजूनें न ठेवितां दोन मेजांच्या टोंकांमधून ठेविलेला असतो. मेजाचा पुढील भाग— लिहितांना मुलें ज्यावर हात टेकितात तो भाग — सर्वांस बाहेर पडतां यावें ह्मणून मागल्या आंगांस दुमडून ठेवितां येतो. जो मुलगा आपल्या मेजाच्या उजव्या आंगानें जाऊं लागतो, त्याला शेजारच्या मेजाच्या डाव्या आंगानें येणारा मुलगा भेटतो. ह्या रीतीनें मुलें येऊं लागलीं म्हणजे त्यांचा घोंटाळा होऊं नये, म्हणून असें ठरविलें असतें कीं, उजव्या आंगानें येणाऱ्यानें पुढें व डाव्या आंगानें येणाऱ्यानें मागें उभें रहावें. अशी मुलांची एकदां समजूत घालून दिली ह्मणजे पुढील कवाईत १,२,३ ह्या सांकेतिक अंकांवर व्हावयाची; ह्मणजे, "१" म्हटलें असतां "मेजें दुमडा", "२" म्हटलें असतां "उभें रहा" व "३" म्हटलें असतां "मेजांच्या रांगांतून चला" असें *समजावयाचें. शिक्षकानें आंकडा उच्चारण्याची खोटी, कीं मुलांनीं त्याप्रमाणें कृति केलीच. अशा तऱ्हेच्या हरएक करामतीपासून मुलांस वळण लागण्याचे कामीं मदत हो-

---

मराठी शाळांतून मुलांस बसावयास साधीं बाकेंही आपल्याकडे मिळण्याची पंचाईत; तेव्हां वर दर्शविल्या प्रकारचीं फार किमतीचीं मेजें कोठून मिळणार ? तथापि मुद्दा इतकाच आहे कीं, अभ्यासाच्या विषयांत मधून मधून मुलांस करमणूक होण्यासाठीं शिक्षकानें त्यांजकडून अशा प्रकारची कवाईत करवावी. ( भा क. )

ते. कारण आज्ञा तत्काळ पाळिली पाहिजे, ह्या तत्त्वाचें शिक्षण त्यांस ह्यामुळें मिळतें. अशी कवाईत त्यांजकडून भराभर करविली असतां त्यांना अति मौज वाटते. तसेंच ह्या कवायतीच्या वेळीं एकाद्या वाद्याचा उपयोग करून त्याच्या तालावर त्यांस थाटानें चालविल्यास तर त्यांना अतिच आनंद होतो. मुलांस वर्गांत एकदम जमवितांना किंवा त्यांस वर्गाबाहेर सोडून देतांना त्यांजकडून व्यवस्थित रीतीनें अशी थोडीशी कवाइत करविण्याकडे शिक्षक थोडा वेळ खर्च करील, तर तो फुकट जाणार नाहीं. मुलांस वळण लावण्यासाठीं हाच उपाय जर्मनींत व अमेरिकेंत बहुधा योजितात. न्यूयार्क शहरांतील थर्टीन्थ स्ट्रीटवर ( तेराव्या रस्त्यावर ) एक शाळा आहे. त्या शाळेंतील मुलें वर्गांत शिरतात तीं कवायतीच्या थाटानें शिरतात. मुलें वर्गांत शिरतांना इतकी उत्कृष्ट कवाईत कोठेंही आढळावयाची नाहीं. तिचें वर्णन पुढें थोडक्यांतच दिलें आहे:-त्या शाळेंत एक मुख्य दिवाणखाना असून त्यांत एक प्लाटफार्म ( शिक्षकास बसण्यासाठीं एक उच्च स्थान ) आहे. हा दिवाणखाना चवथ्या मजल्यावर आहे. ९ वाजण्यास १०।१५ मिनिटें कमी असतां शाळेचे हेड मास्तर ह्या प्लाटफार्मवर येऊन बसतात. नंतर ९ च्या टोल्याबरोबर एक मुलगा आंत येतो, व प्लाटफार्मच्या मागील भिंतीस कांहीं घांटा ओळीनें टांगिलेल्या असतात, त्या किंचित् वाजवितो. इतक्यांत प्लाटफार्मच्या समोर एक बाज्याची पेटी ठेविली असते, तिजपाशीं एक शिक्षक येऊन बसतो, व कवायतीच्या चालीचे वेळीं जो ताल वाजवावयाचा तो सुरू करितो. त्या दिवाणखान्यांत शिरण्यास नि-

रनिराळे पांच दरवाजे आहेत. ह्या दरवाज्यांतून तो ताल सुरू झाल्याबरोबर मुलें एकामागून एक रांगेनें आंत येऊं लागतात. तेव्हां तीं एकमेकांस अगदीं चिकटून येतात असें म्हणण्यास हरकत नाहीं. लष्करी कवायतींत जितकी टापटीत दिसते, तितकी टापटीप ह्या मुलांच्या कवायतींत आढळते. अशा रीतीनें डावा पाय विशेष जोरानें आपटीत आपटीत ही कवायतीची चाल सुरू होते, वशेवटीं शेवटीं ह्या पांच रांगा एकमेकींत मिसळून कांहीं रांगा बाकांच्या पुढील बाजूनें चालूं लागतात. ह्याप्रमाणें थोड्याच वेळांत एक हजार मुलें त्या दिवाणखान्यांत आपापल्या जागीं बसतात, व तो गच्च भरून जातो. ह्या सर्व कृत्यांस फार तर ४।५ मिनिटें लागतात. पुढें एकादा शिक्षक पवित्र शास्त्रांतील (बैबलांतील) कांहीं मजकूर मुलांस वाचून दाखवितो. नंतर मुलें ईश्वराच्या *प्रार्थनेचीं कांहीं पद्यें मोठ्या सुरावर म्हणतात व कित्येक मुलें एकादा निबंध

---

* अशा प्रकारें धर्मशिक्षण आपल्या शाळांतून मुळींच दिलें जात नाहीं, व मुलांच्या मनावर केवळ एकच तऱ्हेच्या शिक्षणाचा संस्कार झाल्यामुळें त्यांचे धर्मविषयक व नीतिविषयक विचार अपक्क राहतात; असा हल्लींच्या शिक्षणपद्धतीवर मोठा अपवाद आहे. अनेक धर्मांचीं व जातींचीं मुलें इकडील शाळांतून असल्यामुळें शाळांतून धर्मशिक्षण देणें कठीण आहे खरें. तथापि ही उणीव हरतऱ्हेनें होईल तितकी भरून काढण्याचे उपाय योजणें इष्ट आहे. ईश्वराचें आस्तित्व सर्व धर्मांस मान्य आहेच. तेव्हां त्याच्या थोरवीविषयीं सामान्य पद्यें तयार करून त्यांच्या आधारें सामान्य तत्त्वांवर सर्वांस धर्मशिक्षण देण्याचा कांहीं मार्ग निघेल तर बरें. ( भा. क. )

वाचून दाखवितात किंवा इतर कांहीं पद्यें म्हणतात. हें सर्व आटोपल्यानंतर परत कूच करण्यासाठीं शिक्षक निराळयाच तालावर वाजवूं लागतो. तेव्हां थोड्याच वेळांत बहुतेक मुलें दिवाणखान्याबाहेर जाऊन आपल्या वर्गांत जातात. कांहीं लहान लहान वर्ग मात्र त्या अफाट दिवाणखान्याच्या निरनिराळ्या भागांत राहतात.

अशाच प्रकारची कवाईत जर्मनींतील शाळांतूनही आढळते. तेथील एका शाळेंतील एका मोठ्या वर्गाच्या कवायतीची हकिकत पुढें दिली आहे. परंतु वरील कवायतींत व हींत बराच फरक असल्यामुळें

जर्मनींतील कवायतीचें उदाहरण.

ह्यांचे परिणाम भिन्न भिन्न प्रकारचे होणें साहजिक आहे. तेथें सर्व शाळेची कवाईत एकदम घेत नाहींत. वर्गावर्गाची निरनिराळी घेतात. मंदमंद चालीपासून तों जलद धांवण्यापर्यंत निरनिराळ्या प्रकारची कवाईत वर्गांतील सर्व मुलांकडून करवितात. प्रथम मुलांस हळूहळू चालावयास लावितात; व बसणें, उठणें वगैरे कित्येक ठराविक कवाईत त्यांजकडून करवितात. नंतर चाल थोडी जलद करितात, आणि अखेरीस दुपटीपर्यंत आणितात. ह्या चालींत एकेक मुलांची ओळ असून मुलें सरळ रेषेंत चालत नाहींत; तर समुद्राची लाट वर खालीं होतांना जशी कमान उत्पन्न होते त्याप्रमाणें कमानदार चालतात, व ह्यामुळें पाहणारास मोठीच मौज वाटते. धांवण्याची चाल सुरू असतां मध्येंच चालीचा वेग निमे किंवा पाव करण्याची इशारत शिक्षक देतो, व त्याप्रमाणें सर्व रांगेंतील मुलांकडून एकदम अंमल होतो. मुलांना वरचेवर निरनिराळ्या सूचना देण्यां-

त येतात; व चालीच्या वेगांत वारंवार बदल करण्यांत येतो. ह्यामुळें मुलांस विशेष लक्ष ठेवावें लागून त्यांच्या आंगीं विशेष चलाखी येते. अशा प्रकारची कवाईत जर्मनींत मुलींच्या वर्गांतही शिकवितात; व मुलींना ह्या कवायतीची फार मौज वाटते. कांहीं तरी चळवळ करण्याची मुलांना स्वभावतःच हौस असते; ती अशा कवायतीनें तृप्त होते. शिवाय त्यांस एक प्रकारची विश्रांति मिळून चांगलें वळणही लागतें. असा दुहेरी फायदा ह्या कवायतीमुळें होतो. मुलांनीं शिक्षकाची आज्ञा नेहमीं मनोभावानें पाळणें इष्ट आहे; व हा उद्देश अशा प्रकारच्या कवायतीची सवय त्यांस लाविल्यानें फार चांगल्या रीतीनें तडीस जातो.

शिक्षकांनीं हें नेहमीं पक्कें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, मुलांचा बंदोबस्त शांतपणानें ठेविला तरच त्यांस उत्तम वळण लागेल. विद्यार्थ्यांस कित्येक शिक्षक अधिकाराच्या झोंकांत वरचेवर मोठ्यानें ओरडून हुकूम करीत असतात. कारण मोठ्यानें ओरडल्यानें मुलें घाबरून जाऊन आपला हुकूम तेव्हांच मानितील, अशी त्यांची समजूत असते. परंतु ही समजूत वेडगळपणाची आहे. मुलांस हुकूम करणें तो शांतपणानें केला असतां त्या योगानें मुलेंही शांतवृत्तीचीं होतात. शांतपणानें हुकूम दिले असतां मुलांच्या मनावर दोन परिणाम घडतातः—( १ ) शिक्षकाची आज्ञा पाळणें अवश्य आहे; आणि ( २ ) आपल्या शिक्षकाच्या आंगीं बरेंच सामर्थ्य आहे. परंतु जरूर पडल्याशिवाय त्याचा उपयोग तो क-

शाळेचा बंदोबस्त ठेवण तो आरडाओरडा न करितां शांतपणानें ठेवावा.

रीत नाहीं. कित्येक शिक्षक टेबलावर जोरानें छडी आपटून मोठ्यानें ओरडून हुकूम करितात कीं, "चूप रहा." परंतु अशा उपायानें इष्ट हेतु कधींच साध्य होत नाहीं. एकादी पागोळी सरळ पडत असतां मध्येंच वाऱ्याचा झटका आला तर तिची दिशा बदलते खरी; परंतु वारा बंद झाल्याबरोबर ती पूर्ववत् पडूं लागते. त्याचप्रमाणें मोठ्यानें ओरडून मुलांस हुकूम दिले असतां मिनिट अर्ध मिनिट मात्र गोंगाट बंद होईल. आपणास कांहीं अधिकार आहे, व तो इतरांस मान्य करावयास लावण्यापुरतें सामर्थ्यही आपल्या आंगीं आहे; अशी लोकांची खातरी करावयाची असल्यास तो अधिकार शांतपणें चालविणें हाच उत्कृष्ट मार्ग होय. हा नियम सर्व खात्यांना लागू आहे, असें अनुभवावरून ठरतें. उदाहरणार्थ, अत्लांतिक महासागरांत फिरणारी एक मोठी आगबोट घेऊं; व हींत एक हजारांवर उतारू आहेत, अशी कल्पना करूं. हिच्यावरील कप्तानाचा अधिकार किती असतो याचा विचार करा. तो आगबोटींत अगदीं पुढल्या अगर मागल्या बाजूस न राहतां मध्यभागीं राहतो. तो प्रत्यक्ष भाषण क्वचित् करितो, व बोलतो तेव्हां आपल्या हाताखालच्या अंमलदाराशीं नेहमींप्रमाणेंच शांतपणानें बोलतो. तो अंमलदार कप्तानानें दिलेला हुकूम आपल्या शेजारच्या अंमलदारास कळवितो; व ह्या रीतीनें तो योग्य कामगारास पोहोंचतो. सुकाणूं फिरविणारा व कप्तान यांजमध्यें बरेंच अंतर असतें. परंतु आगबोट कसकशी वळवावयाची हें कप्तान होकायंत्राजवळील कामगारास बोटानें दाखवितो. तो त्या प्रमाणें यंत्राचे कांटे फिरवितो व हें यंत्र

सुकाणदारास दिसेल अशा बेतानें ठेविलेलें असल्यामुळें तो त्याप्रमाणें सुकाणूं फिरवीत असतो. परंतु असे हुकूम कप्तानाकडून सुटत आहेत, हें बोटीवरील अनेक लोकांपैकीं कोणाच्याही लक्षांत येत नाहीं, ही मौजेची गोष्ट आहे. क्वचित् जरूर पडेल तर मात्र कप्तान हुकून मोठ्यानें देतो व तेव्हां तो उतारूंना कळतो. खरोखर बंदोबस्त कसा राखावा ह्याचें हें उदाहरण अनुकरणीय आहे. वर्गांत अशा गुप्त रीतीनें शिक्षक अधिकार चालवील तर परिणाम फार हितावह होईल. सारांश, विद्यार्थ्यांस हुकूम देण्याचे कामीं प्रत्यक्ष वाचाशक्तीचा उपयोग करण्यापेक्षां शिक्षकांनीं नजरेचा उपयोग वारंवार करावा. कारण, अशा रीतीनें आपला आवाज विनाकारण न शिणवितां नुसत्या नजरेनें तो काम चालवील तर त्यांत फार फायदा आहे, असें त्यास आढळून येईल.

---

# प्रकरण ३ रें.

## शाळेंतील शिक्षण.

शाळेंत अनेक विषयांचा अभ्यास चालतो. त्यांपैकीं विशेष महत्त्वाचे कोणते व कमी महत्त्वाचे कोणते, ह्या प्रश्नाचा निर्णय येथें ठरवावयाचा नाहीं. हा प्रश्न वादग्रस्त असून ह्या संबंधानें पुष्कळ चर्चा झालेली आहे. शिक्षणाचा मुख्य हेतु सिद्धीस जाण्यास ह्या प्रश्नांचा विचार करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. कोणत्याही विषयाचें उत्कृष्ट रीतीनें शिक्षण देण्यास काय उपाय योजिले पाहिजेत, व शिक्षणाच्या कामीं यश येण्यास अवश्य गोष्टी कोणत्या; एवढ्यापुरताच येथ विचार करणें आहे.

*शाळेंत शिकवावयाच्या अनेक विषयांची योग्यता येथें ठरवावयाची नाहीं.*

विद्यार्थ्यांचें वय कितीही असो, तसेंच ते कोणत्याही वर्गांतील असोत; त्यांस शिक्षण देण्याचे कामीं पहिली अवश्य गोष्ट म्हटली म्हणजे, त्यांचें लक्ष आपल्याकडे वेधून घेणें व तें सतत आपणाकडे राहील असें करणें, ही होय. ह्यास्तव शिक्षण अशा रीतीनें दिलें पाहिजे कीं, तिकडे विद्यार्थ्यांचें लक्ष वेधून जाईल. अशा रीतीनें तें न दिल्यास त्याचा योग्य परिणाम मुलांवर घडावयाचा नाहीं. खालच्या खालच्या वर्गांतून तर

*मुलांचें लक्ष सतत आपल्याकडे लावून घेण्याची आवश्यकता.*

ह्याच गोष्टीकडे विशेष लक्ष देणें जरूर आहे. लहान लहान मुलें तर अधिक चंचळ असतात. परंतु त्यांचें देखील लक्ष शिक्षकानें अभ्यासाकडे लागेलसें केलें पाहिजे; व ह्यासाठीं हरएक उपाय योजिले पाहिजेत. शाळेंत मुलांच्या वर्तनावर आरंभीं आरंभीं जो दाब असतो, त्याचा लहानपणीं त्यांना विशेषच त्रास वाटतो. कोणताही नवीन पदार्थ नजरेस पडल्याबरोबर लहान मुलांचें त्याजकडे लक्ष वेधतें, व त्या पदार्थाचा नवशीकपणा कायम असतो, तोंपर्यंत त्यांचें तिकडे लक्ष राहतें. तसेंच मनास मानेल त्याप्रकारें एकामागून एक अनेक चाळे करण्याची त्यांच्या मनाची प्रवृत्ति असते. तेव्हां ह्या दोन बाबतींत त्यांस एकदम न दाबितां त्यांना हळू हळू दुसऱ्याच्या दाबांत राहण्याची सवय लाविली पाहिजे. सारांश, दुसऱ्याच्या तंत्रानें वर्तण्यास त्यांना लावण्याचा आरंभ शिक्षकानेंच केला पाहिजे. आतां कोणी म्हणतील कीं, ह्यांत विशेष तें काय करावयाचें आहे? विद्यार्थ्यांनीं शिक्षकाच्या तंत्रानें चाललेंच पाहिजे; मग त्यांची तशी इच्छा असो वा नसो. हें म्हणणें प्रथमदर्शनीं अगदीं खरें वाटणार आहे; परंतु ह्याचा जास्त विचार केला पाहिजे. लोकांत अशा कित्येक म्हणी पडून जातात कीं, त्यांत फारसा अर्थ नसतो. तथापि त्या वरचेवर आपल्या कानावरून गेल्यामुळें त्या खऱ्या आहेत किंवा खोट्या आहेत, ह्या संबंधानें जास्त विचार करण्याकडे आपल्या मनाची प्रवृत्तिच होत नाहीं. "शिक्षकाची आज्ञा विद्यार्थ्यांस शिरसा मान्य असावी." ही म्हण अशाच प्रकारची आहे. कारण आपणास केवळ अधिकाराच्या जोरावर कांहीं मुलांचें लक्ष लावून घ्यावयाचें नाहीं. शिक्ष-

काचें काम करीत असतां अधिकाराचा उपयोग शिक्षकाला वारंवार करावा लागेल खरा; परंतु " तुम्हांस लक्ष दिलेंच पाहिजे. " असा हुकूम फरमाविल्यानें मुलें लक्ष देतील हें मिथ्या. तेव्हां शिक्षणाकडे मुलांचें लक्ष लावण्यास आपला अधिकार हा बिनतोड उपाय आहे असें मानून एकादा शिक्षक त्याचा उपयोग करूं लागेल, तर तो त्याचा मोठाच प्रमाद होय. लहान वयांत मुलांच्या मनाला वळण मुळींच लागलेलें नसतें, हें ध्यानांत आणून त्या स्थितीस जुळतील असे उपाय त्यांचें लक्ष लावण्याचे कामीं त्यानें योजिले पाहिजेत. ज्या गोष्टींत मौज वाटते, तिकडे मुलांचें लक्ष वेधतें, असा सामान्य नियम आहे. ह्यासाठीं अभ्यासाकडे लक्ष लावण्याची सवय मुलांस लागावी, ह्मणून मुलांना मौज वाटेल असे उपाय योजणें हें शिक्षकाचें कर्तव्य आहे. कोणत्याही विषयाचें शिक्षण देणें तें मुलांस मनोरंजक होईल अशा रीतीनें देण्याची जबाबदारी शिक्षकावर पडते. फार कशाला, एकादा ग्रंथकार, नामांकित वकील, व्याख्यानकार किंवा वक्ता घ्या; ह्या सर्वांना हा नियम लागू आहे. ह्मणजे दुसऱ्यांच्या मनांत एकादा विषय भरवून देण्यास सुलभ उपाय कोणते, ह्याचा विचार त्यांस अवश्य करावा लागतो. तेव्हां लोकांची कोणत्याही विषयासंबंधानें समजूत घालण्यास हरएक धंद्याच्या मनुष्यास सामान्यत्वें जें कांहीं करावें लागतें, तेंच काम शाळेंत शिक्षकाला करावयाचें असतें. ह्या धंद्याची वास्तविक योग्यता किती आहे, व ह्या धंद्यामुळें शिक्षकाच्या हातीं किती सत्ता येते, ह्याचा निर्णयही वरील गोष्टींवरून होतो. विद्यार्थ्यांस उत्तरोत्तर जें विशेष महत्त्वाचें शि-

क्षण मिळावयाचें, त्याचा पाया प्रारंभीं शाळेंत शिक्षकां-कडूनच घातला जातो; ह्याचा विचार केला म्हणजे तर ह्या धंद्याचें महत्त्व फार ठरतें. मुलाच्या शिक्षणाचा आ-रंभ त्याजकडून होतो; व असें शिक्षण मुलास पुढें जन्म-भर मिळावयाचें असतें. लहानपणीं शिक्षक विद्यार्थ्यांस कित्येक विषयांची माहिती करून देतो; म्हणजे त्या वि-षयांपुरतेंच फक्त शिक्षण त्यांना मिळतें असा भाव नाहीं. तर त्यांच्या मनाची ग्रहणशक्ति वाढवून त्यांच्या आंग-चा चौकसपणाही तो वाढवीत असतो. तसेंच हे दोन गुण जेव्हां देशांतील विद्यार्थ्यांच्या आंगीं येतील, तेव्हांच त्या देशाचें बुद्धिसामर्थ्य वाढत जाईल. शिक्षकाची योग्यता कांहीं सामान्य नाहीं. निरनिराळ्या धंद्यांतील लोकांना आरंभीं शिक्षण ह्यांच्याकडूनच मिळतें. पहा, आपल्या मुलांबाळांस व नातूपणतूंस शिकविण्यासाठीं जे शिक्षक पुढें तयार व्हावयाचे, त्यांस तरी शिक्षण कोणा-कडून मिळतें ? तसेंच खरें कोणतें, खोटें कोणतें, इत्यादि गोष्टींचा निष्पक्षपातानें न्याय करणाऱ्या न्यायाधीशांच्या बुद्धीसही लहानपणीं शिक्षकाकडूनच वळण लागतें. सा-रांश, मोठमोठे शिक्षक, न्यायाधीश व इतर कामगार ह्यांना लहानपणीं जें वळण लागावयाचें, तें ह्या शिक्षक-वर्गाकडूनच. यावरून हा धंदा किती महत्त्वाचा आहे, हें स्पष्ट ध्यानीं येईल.

मुलांचें लक्ष लावून घे-ण्याचे कामीं त्यांच्या नेत्रें-द्रियाचा व श्रवणेंद्रियाचा उपयोग.

विद्यार्थ्यांच्या आंगीं स्वभावतःच जिज्ञासा असते; व हिचा उपयोग अभ्यासाकडे त्यांचें सतत लक्ष लावण्याचे कामीं शिक्षकास होतो. तथापि मुलें

स्वभावतः फार चंचल असल्यामुळें त्यांचें अभ्यासाकडे सतत लक्ष लावण्यास शिक्षकाला फार त्रास पडतो. सारांश, मुलांच्या आंगची जिज्ञासा हें शिक्षकास अनुकूल साधन आहे खरें; परंतु त्यांची चंचलवृत्ति प्रतिकूल होय. ह्या चंचलवृत्तीमुळें शिक्षणास अडथळा येऊं नये, अशा रीतीनें त्यांच्या आंगच्या जिज्ञासेचा उपयोग करून घ्यावयाचा आहे. [मुलांमध्यें ज्ञानप्राप्तीचा हुरूप उत्पन्न करणें, तो निरंतर कायम राखणें, इतकेंच नाहीं तर तो दिवसेंदिवस वृद्धिंगत करणें;] ह्या तीन गोष्टी शिक्षणाचे कामीं यश येण्यास अवश्य आहेत. ह्या संबंधानें शिक्षकानें विचार करण्यासारखे अनेक मुद्दे आहेत. इंद्रियांच्या द्वारें होणारें ज्ञान विद्यार्थी फार त्वरित ग्रहण करितात. ह्यास्तव अभ्यास सुरू असतां त्यांचें नेत्रेंद्रिय व श्रवणेंद्रिय हीं दोन्ही कामीं लावितां येतील, तर शिक्षणाचा ठसा त्यांजवर उत्तम वठेल. अशा रीतीनें एकाच काळीं ह्या दोन्ही इंद्रियांच्या साधनानें त्यांच्या मनावर ठसा उमटविला असतां यश येण्याचा संभव अधिक आहे. शिक्षणाच्या कामीं दृष्टीचा उपयोग फार होतो, हें सर्वांस मान्य आहे. एकादा विषय नुसता ऐकिला तरी देखील त्याचें यथार्थ ज्ञान होतें, असें पुष्कळांचें मत आहे. हें मत कितीही समर्पक असलें तरी हें ज्ञान होतां होई तों नेत्रेंद्रियाच्या द्वारें मिळविण्याकडे प्रत्येकाचा स्वभावतः कल असतो. पहा, एकादा वक्ता व्याख्यान देत असतो, व त्याचें सर्व भाषण आपणांस ऐकूं येत असतें; तथापि त्याला प्रत्यक्ष पाहण्याची इच्छा आपणांस असते. प्रत्येक अनुभवी वक्त्याला हें माहीत असतें कीं, आपलें भाषण

श्रोत्यांस ऐकूं गेलें, परंतु आपण त्यांच्या नजरेस पडलों नाहीं तर आपल्या आंगची बरीच वक्तृत्वशक्ति व्यर्थ घालविल्याप्रमाणें होईल. एकादें संगीत नाटक पाहण्यास आपण जातों; तेव्हा पात्रांचीं गाणीं आपणांस स्पष्ट ऐकूं येत असलीं तरी त्यांचे हावभाव वगैरे प्रत्यक्ष पाहण्यासाठीं आपली केवढी तारंबळ उडते; ह्याचा अनुभव बहुतेकांस आहेच. अशा प्रसंगीं आपण हे हावभाव मुळींच न पाहतां नाटक केवळ डोळे मिटून कानांनीं ऐकिलें, तर नाट्यकाराचें खरें ह्रद्गत आपणांस कळण्याचा विशेष संभव आहे खरा. परंतु ते हावभाव प्रत्यक्ष पाहण्यासाठीं आपणा बहुतेकांचे नेत्र इतके आतुर झालेले असतात कीं, नुसत्या गाण्याच्या आलापांनीं आपलें पूर्ण समाधान होत नाहीं. एकादी गोष्ट प्रत्यक्ष पाहण्यांत मोठ्या माणसांसही ह्याप्रमाणें मौज वाटते; तर मुलांमुलींना ह्यांत विशेषच मौज वाटावी ह्यांत नवल काय ? ह्याच कारणानें कोणताही विषय शिकवितांना फळ्याचा उपयोग उजळणीच्या वर्गापासून सहाव्या इयत्तेच्या वर्गापर्यंत करणें फार अवश्य आहे. लहान लहान मुलांना वस्तुदर्शन-पाठांची आवश्यकता आहे; तीही ह्याच कारणामुळें. तसेंच नुसत्या काल्पनिक ज्ञानापेक्षां अवलोकनानें व प्रत्यक्ष प्रयोगानें जें ज्ञान होतें, तेणेंकरून अधिक मौज वाटते. चुना व हळद एकत्र केलीं असतां मिश्रण तांबड्या रंगाचें होतें, असें मुलांस नुसतें सांगितल्यानें त्यांना फारशी मौज वाटत नाहीं. परंतु हे दोन्ही पदार्थ थोडथोडे घेऊन एकत्र करून प्रत्यक्ष तांबडा रंग मुलांस उत्पन्न करून दाखविला असतां त्यांना फार आनंद

होईल; व ती गोष्ट त्यांच्या मनावर चांगली ठसेल. ह्मणून प्रत्येक शिक्षकानें ह्या गोष्टीला विशेष महत्त्व देणें जरूर आहे. शिक्षक आपणांस शिकवीत असतां आपल्या नजरेस पडावा अशी प्रत्येक मुलाची इच्छा असते. तथापि त्याच्या शिक्षणानें मुलांस मौज वाटत असते, तोंपर्यंत मात्र त्यांची ही इच्छा मोठी उत्कट असते. मुलांस अशा मनोरंजक रीतीनें शिक्षक शिकवीत असतो, तोंपर्यंत मुलांचे नेत्र मोठे सतेज दिसतात; व सर्वांच्या चित्तवृत्ति ओढून घेणारा जो शिक्षक त्याजकडेच त्यांची टक लागलेली असते. परंतु त्याचें शिक्षण मंदावत चाललें, कंटाळवाणें होऊं लागलें, व त्यांत विद्वत्तेचा फारसा भाग राहिला नाहीं, ह्मणजे लागलेच मुलांचे नेत्र निस्तेज होतात, व त्यांचें शिक्षकाकडील लक्ष उडूं लागतें. म्हणून आपल्या शिक्षणाची गोडी विद्यार्थ्यांस लावण्यासाठीं प्रथमतः त्याला स्वतःला हा धंदा मोठ्या मौजेचा वाटला पाहिजे, हें उघड आहे. कारण शाळेंत नित्य उठून तेच तेच विषय शिकविण्याचें आपल्या कपाळीं येतें; असें वाटून शिक्षकाला हें काम कंटाळवाणें होईल, तर मुलांनाही त्याच्या शिक्षणाचा कंटाळा येईल. शाळेंतील कित्येक कामांची जबाबदारी ओघानेंच शिक्षकावर पडते; आणि वर्गांतील अभ्यासक्रमाची जबाबदारी त्याच्या माथींच आहे. ह्मणजे हे अभ्यास जोरानें चालणार नाहींत, तर त्याचा दोष शिक्षकाकडे आहे; विद्यार्थ्यांकडे नाहीं. वास्तविक पाहतां कित्येक विषयांत मुलांना आपोआप मौज वाटते; किंवा विषय सुरू असतां मौज वाटेल्यासारखे चाळे मुलें करितात. इतिहासासारखे

कित्येक विषय मनोरंजक असतात खरे; परंतु असे विषय थोडे. बहुतेक विषय प्रायः मुलांना नीरस वाटण्यासारखेच असावयाचे. वर्गांतील मुलें लक्ष देणारीं असोत किंवा दुर्लक्ष करणारीं असोत; असे विषय सुरू असतां ते जितक्या मनोरंजक रीतीनें शिक्षक शिकवील, तितकें मुलांचें लक्ष शिक्षणाकडे अधिक राहील.

तथापि शिक्षकानें एक गोष्ट कधीं विसरून उपयोग नाहीं. ती ही कीं, एकच विषय फार वेळ शिकवीत बसल्यास त्याचा मुलांना कंटाळा येतो. विषय कितीही मनोरंजक असला तरी त्यांतील मौज केव्हांना केव्हां कमी होतेच.

वेळापत्रकें अवश्य आहेत; तथापि विशेष प्रसंगीं त्यांस सोडून शिकवावें लागतें.

अशा रीतीनें विषय हळू हळू कंटाळवाणा होत चालल्यास त्याचा बोल शिक्षकाकडे किंवा विद्यार्थ्यांकडे नाहीं. म्हणून विद्यार्थ्यांच्या स्थितीच्या मानानें अवश्य वाटेल तितके वेळां अभ्यासाच्या विषयांत शिक्षकानें बदल करावा, म्हणजेच शिक्षणाचें काम उत्कृष्ट रीतीनें चालेल. मुलांची मानसिक शक्ति सतत कायम राहण्यासाठीं अभ्यासाच्या क्रमांत योग्य वाटेल तेव्हां फेरफार करणें फार जरूर असतें. परंतु वेळापत्रकांप्रमाणें अभ्यास चालविणें शिक्षकास भाग असल्यामुळें असे फेरफार त्याला करितां येत नाहींत. म्हणून वेळापत्रकें अन्य दृष्टीनें कितीही उपयुक्त असलीं, तरी त्यांपासून हा एक मोठा तोटा आहे. अभ्यासाच्या ठराविक क्रमांत विनाकारण ढवळाढवळ केली असतां अनेक तोटे होतील खरे. परंतु एकादा विषय फार कठीण असण्याचा संभव असतो. ह्यामुळें तो शिकवीतअसतां

विद्यार्थ्यांस अधिक त्रास पोहोंचणार, हेंही उघड आहे. म्हणून एकादा सुलभ विषय जितका वेळ शिकवावयाचा तितकाच वेळ अशा कठीण विषयाच्या प्रसंगींही मुलांना रखडत ठेवणें, ही मोठीच चूक होईल. शाळेसंबंधीं नियमांत ( कोडांत ) वेळापत्रकांना अति महत्त्व दिलेलें आहे; व तें महत्त्व त्या नियमांत किंचित् कमी होण्याचीही आशा नाहीं. परंतु रुपयाला ५ वार कापड तर दहा रुपयांचें ५० वार कापड आपण नक्की मोजून घेतों; त्याप्रमाणें वर्षांत ३६५ दिवसांत शाळेंत अभ्यास किती झाले पाहिजेत, हें तंतोतंत मोजून पहाणें योग्य नाहीं. तसच अमुक विषयाला वर्षांत वेळापत्रकाप्रमाणें अमुक तास मिळाले; म्हणून त्या मानानें त्या विषयाचें शिक्षण मुलांस मिळालें आहे, किंवा नाहीं हें त्रैराशिक मांडून पाहणें उचित नाहीं. कारण अशा रीतीनें शिक्षकास बांधून टाकिल्यानें आपल्या आंगचें कर्तृत्व वर्गांत दाखविण्यास त्याला योग्य संधी मुळींच राहणार नाहीं. रोज कोणते विषय किती वेळ शिकवावयाचे, ह्याची उत्कृष्ट वांटणी करण्याची शिक्षकास मोकळीक असावी. कारण शिक्षणाचा चांगला परिणाम होण्यास शिक्षकाला एवढी मोकळीक ठेवणें फार जरूर आहे. मात्र त्यानें ही वांटणी मुलाची सर्व स्थिति नीट लक्षांत आणून फार विचारानें केली पाहिजे. लष्करी कवायतींत शिपायाचा पाय किंचित् पुढें मागें पडला तरी त्याला मोठें शासन होतें. त्याप्रमाणें वेळापत्रकाबाहेर किंचित् पाऊल पडलें कीं महत्पातक घडलें, अशा प्रकारचे नियम शाळाखात्यांत ठरविणें फायदेशीर नाहीं. शिक्षणाचा ठसा मुलांवर उमटावा म्हणून

वेळापत्रकांत थोडाबहुत फेरफार योग्य वाटल्यास शिक्षकास करण्याची मोकळीक असावी.) शाळांची व्यवस्था नियमांनीं अगदीं जखडून टाकिल्यास आपलें कर्तृत्व दाखविण्यास शिक्षक मागें पुढें पाहतील. म्हणून इतके कडक नियम शाळाखात्यानें ठरवूं नयेत.

लहान मुलांच्या वर्गीवरील शिक्षकांच्या आंगीं कोणते गुण असावे ?

विद्यार्थ्यांस जे विषय शिकवावयाचे ते त्यांच्या ग्रहणशक्तीच्या बेतानें असावे; म्हणून त्यांत वारंवार अनेक प्रकारचे फेरफार शिक्षकानें करावे. हे फेरफार करितांना त्यानें मुलांचीं वयें ध्यानांत आणावीं, व त्यांची अभ्यासांत गति कितपत झालेली आहे, इकडेही धोरण ठेवावें. मुलें ज्ञान प्राप्त करून घेण्यासाठीं प्रथमतः अवलोकनशक्तीचाच उपयोग करूं लागतात. म्हणून लहान मुलांस शिकवितांना ह्या शक्तीवरच मुख्यत्वें भिस्त ठेविली पाहिजे. उजळणीच्या वर्गावरील व पहिल्या दुसऱ्या इयत्तांवरील शिक्षकांच्या आंगीं कांहीं विशेष प्रकारची शिक्षणकला असावी लागते. ह्या शिक्षकांच्या आंगीं मुख्यत्वें पुढील गुण असावेः—उल्हासवृत्ति; कोणत्याही गोष्टीचें वर्णन करण्याची उत्तम शैली; मनोवेधक कल्पनाचातुर्य; आणि एक विषय शिकवीत असतां त्याच्याचसारख्या इतर विषयांचें सहज रीतीनें थोडक्यांत शिक्षण देण्याची हातोटी. हे गुण त्यांच्या आंगीं असतील, तर ते लहान मुलांच्या वर्गांना विशेष लायक ठरतील. तसेंच लहानपणीं मुलें नेहमीं निष्कपटपणानें व स्वच्छंदपणानें वागत असतात; त्यांच्या ह्या तऱ्हेच्या वर्तनाबद्दल शिक्षकास राग न येतां मोठें कौतुक वाटलें पा-

हिजे. लहान मुलांचें लक्ष वेधून घेण्यासाठीं **सचित्र देखावे** आणि **वस्तुदर्शनपाठ** ह्यांचा उपयोग केला पाहिजे त्या वयांत मुलांच्या स्मरणशक्तीला प्रत्यक्ष फारसें ओझें पडूं नये. अनायासानें त्यांच्या ध्यानांत राहील तितकें ज्ञान आरंभीं पुरें आहे. लहान मुलांना ज्या चित्राच्या आधारानें एकाद्या विषयाचें शिक्षण दिलें असेल तें चित्र मोठें चित्तवेधक असल्यास त्या विषयांतील मुद्यांच्या गोष्टी मुलांच्या लक्षांत वारंवार आणून देण्यास हरकत नाहीं; किंवा एकादी मनोरंजक गोष्ट सांगितली असल्यास तींतील मुद्यांच्या गोष्टीही त्यांना वरचेवर सांगण्यास हरकत नाहीं. तसेंच ईश्वराच्या स्तुतीविषयीं किंवा अन्य प्रकारच्या मुलांस शिकविलेल्या कविता गळ्यावर म्हणविण्यासारख्या असल्यास त्याही वारंवार म्हणविण्यास हरकत नाहीं. तात्पर्य इतकेंच कीं, मुलांस कंटाळा न येतां जितकें त्यांच्या ध्यानांत राहील तितकें लहानपणीं पुरें आहे.

अभ्यासाचे विषय अशा रीतीनें सुलभ करण्यांत फायदा नाहीं, असें कित्येकांचें मत आहे. अशा रीतीनें लालूच लावून त्यांचें लक्ष वेधून घेणें त्यांना पसंत नाहीं. लहान लहान मुलांस शिक्षण देण्यासाठीं असे अति सुलभ व अति मनोरंजक मार्ग जाणून बुजून शोधून काढणें त्यांस अनिष्ट वाटतें. कारण अशा पद्धतीनें दिलेल्या शिक्षणांत जुन्या पद्धतीनें दिलेल्या शिक्षणांतील कडकपणा राहत नाहीं, असें ते म्हणतात. कोणत्याही विषयाचें ज्ञान मुलांस करून देतांना तें त्यांस अगदीं अवघड जाऊं नये

लहान मुलांस शिकविण्यासाठीं सोपे व मनोरंजक मार्ग शोधून काढणें इष्ट आहे काय ?

व त्यांस तसदी मुळींच पडूं नये;एवढ्याच उद्देशानें हर-एक विषय त्यांना अगदीं सोपा व मनोरंजक करून सांगण्याचा कित्येकांस फार तिटकारा आहे; व तें रास्तही आहे. तथापि विषय सोपे व मनोरंजक करून शिकविल्यास अभ्यासाच्या कामीं मेहनत करण्यास व वर नंबर मिळविण्यासाठीं चढाओढ करण्यास मुलें कंटाळतील; असें कित्येकांस वाटतें. तें मात्र खरें नाहीं. कारण मुलांची शाळेंतील प्रत्यक्ष स्थिति ध्यानांत आणिली असतां ही भीति निराधार ठरते. उलट अशी खातरी होते कीं, त्यांना येणाऱ्या अडचणी दूर करून शिक्षणांत त्यांची प्रगति होण्याचा मार्ग सुलभ करणेंच अवश्य आहे. डा० कार्पेंटर ह्यांचें ह्या विषयासंबंधीं मत विचार करण्यासारखें आहे. ते म्हणतात:—" अशा रीतीनें विषय मुद्दाम मनोरंजक करून शिकविणें ह्मणजे आपल्या आंगीं योग्य प्रकारचें असावें तितकें पाणी नाहीं, असें कबूल करण्यासारखें आहे; अशी कित्येक निष्ठुर शिक्षकांची समजूत असल्यामुळें त्यांना ही पद्धति मान्य-नाहीं. परंतु लहानपणीं मुलांची मनोनिग्रहशक्ति– आपलं मन आपल्या ताब्यांत ठेवण्याची शक्ति–फारशी जोराची नसते, हें त्यांच्या ध्यानीं येत नाहीं.तसेंच मुलांच्या आंगची ही शक्ति नष्ट न होतां उत्तरोत्तर जोरानें वाढत जावी; एवढाच त्यांस शिक्षण देण्याचा मूळ उद्देश आहे; इकडेही त्यांचें लक्ष राहत नाहीं. लहान मुलांच्या स्वभावांतील हें मूळ बीज ध्यानांत न आल्यामुळें आईबाप व शिक्षक ह्यांजकडून वारंवार मोठमोठ्या चुका घडतात. मुलांचें एकादें आचरण त्यांना दुराग्रहाचें वाटतें. परंतु

वस्तुतः त्यांत दुराग्रहाचा लेशही नसतो. तर मुलांच्या मेंदूचा व्यापार नेहमीं स्वच्छंदपणानेंच सुरू असावयाचा;त्या वयांत सारासारविचाराचें कांहीं चालत नाहीं. त्यांत त्यांच्या आवडीनावडीचा मुळींच संबंध नसतो. ह्यास्तव मुलें तसें आचरण हट्टानें किंवा दुराग्रहानें करितात; असें म्हणणें चुकीचें ठरतें. तेव्हां अशा वयांत मुलांनीं आपली आज्ञा मोडिली असें समजून त्यांस शिक्षा केल्यानें फार नुकसान होतें. कारण **त्या वयांत आज्ञा पाळण्यास अवश्य इतका मनोनिग्रह मुलांचे आंगींच नसतो**. तसेंच अशा गैरसमजुतीनें शिक्षा केल्यानें होणारें नुकसान पुढें भरून येत नाहीं, असें ह्मणण्यास चिंता नाहीं. ”

ह्याप्रमाणें आरंभीं आरंभीं मुलांचें लक्ष अभ्यासाकडे मुद्दाम बाह्य उपचारांनीं लाविलें पाहिजे. तसेंच त्या वयांत त्यांच्या ध्यानांत अनायासें जितक्या गोष्टी राहतील, तितक्या पुरे आहेत. परंतु तीं मोठीं होत जातील, तसतसें त्यांनीं एकाग्रचित्तानें अभ्यासाकडे लक्ष लावण्यास मनोभावानें झटलें पाहिजे. ह्यापुढें नियमित रीतीनें नेमून दिलेल्या **घड्यांचा** विचार ओघानेंच येतो.

विद्यार्थ्यांनीं स्वतः श्रम करण्याची आवश्यकता.

अशा रीतीनें नेमून दिलेल्या अभ्यासांना घडे हें नांव यथायोग्य शोभतें. कारण घडा याचा **अर्थच** असा कीं, तो तयार करण्यास कांहीं मेहनत पडली पाहिजे. मुलें शाळेंत नुकतींच जाऊं लागतात; तेव्हां तर ही मेहनत त्यांना विलक्षण कंटाळवाणी वाटते. स्वकष्टानें कोणतीही गोष्ट साध्य करून घेण्यास विद्यार्थ्यांनीं लहानपणापासूनच शिकलें पाहिजे; व ह्या कामीं त्यांस जसें यश येईल त्या

मानानें त्यांची विद्याभ्यासांत प्रगति होऊन पुढें उद्योगधंद्यांतही ते नांवालौकिकास चढतील. ह्मणून अशा प्रकारचा योग्य प्रयत्न विद्यार्थ्यांकडून करविण्यास शिक्षकानें त्यांस मदत देणें इष्ट आहे. तसेंच अशी मदत करण्यास उत्तम उपाय कोणते, हें त्यानें विचारपूर्वक ठरविणें फार महत्त्वाचें आहे. कोणत्याही शिक्षकाला ह्या धंद्यांत कितपत यश येणार ह्याचा निर्णय प्रायः एकाच गोष्टीवर अवलंबून असतो:-ती ही कीं, विद्यार्थ्यांस स्वतः प्रयत्न करण्याची गोडी लावण्याचें त्याच्या आंगचें कौशल्य. अशा प्रकारें प्रयत्न करण्याची गोडी मुलांस लागावी, ह्मणून त्यांना मदत करणें हें शिक्षकाचें कर्तव्यच आहे. तथापि ह्या कामीं मुलांस आपल्याकडून खरोखर मदत व्हावी अशी इच्छा असेल तर शिक्षकानें त्यांना स्वतः श्रम करण्यास उत्तेजन दिलें पाहिजे. विद्यासंपादनाची उत्कृष्ट इच्छा मुलांच्या अंतःकरणांत शिक्षकाला उत्पन्न करितां आली पाहिजे, व ती उत्पन्न झाल्यावर तिला योग्य वळण लावून ती तृप्त करितां आली पाहिजे; ह्मणजे विद्यार्थ्यांस ह्या कामांत त्यानें मदत दिल्याप्रमाणें होईल. शिक्षकानें नेहमीं असा उद्देश बाळगिला पाहिजे कीं, आपणास मुलांच्या आंगचा चौकसपणा वाढवावयाचा आहे, व त्यांच्या प्रश्नांचीं उत्तरें अशा रीतीनें द्यावयाचीं आहेत कीं तेणेंकरून शंका विचारण्यास त्यांना अधिक उत्तेजन येईल. तसेंच मुलांना कित्येक गोष्टींचें ज्ञान विचाराअंतीं आपोआप होण्यासारखें असतें; व तें आपोआप झाल्यानेंच त्यांच्या मनाला मोठा आनंद होतो. ह्मणून अशा गोष्टींचें ज्ञान आपण होऊन त्यांस करून दे-

ऊन शिक्षकानें त्यांच्या आनंदांत विरजण घालूं नये. पांच आणि चार किती, असा प्रश्न उत्पन्न झाला असतां शिक्षकानें "नऊ" असें चटकन कधीं सांगूं नये. कारण मुलाला बोटें घालून हें ज्ञान आपोआप होण्यासारखें आहे, व अशा रीतीनें तें झालें असतां त्याला आनंद होऊन तें पक्कें ठसणार आहे. विद्यार्थ्यांमध्यें ज्ञानप्राप्तीची हाव तर उत्पन्न झालीच पाहिजे. शिवाय तें ज्ञान स्वकष्टानें प्राप्त करून घेण्यासाठीं आपलें बुद्धिसामर्थ्य तिकडे खर्चणें अवश्य आहे, अशीही त्यांची समजूत झाली पाहिजे. अशा रीतीनें आपल्या बुद्धिसामर्थ्याचा उपयोग करावयाचा ह्मणजे त्यांना मनःपूर्वक लक्ष ठेवून विचार करणें भाग पडतें. कारण नुसत्या स्मरणशक्तीचा उपयोग ह्या कामीं पुरा पडत नाहीं. कित्येक गोष्टी मुलांस चांगल्या रीतीनें समजणार नाहींत, व त्या त्यांना तोंडपाठच केल्या पाहिजेत, ह्यांत शंका नाहीं. कोणत्याही प्रकारचा अभ्यास म्हटला ह्मणजे अशा प्रकारची घोकंपट्टी त्यांत थोड्या बहुत मानानें असावयाचीच. तथापि **मि. थ्रिंग** ह्यांचें ह्या संबंधाचें ह्मणणें बरेंच मुद्देसूद असल्यामुळें तें पुढें दिलें आहे. ते ह्मणतातः—"लहानपणीं मुलांना स्मरणशक्ति विशेष असते; परंतु सारासारविचार त्यांच्या आंगीं तेव्हां फारसा नसतो. ह्मणून कोणत्याही प्रकारच्या शिक्षणाचा पाया ही स्थिति ध्यानांत आणून उभारिला पाहिजे. 'मुलांस प्रत्येक गोष्ट समजलीच पाहिजे,' 'कोणत्याही गोष्टीचें ज्ञान त्यांना पूर्णपणेंच झालें पाहिजे;' हीं व अशा प्रकारचीं मोठमोठीं विधानें कानाला फार मजेदार लागतात. परंतु ह्यामुळें कठीण विषयाकडे मुलांना

अगदीं वळूंच द्यावयाचें नाहीं; असा परिणाम घडतो. 'बाळा, संभाळ, पोहायास येऊं लागल्यावांचून पाण्यांत जाऊं नको हो.' अशा प्रकारचा उपदेश केल्यानें जो परिणाम व्हावयाचा, तशासारखाच परिणाम वरील प्रकारचीं विधानें सत्य मानून त्या धोरणानें प्रत्यक्ष शिक्षण दिल्यानें घडावयाचा." शिक्षकाचा धंदा मूळचाच फार कठीण आहे, आणि तशांत हरएक गोष्ट मुलांस समजावून देण्याची जबाबदारी त्याजवर घातली ह्मणजे तर तो खरोखर अति कठीण होईल. हें सर्व खरें आहे; तथापि त्यास कांहीं इलाज नाहीं. युनायूटेड स्टेट्समधील न्यूजर्सी संस्थानांतील प्रिस्टन येथील प्रोफे. हार्ट यांचें पुढील ह्मणणें अगदीं यथार्थ आहे:—"मानसिक शक्तीला जें काम नेमून द्यावयाचें त्याचा खरा क्रम असा असला पाहिजे;—प्रथम **ज्ञान** आणि नंतर **स्मरणशक्ति. ज्ञान मिळवा, आणि नंतर तें ध्यानांत ठेवा.**" सारांश, शिक्षकानें मुलांस हरएक गोष्ट आरंभापासूनच नीट समजावून देण्याचा क्रम ठेविला पाहिजे. हें काम त्याच्या हातून चांगल्या रीतीनें घडेल, तर त्याला ह्या धंद्यांत अखेरीस बहुधा यश येईल. तसेंच मुलांची कशी तरी वरवर समजूत घालीत गेलें ह्मणजे काम भागत नाहीं. कोणत्याही विषयासंबंधानें विचार करण्यासारखे जे मुद्दे असतील, तिकडे मुलांचें लक्ष पोहोंचविणें, त्यांची त्या विषयांत अधिकाधिक गति होईल अशा रीतीनें त्यांस प्रश्न करणें, आणि भिन्नभिन्न बुद्धीच्या मुलांना विषय मनोरंजक वाटावा म्हणून अनेक रीतींनीं अनेक बाजूंनीं त्यांची माहिती त्यांना करून देणें; इतक्या गोष्टींत शिक्षक प्रवीण

असला पाहिजे. ही प्रवीणता मिळविण्याचा मार्ग असा आहेः- जो विषय शिकवावयाचा असेल त्याचे स्पष्ट रीतीनें प्रथम पोटभाग पाडावे; त्या भागांचे परस्पर संबंध मुलांस दाखवून द्यावे; आणि त्या पोटभागांत मुख्यत्वें विचार करण्यासारखे किंवा इतर संबंध असतील, तिकडे मुलांचें लक्ष लावावें. असें केल्यानें तो विषय ध्यानांत ठेवण्यास मुलांस सोपा जातो व त्याविषयीं विचार करण्यासही त्यांना हुरूप येतो.

शिक्षकाचें खरें कर्तव्य काय ?

शिक्षण कोणत्या प्रकारचें असावें ह्याविषयीं वर विवेचन केलें आहे; त्यावरून शिक्षकाचें खरें कर्तव्य कोणतें, तें व्यक्त होईल. तें कर्तव्य इतकेंच कीं, त्यानें **शिक्षण द्यावयाचें** आहे; मुलें आपले **धडे** तोंडपाठ ह्मणतील ते **नुसते ऐकावयाचे नाहींत.** तसेंच त्यांच्या चुकांबद्दल त्यांस **रागें भरणें,** किंवा त्यांचे अभ्यास घेऊन त्यांस **मार्क देणें,** इतकेंच कांहीं त्याचें कर्तव्य नाहीं. ह्या सर्व गोष्टी गौण असून **शिकविणें** हेंच त्याचें मुख्य कर्तव्य होय. इतर हरएक गोष्ट ह्याच्या अंगभूत असून हा उद्देश सिद्धीस नेण्यास साधनीभूत समजावयाची. मुलांचे धडे ह्मणून घेणें, त्यांच्या चुका दाखविणें आणि त्यांना मार्क देणें, ह्या सर्वांचा उपयोग शिक्षणाचा हेतु तडीस जाण्यास होणार आहे खरा. तथापि एवढीं तीन कृत्यें केलीं म्हणजे आपलें कर्तव्य संपलें, असें शिक्षकानें मानूं नये. तो असें मानील तर आपल्या धंद्याचें वास्तविक महत्त्व त्यानें आपण होऊन कमी केल्याप्रमाणें होईल. अशारीतीनें शिक्षण देणें ह्मणजे तें एक वेठकाम होईल;

व मुलांसही तें फार कंटाळवाणें वाटेल. दहा वीस मजुरांवर एकेक मुकादम नेमितात; व ते मजूर आपापलें काम बरोबर करितात किंवा नाहीं, एवढीच देखरेख तो करीत असतो. त्याप्रमाणें शिक्षक मुलांना नेमून दिलेले धडे नुसते ह्मणून घेईल, तर त्याची स्थितिही तद्वत् होईल; व शिक्षक या नात्यानें त्याला जो मान द्यावयाचा, तो मुलें लवकरच देतनाशीं होतील. परंतु मुलांचे धडे नुसते म्हणून न घेतां ते त्यांना समजावून देण्याची शिक्षकाची इच्छा असेल तर त्यानें विद्यार्थ्यांबद्दल खरी कळकळ बाळगिली पाहिजे; ते धडे तयार करितांना कोणकोणत्या अडचणी मुलांस येतील त्या शोधून काढिल्या पाहिजेत; आणि आपल्या आंगचें विशेष ज्ञान खर्चून मुलांना अशा प्रकारची मदत दिली पाहिजे कीं, तेणेंकरून त्यांची जिज्ञासा वाढून त्यांना अभ्यासाची अधिक आस्था लागेल. सारांश, वेठकाम करणाऱ्या **मुकादमापेक्षां खऱ्या शिक्षकाची योग्यता अधिक** आहे; फार तर काय **परीक्षकापेक्षांही फार अधिक** आहे. खऱ्या शिक्षकाला परीक्षकाचें काम अगदीं कंटाळवाणें वाटेल. शिकविण्याचें काम त्याला मोठ्या मौजेचेंच वाटावयाचें; म्हणून तेवढें त्याजकडे सोंपविलें, म्हणजे आपल्या कामाची परीक्षा किंवा चांचणी कोणींही पाहिली तरी त्याला त्याची आडकाठी नसते. हे परीक्षक त्याच्या कामाबद्दल जो शेरा देतील, त्या संबंधानें असा शिक्षक मुळींच कुरकूर करणार नाहीं. कारण त्याच्या मनाची पक्की खातरी असते कीं, आपल्या शिक्षणानें मुलांच्या मनावर जे परिणाम घडले आहेत, त्यांचा अंदाज नुसत्या

परीक्षांच्या सत्रांनीं व्हावयाचा नाहीं. **शिकविणें** आणि **परीक्षा घेणें** ह्यांत जमीन-अस्मानचा फरक असून शिक्षकानें हा पदोपदीं ध्यानांत बाळगिला पाहिजे; ह्मणजे त्याला ह्या धंद्यांत यश येईल. म्हणून आदल्या दिवशीं दिलेले धडे मुलांनीं कितपत तयार केले आहेत, एवढें पहावयाचेंच काय तें आपलें काम आहे, असा कोता विचार शिक्षकानें कदापि मनांत आणूं नये; किंवा त्याप्रमाणें आचरण करूं नये. कारण ह्या धंद्याला अत्यन्त महत्त्व प्राप्त होण्यास जी गोष्ट मुख्यत्वें कारणीभूत आहे तिला असें केल्यानें बाध येतो. तेव्हां नुसते धडे पाठ म्हणून घेणारापेक्षां अधिक योग्यता शिक्षकाच्या आंगीं कशानें येईल; व अभ्यासाच्या कामीं विद्यार्थ्यास त्याला मदत कोणत्या रीतीनें उत्तम करितां येईल; असा प्रश्न उत्पन्न होतो. तथापि ह्या प्रश्नाचा उलगडा करण्यापूर्वीं ज्या दुसऱ्या कित्येक गोष्टी शिक्षकानें नेहमीं ध्यानांत ठेविल्या पाहिजेत, त्यांजकडे वळूं.

कसे तरी पुष्कळ अभ्यास होण्यापेक्षां थोडे, पण ते चांगल्या रीतीनें होणें इष्ट आहे.

मुलांना त्यांच्या शक्तीबाहेर अभ्यास नेमून देणें हितावह नाहीं. पुष्कळ इतिहास किंवा पुष्कळ वाचन झालें, ह्मणजे तो विषय चांगला झाला असें कांहीं ठरत नाहीं. वाजवीपेक्षां अधिक पानें केल्यानें परिणामीं अति नुकसान होईल. मुलांना फार कमी अभ्यास नेमून दिले तर एक वेळ पतकरेल; पण फाजील देणें कधीं हितावह नाहीं. पुस्तकाचीं सपाटून पानें करण्याची एक प्रकारची हाव हल्लीं पुष्कळ शाळांत आढळून येते. परंतु

अशी हाव फार अनिष्ट असून हिजमुळें अति वाईट परिणाम घडतात. कित्येक शिक्षक मुलांना दिवसभर शाळेंत अभ्यास करण्यास लावितात; व घरचे अभ्यास इतके सपाटून देतात कीं, मुलांची संध्याकाळची सर्व वेळ ते अभ्यास करण्याकडे जाते. सारांश, सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत मुलांना ते अभ्यासांत जखडून टाकितात. परंतु असें केल्यानें मुलांचें मन अगदीं खचून जातें आणि तेणेंकरून त्यांचा विद्याभ्यास जोरानें चालेनासा होतो. कित्येक मुलांना अभ्यासाची खरोखर मोठी हाव असते. ह्मणून शिक्षकानें कितीही अभ्यास नेमून दिले, तरी त्यांना वर दर्शविलेल्या प्रकारचा त्रास अगदीं वाटत नाहीं. तथापि अशा मुलांचीं मनें थोडींबहुत खेळाकडे लावून तीं दररोज नियमानें कांहीं वेळ खेळतील असें शिक्षकानें करावें; ह्मणजे त्या मुलांचें व त्यांच्या आईबापांचें हित होऊन परिणामीं देशाचेंही हित होईल. मुलांचा संध्याकाळचा सर्व वेळ अभ्यासांत मोडेल, इतके अभ्यास नेमून दिले असतां शिक्षणापासून सुपरिणाम घडणार नाहीं, असा सामान्य नियम समजावा. मुलांनीं घरचा वेळ कोणत्या प्रकारें घालवावा, हें ठरविण्याची जबाबदारी त्यांच्या मातापितरांवर किंवा पालकांवर असते खरी. तथापि विद्यार्थ्यांच्या आंगीं ग्रहण-शक्ति कितपत आहे, व त्यांची अभ्यासांत गति कितपत झाली आहे, हें प्रत्यक्ष पाहून त्या धोरणानें त्यांस अभ्यास नेमून देण्याची जबाबदारी शिक्षकावर आहे. पुरता विचार केल्याशिवाय अभ्यास नेमून दिले असतां विद्यार्थी व शिक्षक ह्या उभतांनाही विलक्षण त्रास होतो. सुटीचा टोला पडण्याची वेळ ठेपली

म्हणजे शिक्षक केव्हां केव्हां घाईघाईनें पुरता विचार केल्याशिवाय कांहीं तरी अभ्यास नेमून देतो. परंतु हे अभ्यास नेहमींपेक्षां फाजील होतील, तर परिणाम असा होईल कीं विद्यार्थ्यांस त्या रात्रीं स्वस्थ झोंप मिळणार नाहीं; व शिक्षकाचाही दुसऱ्या दिवशीं गोंधळ उडेल. अशा स्थितीमुळें शिक्षणाच्या कामीं शिक्षकास त्रास पोंहोंचला, तर त्याचा दोष दुसऱ्याकडे काय?

अर्धवट अभ्यास करण्याचा परिणाम.

शिवाय हेही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, अर्धवट अभ्यास करण्याची सवय विद्यार्थ्यांना एकदां लागली, व रोजचे अभ्यास कसे तरी ओरखडून टाकण्याचें त्यांच्या आंगवळणीं पडलें, ह्मणजे तीं बहुतेक बिघडलींच. कारण ह्यामुळें त्यांची अशी समजूत होते कीं, शाळेंतील अभ्यास एकदां कसे तरी ओरखडून टाकिले तरी चालतें. तसेंच अभ्यास करण्याचें त्यांना जितकें महत्त्व वाटणें अवश्य आहे, तितकें वाटेनासें होतें. ह्यास्तव नीतिदृष्ट्या मुलांचें पाऊल वांकडें न पडण्याविषयीं जितकी खबरदारी घेणें अवश्य आहे, तितकीच अर्धवट अभ्यास करण्याची सवय त्यांना न लागूं देण्याविषयीं घेतली पाहिजे. ह्याच कारणास्तव ज्या शाळांतून कसे तरी सपाटून अभ्यास ओरखडून टाकितात, त्या शाळा चांगल्या असें आईबापांनीं मानूं नये. एकाद्या पुस्तकाचीं पुष्कळ पानें झालीं ह्मणजे तीं चांगलीं झालीं असें कांहीं ठरत नाहीं; तर जीं पानें झालीं असतील तीं जितक्या उत्कृष्ट रीतीनें समजावून देण्याचा प्रयत्न शिक्षकानें केला असेल, त्या मानानें त्याच्या कामाची परीक्षा व्हावयाची.

मुलांना घरीं अभ्यास किती नेमून देणें वाजवी होईल ह्याचा **प्राथमिक शिक्षणाच्या शाळांतील शिक्षकांनीं विचार करणें विशेष महत्त्वाचें आहे.** ह्या शाळांतील विद्यार्थ्यांस घरचे अभ्यास फारच बेतानें दिले पाहिजेत, असें शिक्षकानें प्रथम आपल्या मनांत ठरवून नंतर त्या धोरणानें शाळेंतील अभ्यासांची बहुतेक व्यवस्था जुळविली पाहिजे. असें केलें तर ह्या शाळांच्या द्वारें शिक्षणाचें काम सुरळीत चालेल; एरवीं अगदीं चालणार नाहीं. ह्या शाळांतील बहुतेक मुलांची गृहस्थिति अशी असते कीं, त्यांना घरचे अभ्यास अगदीं कमी देणेंच अवश्य असतें; व इतके कमी दिले तरी देखील पुष्कळ वेळां त्यांजकडून ते होत नाहींत. म्हणून ही प्रत्यक्ष वस्तुस्थिति ध्यानांत आणून तदनुसारच शिक्षकानें वर्तलें पाहिजे. ह्या शाळांतून वर्गांत धडा शिकविण्यास आरंभ करावयाचा, तेव्हां असें धरून चाललें पाहिजे कीं, मुलांनीं त्या संबंधानें घरीं मुळींच तयारी केलेली नाहीं; व त्यांना अथपासून त्याचें शिक्षण द्यावयाचें आहे. लहान मुलांच्या शिक्षणाचा सर्व बोजा अशा रीतीनें शिक्षकावर लादिला असतां त्याच्यावर फारच जबाबदारी पडते; असें कित्येक म्हणतील. तथापि शिक्षकाचें कर्तव्य काय तें नीट ध्यानांत आणिलें असतां कोणालाही असें वाटणार नाहीं. उलट कित्येकांचें असें मत आहे कीं, हरएक प्रकारच्या प्राथमिक शिक्षणाच्या शाळांतून मुलांना घरचे अभ्यास फारच थोडे द्यावयाचे; असा स्पष्ट नियमच ठरवावा ह्मणजे चांगलें होईल. हें मत

प्राथमिक शिक्षणाच्या शाळांतून तर घरचे अभ्यास फारच थोडे दिले पाहिजेत.

मोठें समर्पक दिसतें. मुलें शाळेंत येऊं लागल्यावर दोन तीन वर्षें त्यांना केवळ शाळेंत शिक्षण देतां येईल तितकेंच द्यावयाचें, असें स्पष्ट ठरवावें; ह्मणजे शिक्षणाच्या कामीं परिणामीं फार नफा होईल; तोटा कदापि होणार नाहीं. मुलें निरोगी होऊन सशक्त होत जावीं; म्हणून त्यांच्या मेंदूला दररोज दोन चार तासांपेक्षां जास्त श्रम सतत पडूं देणें इष्ट नाहीं. वर्गांत अभ्यासाची मुलांची जी त्रेधा उडून जाते, तशी त्रेधा निदान घरीं तरी उडूं नये; आणि झोंपेचा वेळ तर अभ्यासाच्या कामीं मुळींच खर्च होऊं नये; अशाबद्दल घेतां येईल तितकी खबरदारी शिक्षकानें घेतली पाहिजे. लहानपणीं मुलांच्या मेंदूची एकसारखी कांहीं तरी चळवळ सुरू असते, असा आतां सर्वांस चांगला अनुभव आला आहे. शिवाय प्राथमिक शाळांतील वर्ग मोठमोठाले असून त्यांतील मुलेंही अगदीं लहान लहान असतात; व ह्या सर्वांचें लक्ष आपणाकडे लावून घेण्यासाठीं शिक्षकाला फार त्रास पडतो. म्हणून त्याला शिक्षणाच्या कामीं जितका कमी त्रास पोहोंचेल तितकें इष्ट आहे. परंतु मुलांना घरीं अभ्यास नेमून दिला व तो त्यांनीं चांगला केला नाहीं असें आढळून आलें, ह्मणजे शिक्षकाला अर्थात् चीड येते. ह्यास्तव **मुलांना घरचा अभ्यास द्यावयाचाच नाहीं,** असा एकदां नियम ठरविला, ह्मणजे हा त्रास अजी चुकेल. मुलांना सर्व अभ्यास आरंभापासून शाळेंतच शिकवावयाचें, असा बुद्ध्या नियम केल्यावर शिक्षकाला रागावण्याचे प्रसंग फारसे येणार नाहींत. शिकविण्याचा ह्रूप नाहींसा होतो, तो वस्तुतः वारंवार

रागावल्यामुळेंच. म्हणून वर दर्शविल्याप्रमाणें व्यवस्था झाल्यास ती फार फायदेशीर होईल. तसेंच सर्व अभ्यास शाळेंत शिकवीत गेल्यानें शिक्षकही ह्या धंद्यांत अधिक तरबेज होईल. मुलांना नेमून दिलेले धडे नुसते ह्मणून घेणें हें काम फार क्षुल्लक असून ह्याचा सराव बहुतेक शिक्षकांना आहे. परंतु एकादा विषय लहान मुलांस समजावून देऊन तो त्यांच्या मनांत पक्का ठसेल अशा रीतीनें त्यांचें मन त्याकडे लावणें, हें काम विद्वान् व चतुर शिक्षकाशिवाय कोणालाही नीट रीतीनें करितां येणार नाहीं.

आतां धडे तयार करण्याच्या कामीं शिक्षकानें विद्यार्थ्यांस मदत कोणत्या प्रकारें करावी, ह्या मुख्य प्रश्नाचा विचार करूं. मुलांना घराहून करून आणण्यासाठीं दिलेले सर्व अभ्यास शाळेंत शिक्षकानें मुद्दाम अशा रीतीनें घ्यावे कीं, तेणेंकरून त्या धड्यांचें शिक्षण मुलांच्या मनावर अधिक ठसेल. असें केलें असतां ह्या प्रश्नाचा बहुतेक उलगडा झाला. वर्गांतील एकाद्या मुलानें घरीं धडे कितीही उत्तम तयार केले, तरी त्या संबंधानें त्याचें फार अज्ञान असतें, पुष्कळांना तर त्यांचें मुळींच ज्ञान झालेलें नसतें. तथापि सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही कीं, मुलांस कोणताही विषय शिकवीत असतां शिक्षक त्या संबंधानें मुलांना जों जों अधिकाधिक विचार करावयास लावील, तों तों शिक्षणाचें काम विशेष उत्साहानें चालेल. धडे तयार करण्याचे सर्वोत्कृष्ट मार्ग कोणते, हें उत्तम प्रकारच्या शिक्षण-

धडे तयार करण्याच्या कामीं शिक्षकानें विद्यार्थ्यांस कशी मदत करावी ?

पद्धतीपासून मुलांस खरोखर कळून आलें पाहिजे. विद्यार्थ्यांस जो विषय शिकवावयाचा असेल त्या संबंधानें शिक्षकानें अशा प्रकारच्या सूचना त्यांस द्याव्या कीं तेणेंकरून विषयाचें त्यांना चांगलें ज्ञान होऊन तो ध्यानांत ठेवण्यास सुलभ जाईल. विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें शिक्षकामध्यें जो गुण असणें अवश्य आहे तो हाच. शिक्षकाच्या आंगीं विशेष ज्ञान असतें; व शिकविण्याचा त्यास थोडा फार अनुभव आलेला असतो; ह्मणून ह्या दोहोंच्या साधनानें विद्यार्थ्यांस ज्ञानप्राप्ति करून देण्याचे उपाय त्यानें शोधून काढिले पाहिजेत. मात्र ते उपाय असे असावे कीं, तेणेंकरून मुलांस फारसा त्रास पडूं नये.

पृथक्करण पद्धतीचा उपयोग.

हा उद्देश सिद्धीस जाण्यास सर्वांत उत्तम उपाय पृथक्करणपद्धतीचा शिकवितांना उपयोग करणें, हाच होय. कोणताही कठीण विषय शिकवावयाचा ह्मणजे त्याचे पोटभाग कसे पाडावे, ह्याचें योग्य ज्ञान मुलांस करून दिलें असतां त्यांतील बहुतेक कठीणपणा नाहींसा होतो. थोडाबहुत कठीणपणा राहिल्यास तो काढून टाकण्यास शिक्षकानें मुलांना मदत करावी; म्हणजे तसले कठीण विषय शिकण्यास त्यांना अधिक हुरूप येईल. आरंभीं आरंभीं मुलांना शिक्षण द्यावयाचें तें मोठ्या विचारानें अगदीं सोप्या सोप्या शब्दांनीं द्यावें; व पुढें क्रमाक्रमानें भाषा थोडथोडी कठीण वापरावी. ह्मणजे पृथक्करणपद्धतीनें शिक्षण देण्याचें काम फार सुलभ जाईल. कोणताही विषय सुलभ रीतीनें ध्यानांत ठेवण्यास बुद्धीचा उपयोग करणें, हा उत्तम मार्ग आहे.

मुलांना पुस्तकाचें पान अर्धें पान अगदीं बिनचूक जलद वाचून दाखवितां येईल; परंतु त्याचा चांगलासा अर्थ त्यांना समजलेला नसेल. अभ्यासाच्या कामीं मुलांस त्यांच्या विचारशक्तीचा उपयोग करावयास लाविलें नाहीं, तर त्यांना **खरें शिक्षण** मिळालें नाहीं, असें समजावें. शिक्षणाच्या कामीं एकदेशीय किंवा नुसत्या शाब्दिक ज्ञानाचें फारसें महत्त्व नाहीं; तर स्वतःची बुद्धि चालवून विचारपूर्वक संपादिलेल्या ज्ञानाचें महत्त्व फार आहे. एकाद्या विषयाचें एकदेशीय किंवा शाब्दिक ज्ञान करून घेतलें, तर तें तात्पुरतेंच होय; त्या विषयाची गरज नाहींशी झाली म्हणजे त्याचें ज्ञानही लवकरच समूळ नाहींसें होतें. परंतु त्या विषयांतील मुख्य मुख्य गोष्टींचें मनन करून त्यांचें खरें ज्ञान करून घेतलें, तर तें सर्व ध्यानांत ठेवण्यास सुलभ जातें; व अशा रीतीनें तें डोक्यांत आल्यावर मुलें त्या संबंधानें अधिक विचार करूं लागतात. म्हणून हरएक विषयाचें शिक्षण पृथक्करण पद्धतीच्याद्वारें नेहमीं देणें फार जरूर आहे. शाळेंतील नित्यक्रमांत ह्या पद्धतीचा उपयोग करण्याचे प्रसंग उठल्या बसल्या येतात. उदाहरणार्थ, सामाजिक शब्दांतील समास समजावून देतांना त्यांमधील निरनिराळीं पदें सांगून तो शब्द कसा बनला आहे, हें विद्यार्थ्यांस दाखविलें असतां ते त्या शब्दाबद्दल अधिक विचार करूं लागतात; व ह्या रीतीनें त्यांतील पोट शब्दांचें ज्ञान मुलांस करून दिल्यानें तो समास पक्का ध्यानांत राहण्यास फार सुलभ जातें. सामासिक शब्दांतील पदांचें अशा प्रकारें पूर्ण ज्ञान मुलांस करून देऊन नंतर त्यांतील

समास त्यांना समजावून दिले, तर त्या संबंधानें मुलें फारशा चुका करणार नाहींत. हीच गोष्ट वाचनालाही लागू आहे. जें पान मुलांस वाचावयास दिलें असेल, त्याचा अर्थ त्यांना पुरता समजला नसल्यास तें त्यांना बिनचूक वाचण्यास कठीण जाईल. म्हणून धड्यांतून लांबलचक वाक्यें आलीं असतां त्यांचे भाग पाडण्याची मुलांना दररोज सवय लावावी; म्हणजे कोणत्या विरामचिन्हाचे ठिकाणीं किती थांबावें, वाचतांना उच्च स्वरानें केव्हां वाचावें आणि आघात कोणत्या शब्दावर द्यावा; इत्यादि गोष्टींचें यथार्थ ज्ञान मुलांस अनायासें व पूर्णपणें खचित होईल. तसेंच कोणत्याही भाषेचें व्याकरण मुलांस शिकवितांना त्यांना तें नुसतें घोकून तोंडपाठ करावयास लाविलें तर तो विषय त्यांना खरोखर कंटाळवाणा होईल. परंतु हा विषय शिकवितांना केवळ स्मरणशक्तीवर भिस्त न टाकितां मधून मधून मुलांना त्या संबंधानें विचार करण्यास लाविलें, तर त्यांतही त्यांना मौज वाटल्याशिवाय राहणार नाहीं. शिक्षकाच्या आंगीं शिकविण्याचें सामर्थ्य कितपत आहे, ह्याची परीक्षा वस्तुतः व्याकरणविषय शिकविण्याच्या त्याच्या हातोटीवरून चांगली होते. पृथक्करणपद्धतीचा उपयोग किती आहे, ह्याची पूर्ण कल्पना हा विषय शिकवीत असतांच होते. हा विषय मोठा भानगडीचा आहे; म्हणून हा शिकत असतां मुलांची त्रेधा उडून जाते; व नुसते नियम पाठ करण्याचें काम त्यांस फार कंटाळवाणें वाटतें. तसेंच जसजसे नियम जास्त पाठ होतात, तसतसा मुलांचा गोंधळ मात्र अधिक उडतो. कारण पूर्वींच्या नियमांचें त्यांस खरें ज्ञान झालेलें नसतें.

मुलें शाळेंत जात असतां त्यांना अनेक प्रकारचा त्रास होतो खरा; परंतु व्याकरण नुसतें पाठ करून घेतल्यानें त्यांना पराकाष्ठेचा त्रास पोहोंचतो, ही मोठ्या दिलगिरीची गोष्ट होय. व्याकरणासारखे कठीण विषय तयार करितांना शेंकडा ९० मुलांना घरीं आईबापांकडून कोणत्याही प्रकारची मदत मिळण्याचा संभव नाहीं. म्हणून असे विषय शिकवितांना पृथक्करणपद्धतीचा नेहमीं उपयोग करणें अवश्य ठरतें; मग विषय कितीही थोडथोडा झाला तरी पतकरेल. थोडेंच कां होईना, पण तें मुलांना पक्कें समजलें तर त्यांची त्या विषयांत तितकी गति झाली, असें तरी म्हणतां येईल. एक ना धड आणि भाराभर चिंध्या, अशी स्थिति होणें इष्ट नाहीं. विषयाचें ज्ञान मुलांस भराभर अर्धंकच्चें करून दिल्यानें कांहीं त्यांची त्यांत वास्तविक गति होत नाहीं. दोन मैल लांबीच्या गर्द झाडींत एकदम घडकून शिरण्यांत कांहीं फारसें शहाणपण नाहीं. उलट एकादा पायरस्ता शोधून काढण्यासाठीं दहा पांच मिनिटें खर्च केलीं, तर दोन चार तास निष्कारण पडणारा त्रास वांचेल. तेव्हां व्याकरणविषय मुलांस एकाद्या भयंकर झाडीप्रमाणें वाटूं नये, अशा रीतीनें शिकविला पाहिजे. आतां शिक्षक कितीही लक्षपूर्वक शिकविणारा असेना, त्यानें शिकविलेला विषय सर्व विद्यार्थ्यांना सुगम वाटणें अशक्य आहे; कित्येकांना तरी तो खरोखर घोंटाळ्याचा वाटेल. तथापि आपण शिकवितों त्याची समजूत वर्गांतील बहुतेक मुलांना स्पष्टपणें पडली पाहिजे; असा संकल्प प्रत्येक शिक्षकानें करणें अवश्य आहे.

वर्गातील अति बुद्धिमान् मुलें मात्र हुशार होऊन बाकी सर्व मुलांना कांहीं कळणार नाहीं, तर त्यांत कांहींच अर्थ नाहीं. परीक्षेच्या वेळीं पहिल्या दुसऱ्या नंबरच्या मुलांस शेंकडा ९० मार्क मिळाले, परंतु बाकीच्यांस २५ ही मिळाले नाहींत, तर शिक्षकाचे श्रम व्यर्थ होत.

कोणताही विषय पृथक्करणपद्धतीनें शिकवावयाचा असतां त्याची चांगली समजूत पडण्यास नेत्रेंद्रियाची फार मदत होते. म्हणून फळ्याचा ह्या कामीं अप्रतिम उपयोग होतो. पदोपदीं फळ्याचा उपयोग केल्यानें वेळ निष्कारण खर्च होतो असें वाटतें. परंतु वस्तुत: ह्यामुळें वेळ फार वांचतो. नुसत्या शब्दांनीं एकादी गोष्ट स्पष्ट करून सांगण्यास जो वेळ लागणार त्यापेक्षां फळ्याच्या साधनानें तें स्पष्टीकरण त्यांच्यापुढें मांडिल्यास चटकन ध्यानांत येऊन फार कमी वेळ पुरेल. त्रिकोण म्हणजे जिला तीन बाजू असतात व तीन कोन असतात, ती आकृति; अशी नुसती व्याख्या अनेक वेळां सांगितल्यानें त्रिकोणाची चांगलीशी कल्पना मुलांना येत नाहीं. परंतु फळ्यावर एक त्रिकोण प्रत्यक्ष काढून दाखविल्यास त्यांची समजूत तेव्हांच पडते. धड्यांतील एकाद्या मोठ्या सामासिक शब्दाची समजूत करून द्यावयाची असेल तेव्हां त्यांतील पदें फळ्यावर अनुक्रमानें मांडून दाखवावीं. म्हणजे तो सर्व शब्द कसा बनला आहे, हें मुलांच्या मनावर सहज पक्कें बिंबेल. फळ्याचा उपयोग न करितां तोंडच्या तोंडीं पुस्तकावरूनच मुलांना त्यांतील पदें समजावून देऊं लागल्यास फार श्रम पडून

पृथक्करणाच्या कामीं फळ्याचा उपयोग.

पुन्हां इष्ट हेतु इतक्या चांगल्या रीतीनें तडीस जाणार नाहीं. सामासिक वगैरे शब्दांची फोड करण्याकडे आरंभीं आरंभीं फळ्याचा वारंवार उपयोग केल्यास अशा शब्दांचा पदच्छेद करण्यांत मुलें लवकरच प्रवीण होतील; ह्यामुळें उत्तरोत्तर ह्या संबंधानें फळ्याचा वारंवार उपयोग करण्याची जरूर राहणार नाहीं; व दुसरा एकादा कठीण विषय शिकविण्यासाठीं त्याचा उपयोग करण्यास सवड मिळेल. फळ्याचा उपयोग कोणत्याही शिक्षकाच्या ध्यानांत सहज येणारा असल्यामुळें ह्या संबंधानें जास्त पाल्हाळ करण्याची जरूर नाहीं. सारांश, मुलांच्या मनावर शिक्षणाचा ठसा उमटविण्यास अनेक मार्ग आहेत, त्यांचा उपयोग शिक्षक अधिकाधिक करील त्या मानानें त्याच्या शिक्षणाचा सुपरिणाम व्हावयाचा.

संयोगीकरणपद्धतीचा उपयोग.

पृथक्करणपद्धतीच्या खालोखाल उपयोग संयोगीकरणपद्धतीचा आहे. मात्र ह्या पद्धतीची योजना मोठ्या कुशलतेनें केली पाहिजे. मुलांस ज्या गोष्टींचें ज्ञान झालेलें असतें, त्यांचे परस्परसंबंध स्वतः जोडण्याविषयीं त्यांस उत्तेजन दिल्यास त्यांचें तें ज्ञान विशेष परिपक्व होणें साहाजिक आहे. उदाहरणार्थ, सामासिक शब्दांचा पदच्छेद करण्याची सवय पृथक्करणपद्धतीनें मुलांस लाविल्यानंतर कित्येक सामासिक शब्दांतील पदें विद्यार्थ्यांस सांगावीं; व त्यांपासून मूळचा सामासिक शब्द त्यांस ह्या संयोगीकरणपद्धतीच्या द्वारें बनविण्यास शिकवावें. मुलांना अनेक प्रकारच्या खेळांची जशी हौस असते, त्याप्रमाणें एका विषयाचें ज्ञान अनेक

रीतींनीं त्यांना करून दिल्यासही त्यांत त्यांना मोठी मौज वाटते. वर्गांत नंबर दिल्यानें मुलांमध्यें एक प्रकारची स्पर्धा उत्पन्न होते परंतु अशी स्पर्धा त्यांजमध्यें उत्पन्न करूं नये; किंवा इतर कोणत्याही प्रकारें त्यांची धांदल उडवून देऊं नये; ह्मणजे विचारलेल्या प्रश्नाचें मनन करण्यास त्यांना चांगली सवड मिळून फार फायदा होईल. अशा पद्धतींनीं शिक्षण देत असतां नंबर देऊं नयेत; कारण नंबर दिल्यानें कित्येक मुलांस उत्तेजन मिळतें खरें. तथापि कित्येकांना ह्यामुळें पुरता विचार करण्यास सवड मिळत नाहीं. इतकेंच नाहीं, तर अशा धांदलीनें त्यांची विचारशक्ति अजी खुंटते. ह्या संबंधानें कोणास शंका असेल तर त्यानें एकाद्या वर्गाला नंबर देऊन प्रत्यक्ष शिकवून पहावें, व मुलांच्या चेहेऱ्यावर नीट नजर ठेवावी; आणि ज्या मुलाची एकादी चूक निघेल त्याला त्या चुकीचें कारण विचारावें; ह्मणजे त्याच्या अनुभवास येईल कीं, मुलानें प्रश्नाचा विचार मुळींच न करितां घाईमुळें कांहीं तरी उत्तर दिलें आहे. शिक्षणाच्या कामीं अशी घाई केल्यानें फार नुकसान आहे. तसेंच भीतीमुळें विचारशक्ति कुंठित होते. ह्मणून विचारशक्तीस विरोध आणणाऱ्या गोष्टी शिक्षकानें मुलांच्या मनांत उत्पन्न करणें हानिकारक आहे. कोणत्याही प्रकारची भीति मुलांच्या मनांत उत्पन्न झाली कीं, त्यांच्या विचारशक्तीस प्रतिबंध व्हावयाचा, असा सामान्य नियम आहे; आणि नंबर खालीं गेल्यानें अप्रतिष्ठा होण्याची भीति असल्यामुळें तेथेंही हाच नियम लागू आहे. मुलांच्या मनांत अनेक कारणांनीं भीति उत्पन्न करितां येते; परंतु माराच्या

भीतीनें सर्वांत अधिक नुकसान होतें. अशा भीतीमुळें विचाराची गति अजी खुंटते, असें ह्मटलें तरी चालेल. सारांश, विचारशक्तीचें काम सुयंत्र चालावें, अशी इच्छा असेल तर मनावर कोणत्याही प्रकारचें दडपण उपयोगी नाहीं. वर्गांतील एका मुलास एकाद्या वाक्याचें व्याकरण फळ्यावर लिहिण्यास सांगावें; नंतर त्याच्या चुका दाखवून त्या शुद्ध करण्यास कित्येकांस सांगावें; आणि नंतर त्यांचीं कारणें विचारावीं. ह्याहून चांगल्या रीतीनें वर्ग शिकविण्याची पद्धति सांपडावयाची नाहीं.

भूगोल—विद्या शिकविण्यासंबंधानें मि. रिटर यांचें मत.

जर्मनींतील प्रसिद्ध भूगोलवेत्ते मि. रिटर ह्यांनीं भूगोलविद्या शिकविण्यासंबंधानें कित्येक सूचना केल्या आहेत. त्यांवरून संयोगीकरणपद्धतीचा कुशलतेनें उपयोग केला असतां किती फायदा होतो तें स्पष्टपणें ध्यानीं येतें. इतिहास व भूगोल हे विषय एकमेकांच्या अनुषंगानें शिकवावे, अशी त्यांची सूचना आहे. ह्मणजे ज्या देशाचा किंवा प्रांताचा वगैरे भूगोल शिकवावयाचा असेल त्याची प्रथम फळ्यावर बाह्य मर्यादा काढून तींत पर्वत दाखवून नद्यांचे प्रवाह दाखवावे; आणि नंतर लढाया, तह, हल्ले, वगैरे ऐतिहासिक दृष्टीनें प्रसिद्ध असणारीं स्थळें त्यांत भरावीं. सारांश, शिक्षणाचें काम फार सोपें होऊन ते अधिकाधिक मौजेचें वाटण्यासाठीं संयोगीकरणपद्धतीचा उपयोग शिक्षकानें कसा करावा, ह्याचें हें एक उत्कृष्ट उदाहरण आहे. दररोज दहा वीस शहरें वगैरे मुलांकडून पाठ करवून घेऊन तीं इंग्रज, फ्रेंच, रशियन ह्यांपैकीं कोणाच्या

ताब्यांत आहेत, एवढें त्यांजकडून ध्यानांत धरावावयाचें; अशा रीतीनें भूगोल शिकविला असतां त्याचा फारसा उपयोग नाहीं. तर शिक्षकानें एकाद्या देशाची नुसती मर्यादा अजमासानें फळ्यावर काढावी; पुढें प्रत्येक मुलाकडून थोडथोडीं ठिकाणें त्यांत भरवावीं; आणि नंतर छापील नकाशा उघडून त्या दोहोंचें सादृश्य त्यांस दाखवावें. अशा रीतीनें भूगोल शिकविल्यास त्याचा ठसा सर्वांच्या अंतःकरणावर अगदीं पूर्णपणें वठेल. इतिहासांतील महत्वाच्या गोष्टींचें शिक्षण नकाशा काढून त्याच्याद्वारें देत गेल्यानें तो विषय मुलांस खातरीनें अधिक मनोरंजक वाटेल. भूगोलविद्या शिकविण्यांत इतर बहुतेक राष्ट्रांपेक्षां जर्मनीचें पाऊल पुढें आहे. ह्या विषयाचें शिक्षण विशेष चांगल्या रीतीनें देण्यासाठीं तेथील सरकारानें शाळा-खात्यास सूचना दिल्या असतील, किंवा लष्करी कारणामुळें-ही कदाचित् ह्या विषयाकडे तेथें अधिक लक्ष पुरविलें जात असेल. कोणत्याही कारणानें कां होईना, हा विषय तेथें चांगल्या रीतीनें शिकविला जातो, हें निर्विवाद आहे. फ्रेंच आणि जर्मन लोकांची मागें लढाई झाली; तेव्हां फ्रान्स देशाच्या भूगोलाचें खुद्द फ्रेंच सैन्याला जितकें ज्ञान होतें, त्यापेक्षां जर्मन सैन्याला अधिक होतें, असें म्हणतात! तात्पर्य, जर्मन सैन्याला विशेष प्रकारचें शिक्षण देण्याची जितकी तजवीज जर्मन सरकारानें केलेली आहे, तितकी इतर कोणत्याही राष्ट्रांत आढळत नाहीं. तेथील सैन्याला नुसती बिनचूक कवाईत आली म्हणजे पुरी होत नाहीं; तर ह्या लष्करी शिक्षणाप्रमाणें शाळेंतील इतर सामान्य शिक्षणही त्यास देण्याची तजवीज केलेली आहे.

तसेंच तेथील शाळांतील विद्यार्थ्यांसही भूगोल विषयाचें फारच उत्कृष्ट ज्ञान असतें; व प्रसिद्ध स्थळांचें त्यांना फार बारकाईनें वर्णन करितां येतें. बर्लिन येथील बारा तेरा वर्षांचीं मुलें देखील भूगोलाच्या प्रश्नांचीं उत्तरें फार उत्तम देतात. देशांतील शहरें, नद्या वगैरेंची त्यांना इतकी भरपूर माहिती असते कीं, ज्यानें देशांत प्रत्यक्ष प्रवास केला नसेल त्याला तितकी माहिती असण्याचा संभवच नाहीं. अर्थात् इतकीं हुशार मुलें शाळेंत आढळलीं असतां मनाला आनंद व्हावयाचा. बर्लिन येथील एकाद्या मुलाला एडिंबर्ग शहराच्या सभोंवतालच्या सर्व प्रदेशाचें जसें वर्णन करितां येईल, तसें खुद्द त्या शहरांतील तृतीयांश मुलांना देखील करितां यावयाचें नाहीं. तथापि मि. रिटर यांचें वास्तव्य खुद्द बर्लिन येथेंच असल्यामुळें त्या शहरांतील मुलांस ह्या विषयाचें इतक्या उत्कृष्ट रीतीनें शिक्षण कदाचित् मिळत असेल.

मुलांना थोडथोड्या सूचना देऊन संयोगीकरणपद्धतीनें शिक्षण कसें द्यावें हें स्पष्टपणें ध्यानांत येण्यास व्याकरण व भूगोल हे विषय चांगले असल्यामुळें त्यांचाच उल्लेख वर केला आहे. कोणत्याही प्रकारचें शिक्षण देतांना सामान्य तत्त्व शिक्षकानें ध्यानांत ठेवावयाचें तें असें:—ज्या विषयाचा अभ्यास सुरू असेल, त्याशीं ज्या ज्या गोष्टींचा योग्य रीतीनें संबंध पोहोंचत असेल, त्या सर्वांचा उल्लेख करीत जावा, म्हणजे शिक्षणाचें काम नेहमीं चांगल्या रीतीनें तडीस जातें.

**शिक्षक आणि विद्यार्थी ह्यांच्यामध्यें मोकळ्या मनाचें व सलोख्याचें दळणवळण** असेल तर त्या-

शिक्षक आणि विद्यार्थी ह्यांच्यामध्यें मोकळ्या मनाचें व सलोख्याचें दळणवळण असण्याची आवश्यकता.

पासून वर दर्शविल्या प्रकारच्या पद्धतींनीं शिक्षण देत असतां त्याला निःसंशय मदत होईल. अशा प्रकारचें दळणवळण असल्यानें विद्यार्थ्यांस शिक्षण मोठ्या मौजेचें वाटून त्यांना अभ्यास करण्यास मोठी उमेदही येते. तथापि मुलांशीं फाजील सलगी ठेविल्यानें त्यांस चांगलें वळण खरोखर लागत नाहीं; व अशी सलगी विद्यार्थ्यांना ठेवू देणें अगदीं अनिष्ट आहे. ह्या धंद्यांत पडलेल्या लोकांस ही गोष्ट पूर्णपणें अवगत असल्यामुळें त्यांचा गैर समज होण्याचा फारसा संभव नाहीं. सारांश, केवळ शिक्षणाचें काम उत्तम प्रकारें चालावें अशाच प्रकारचें दळणवळण उभयतांत पाहिजे आहे. ज्याच्या योगानें मुलांना शिक्षकाशीं गैरशिस्त सलगी ठेवण्यास उत्तेजन मिळेल, अशा प्रकारचें दळणवळण उभयतांमध्यें मुळींच असूं नये. त्या उभयतांत योग्य प्रकारचेंच दळणवळण असेल तर विद्यार्थ्यांना शिक्षकाशीं गैरशिस्त सलगी ठेवितांच येणार नाहीं. शिक्षक व विद्यार्थी ह्यांजमध्यें जो गुरुशिष्याचा संबंध आहे, त्याला कोणत्याही कारणानें व्यत्यय येऊं नये. जो विषय सुरू असेल त्याजकडे मुलांचें पूर्ण लक्ष लागून शिक्षणाचें काम उत्तम रीतीनें चालावें, एवढ्याच पुरतें दळणवळण ठेवण्याची मुभा आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. एवढ्या बेतानें दळणवळण ठेविल्यानें मुलांस वाईट वळण न लागतां उलट चांगलें वळण लागण्यास मदत होईल. मुलांना कोणत्याही विषयाचें पूर्ण शिक्षण शिक्षकाकडून

मिळालें पाहिजे. ह्मणून विषयासंबंधानें ज्या ज्या शंका येतील त्या त्या शिक्षकाला विचारण्यास त्यांना संकोच अगदीं वाटूं नये; इतकाच काय तो हें दळणवळण ठेवण्याचा उद्देश आहे. मुलांनीं आपण होऊन शंका काढिल्यास शिक्षक केव्हां केव्हां तिकडे अगदीं डोळेझांक करितात. इतकेंच नाहीं, तर त्यांजवर त्यांची खप्पा मर्जी होते. मुलांना विषय कितपत समजला आहे, हें पाहण्यासाठीं ते स्वतः प्रश्न करितात; परंतु मुलांची एकाद्या गोष्टीविषयीं समजूत पडली नसली तर तिजबद्दल त्यांनीं मात्र शिक्षकांस शंका विचारून उपयोग नाहीं! मुलांना शंका काढण्यास सवड ठेविली नाहीं तर प्रत्येक विषय शिक्षकाला अगदीं पूर्णपणें शिकवावा लागेल. परंतु कोणत्या गोष्टी मुलांना नीट समजणार नाहींत, हें निश्चयपूर्वक कळण्यास शिक्षकाला फारसें साधन नसतें; म्हणून त्याला स्वतःच्या विचारावर सर्व भिस्त ठेवावी लागते. अशा रीतीनें दिलेल्या शिक्षणाचा मुलांच्या मनावर परिणाम होईलच, असा निश्चय नाहीं. ह्मणून ह्या अर्धवट पद्धतीचा स्वीकार कोणीं करूं नये. विषय समजण्यास मुलांना कोठें जड जातें तें शिक्षकाला कळणें अवश्य आहे, हें कोणताही अनुभविक शिक्षक कबूल करील. परंतु हें केवळ विद्यार्थ्यांकडूनच कळण्यासारखें असल्यामुळें शिक्षकानें त्यांच्याशीं संकोचवृत्तीनें वागून उपयोग नाहीं. कारण तसें वागल्यानें मुलें मन मोकळें करून बोलणार नाहींत. ह्मणून मुलांस जितक्या गोष्टी समजणें अवश्य असतें तितक्या कळल्या तर ठीकच आहे; परंतु त्या सर्व समजल्या नाहींत तर शिक्षकास तें

कळण्यास मार्ग पाहिजे. असा मार्ग ह्मटला ह्मणजे मुलांस शंका काढूं देणें हाच होय. मुलांना शंका वगैरे विचारूं दिल्यास त्यांना चांगलें वळण लागणार नाहीं अशी भीति कित्येक शिक्षकांस वाटते; ह्मणून ते त्यांना शंका विचारूं देत नाहींत. परंतु ह्यावरून दोन अनुमानें निघतातः-( १ ) त्या शिक्षकांना आपल्या विद्वत्तेविषयीं पक्की खातरी नसावी; किंवा ( २ ) शाळेंत मुलांस उत्तम वळण लावण्यास कोणत्या गोष्टींची आवश्यकता आहे, ह्याचें त्यांना पूर्ण ज्ञान नसावें. योग्य प्रसंगीं विद्यार्थ्यांस शंका विचारण्याची पूर्ण मोकळीक दिली नाहीं, आणि आपण स्वतः सांगूं तेवढ्यावरच आपली सर्व समजूत त्यांना करून घ्यावयास लाविलें, तर उभयतांत मोकळ्या मनाचें दळणवळण राहणार नाहीं; व ह्यामुळें उभयतांसही त्रास होईल. वर्गांत वारंवार नंबर दिल्यापासून खरोखर फार तोटा आहे. कारण आपण एकादी शंका विचारिली आणि तिचें उत्तर खालच्या मुलानें दिलें, तर तो वर जाण्याची मुलास भीति असते. ह्यामुळें आपलें अज्ञान छपवून ठेवण्यांत मुलास फायदा वाटतो. तेव्हां अशा रीतीनें अधिक नुकसान न होण्यासाठीं शिक्षकानें जपलें पाहिजे. वर नंबर मिळविण्याची चढाओढ असल्यानें फायदा होतो, ह्यांत शंका नाहीं; व ह्या चढाओढीमुळें मुलांना झटून अभ्यास करण्यास उत्तेजन मिळतें हेंही खरें आहे. ह्मणून नंबर देण्याची पद्धति अजी बंद करणें शहाणपणाचें नाहीं, हें निर्विवाद आहे. परंतु शाळेंत प्रत्येक विषयाचें मुलांना पक्कें शिक्षण द्यावयाचें असतें. ह्मणून केवळ नंबराच्या आशेनें आपलें अज्ञान

झांकून ठेवण्याची मुलांना शाळेंत सवड देणें, हें फार अनिष्ट आहे. कारण शाळेंत अशा रीतीनें आपलें अज्ञान झांकून ठेवणें, हा वर नंबर मिळविण्याचा एक खुबीदार मार्ग आहे; असें मुलांस ह्यामुळें वाटतें. तेव्हां मुलांची अशी घातक समजूत न व्हावी म्हणून त्यांना मधून मधून शंका विचारण्याची पूर्ण मोकळीक दिली पाहिजे; व आपल्याला ज्या गोष्टी समजल्या नसतील त्या उघडपणें कबूल करण्यास त्यांना विशेष उत्तेजन दिलें पाहिजे. कोणत्याही विषयाचें शिक्षण देत असतां मुलांच्या आंगीं जिज्ञासा असेल तर तिचा फार उपयोग होतो; व मुलांना शंका विचारण्याची सवलत देत गेल्यानें त्यांची जिज्ञासा फार वाढत जाते. कोणतेंही काम असेना, नित्य उठून तें एकाच तऱ्हेनें करीत गेल्यास त्याचा कंटाळा येतो. त्याचप्रमाणें शाळेंत शिक्षण देतांनाही एक ठराविक क्रम * ठेविल्यानें कंटाळा येतो. कालच्याप्रमाणेंच आज सर्व गोष्टी घडणार, अशी समजूत शिक्षक व विद्यार्थी ह्यांपैकीं कोणाचीच होणें इष्ट नाहीं. रात्रीं

---

* "सांप्रतच्या शाळा चालविण्याच्या पद्धतींतील ठळक दोष" ह्या विषयावर युनायटेड स्टेट्समधील कॉनेक्टिकट येथील येल कालेजाचे प्रेसिडेंट डा० नो पोर्टर ह्यांनीं कित्येक लेख लिहिले आहेत; त्यांत त्यांनीं पुढील दोन दोष विशेष रीतीनें नजरेस आणिले आहेत:—( १ ) शाळांतील सर्व कामें अगदीं यथाविधि व नित्य संप्रदायाला अनुसरून करण्याकडे असलेला झोंक आणि (२) वर वर किंवा नुसत्या घोकंपट्टीचा अभ्यास करण्यास शिक्षकांकडून मिळणारें उत्तेजन.

अमेरिकेंतील ह्या अनुभवावरून आपण शहाणें व्हावें.

एकादें दुःस्वप्न पडल्यास माणसास मोठें भय वाटतें, तसेंच भय नित्य उठून एकच प्रकारचा शिक्षणक्रम ठेविल्यानें विद्यार्थ्यांस वाटतें. आपल्या सांप्रतच्या शिक्षण-पद्धतीनें विद्यार्थी मोकळें मन करून बोलण्यास मागें पुढें पाहतात. परंतु अशा वेळीं त्यांच्या मनांत काय आहे तें काढून घेऊन त्यांना कोणत्या गोष्टींची जास्त समजूत पाहिजे आहे, तें कळण्यासाठीं शिक्षकानें बुद्धया खटपट केली पाहिजे. केव्हां केव्हां अभ्यासाच्या विषयांपैकीं कांहीं भाग मुलें केवळ तोंडपाठ करितात, परंतु त्या-विषयीं त्यांची समजूत मुळींच झालेली नसते; कांहीं भागां-संबंधानें त्यांची भलतीच समजूत झालेली असते; आणि ज्या भागाकडे त्यांचें विशेष लक्ष जाणें इष्ट आहे त्या-विषयीं त्यांनीं अगदींच विचार केलेला नसतो. तेव्हां शिक्षणाचा पूर्ण ठसा उमटाविण्यासाठीं ह्या सर्व गोष्टींचें ज्ञान शिक्षकानें कोणत्या ना कोणत्या मार्गानें करून घेणें अवश्य आहे. अमेरिकेंतील युनायटेड स्टेट्समधील सर-कारी शाळांतून विद्यार्थ्यांस शंका विचारण्याची पूर्ण सव-लत दिलेली असते, व अशा शंका काढण्यास आपणांस आपल्या शिक्षकाकडून उत्तेजन मिळून होईल तितकें त्यांचें समाधान व्हावयाचेंच; अशी मुलांची खातरी असते. ह्यामुळें तीं फार मोकळ्या मनानें शंका विचा-रीत असतात; असें कोणीही परका गृहस्थ तिकडील शाळा पाहण्यास गेला असतां त्याला आढळून येतें; व ह्यामुळें त्याला जितकें समाधान वाटतें, तितकें तिकडील इतर कोणत्याही सुधारणेनें वाटत नाहीं. प्राथ-मिक शिक्षणाच्या शाळांपासून तों नॉर्मल स्कुलांपर्यंत (शि-

क्षक तयार करण्याच्या शाळांपर्यंत ) ज्या ज्या शाळ .तिकडे आहेत, त्यांतून हा प्रकार सर्वत्र दृष्टोत्पत्तीस येतो शंका काढणें ही शाळेंतील एक नेहमींचीच गोष्ट आहे. अशी तिकडील विद्यार्थ्यांची समजूत झालेली असते. ति, कडील एक नार्मल स्कूल पाहण्यास प्रोफे. काल्डरवूड-साहेब एकदां गेले होते; तेव्हां त्यांना आढळलेली स्थिति पुढें दिली आहे. ते एका शिक्षकाच्या वर्गांत गेले. त्य शिक्षकाकडे प्राणिगुणधर्मशास्त्र ( Physiology )हा वि षय होता. ते वर्गांत गेले त्या वेळीं त्या दिवसाचा विषय नुकताच शिकवून झाला होता; व शिक्षक आपल्या विद्यार्थ्यांस सांगत होता कीं, " आज दिलेल्या व्याख्याना-संबंधानें मी उद्यां तुमची परीक्षा घेईन. म्हणून तुम्हीं जें टिपून घेतलें आहे, तें बिनचूक आहे किंवा नाहीं हें मला पाहूं द्या. " इतक्यांत एका विद्यार्थ्यानें पटकन् विचारिलें कीं, "मानवी प्राण्याच्या कवटीचें साधारण प्रमाणानें वजन आपण काय सांगितलें ? " शिक्षकानेंही लागलेंच ह्या प्रश्नाचें उत्तर दिलें. पुढें एकामागून एक प्रश्नांची सुरवात झाली, व सर्वांची विषयासंबंधानें पक्की समजूत होईपर्यंत तो क्रम सुरूच होता. हें शंकानिवृत्तीचें काम आटोपल्यानंतर तास पुरा होण्यास दहापांच मिनिटें राहिलीं होतीं. तितक्या वेळांत ह्या शंकांमुळें विद्यार्थ्यांस विषयासंबंधानें आणखी जी माहिती देणें इष्ट दिसलें, ती शिक्षकानें दिली. हें एक उदाहरण नमुन्यासाठीं येथें दिलें आहे. परंतु अमेरिकेंतील शाळांतून हा प्रकार सर्वसाधारण आहे. हा प्रकार अति प्रशंसनीय आहे, हें उघडच आहे. कोणत्याही विषयाचें शिक्षण

देतांना त्या संबंधानें मुख्य मुख्य गोष्टी सांगणें हा मार्ग सर्वांत उत्तम, हें म्हणणें अविचाराचें होय. प्रत्येक शिक्षकानें स्वतः लक्षपूर्वक अवलोकन करून विचारानें आपला मार्ग ठरविला पाहिजे. परंतु नित्य उठून एकाच पद्धतीनें शिक्षण दिल्यानें मुलांना फार कंटाळा येतो; ह्मणून हरएक उपायांनीं त्यानें हा कंटाळा घालविला पाहिजे. शिक्षकाला मानवी स्वभावाचें ज्ञान असलें पाहिजे; आणि मुलांचें लक्ष अभ्यासाकडे वेधून त्यांची मानसिकशक्ति वाढविण्यासाठीं योग्य प्रकारचे जे अनेक उपाय ह्या प्रकरणांत ठिकठिकाणीं दर्शविले आहेत, त्यांची योजना त्यानें केली पाहिजे.

---

# प्रकरण ४ थें.

## मुलांचे स्वभाव बनविणें.

मुलांची विचारशक्ति कशी वाढवावी, एवढ्याच विषयाचें विवेचन मागील भागांत केलें. आतां त्यांच्या मनोवृत्ति सुधारून त्यांस ताळ्यावर कसें आणावें, ह्याचा विचार ह्या भागांत करूं. मुलें जीं जीं कृत्यें करितात, तीं करण्याविषयीं प्रेरणा ह्या मनोवृत्तींपासूनच उत्पन्न होतात. ह्मणून त्यांच्या अंगच्या अयोग्य मनोवृत्तींचें नियमन केलें असतां त्यांजकडून वाईट कृत्यें घडण्याचा संभव राहणार नाहीं. विद्यार्थ्यांना आपला वर्तनक्रम विचारपूर्वक ठरवितां यावा, ह्मणून शिक्षकानें त्यांना थोडीबहुत मदत देणें इष्ट आहे. ही मदत त्यानें कशी द्यावी, ह्याचा विचार ह्यापुढें ओघानेंच येतो. मुलांच्या वर्तनावर देखरेख ठेवून त्यांस चांगलें वळण लावणें हें शिक्षकाच्या कर्तव्यांपैकीं एक कर्तव्य आहे; व ह्याजबद्दलच्या कारणांचा उल्लेख मागें झालेला आहे. शिक्षक ही पदवी त्यास असून तिचा अर्थ अति व्यापक आहे. शाळेंत मुलांस उत्तम वळण लावण्यासाठीं अवश्य वाटेल ती सुधारणा त्यांच्या स्वभावांत हळू हळू करण्याचें काम शिक्षकाकडे सोंपविलेलें असतें; व ही सुधारणा अशा प्रकारचें वळण त्यांस लावूनच होतां होईल तों करावयाची

शिक्षणांत मुलांचें वर्तन सुधारण्याचाही समावेश होतो.

असते. मुलांना निरनिराळ्या विषयांचें **सामान्य शिक्षण देणें व त्यांच्या स्वभावांस वळण लावणें,** ह्या दोन गोष्टी वस्तुतः अगदीं भिन्न असून ह्यांचें पृथक् पृथक् वर्णन करण्यास प्रत्यवाय नाहीं. परंतु हें दोन्ही प्रकारचें शिक्षण शाळांतून अभ्यास सुरू असतांनाच देण्याची तजवीज पाहिजे. इतिहास, भूगोल, गणित इत्यादि विषयांचें शिक्षण–सामान्य शिक्षण–शिक्षक देतो तें अशासाठीं कीं विद्यार्थ्यांच्या आंगीं अवलोकनशक्ति येऊन त्यांना बऱ्याच गोष्टींचें ज्ञान व्हावें, व आपल्या बुद्धीचा त्यांना सहज उपयोग करितां यावा. परंतु त्यांच्या स्वभावांस योग्य वळण लावण्यासाठीं तो झटतो, तेव्हां त्याचा उद्देश असा असतो कीं, त्यांच्या आंगीं न्यायप्रियता, औदार्य, शौर्य इत्यादि गुण यावे. ह्यावरून ह्या दोन प्रकारच्या शिक्षणांपैकीं अधिक महत्त्वाचें कोणतें, हें तेव्हांच लक्षांत येईल. निर्बुद्धपणा एक वेळ पतकरेल,पण नीच स्वभाव फार वाईट;स्मरणशक्ति धड नसली तरी चालेल, पण अप्पलपोटेपणा फार निंद्य; आणि अज्ञान एक वेळ पुरवेल, परंतु भेकडपणा नको. सारांश, नीतिशिक्षणाला प्राधान्य देणें अवश्य ठरतें. मुलांना सामान्य विषयांचें ज्ञान करून देण्याच्याच उद्देशानें हल्लीं शाळांचा सर्व शिक्षणक्रम ठरविलेला आहे; ह्यामुळें शाळांतून नीतिशिक्षणाला प्रत्यक्ष प्राधान्य शिक्षकांना देतां येणार नाहीं खरें. तथापि नीतिशिक्षणाला स्वतंत्र तास नेमून त्याजबद्दल वारंवार व्याख्यानें दिल्यानें कांहीं मुलांवर त्याचा विशेष परिणाम होत नाहीं; तर आपल्या आयुष्यांतील हरएक कृत्यांत सन्मार्गाचें आचरण ठेवणयचा

सराव मुलांस लावीत गेलें म्हणजे कार्यभाग चांगला होतो. म्हणून अभ्यासाच्या विषयांत नीतिशिक्षणाचा समावेश न केल्यामुळें इतर विषयांप्रमाणें त्या शिक्षणाला स्वतंत्र तास वेळापत्रकांत नसले तरी शिक्षकानें ह्या संबंधानें मुळां-वर सतत लक्ष ठेविलें पाहिजे. व्याकरण, इतिहास, भू-गोल, अथवा कोणता का विषय वर्गांत सुरू असेना; मुलांचे स्वभाव सुधारण्यास त्या सर्वांचा सारखाच उपयोग होतो. बहुतेक शिक्षकांस ही गोष्ट संमत आहे. **मि. करी** यांनीं ' **शिक्षण** ' ह्यावर एक पुस्तक लिहिलें आहे; त्यांत ते प्रथमारंभींच म्हणतात :—" मुलांचे स्वभाव सुधार-ण्यास जीं अनेक साधनें आहेत, त्या सर्वांचा समावेश **शिक्षण** ह्या शब्दांत होतो."

आतां हेंही विसरतां कामा नये कीं मुलांस सन्मार्गास लावण्यापेक्षां त्यांस भिन्न भिन्न विषय शिकविण्याचें काम फार सोपें आहे. सामान्य शिक्षण देण्यास ज्या कित्येक गोष्टींची आवश्यकता आहे त्यां-हून बऱ्याच भिन्न गोष्टींची आवश्यकता नीतिशिक्षण दे-ण्यास आहे. शिक्षकाला एकाद्या विषयाचें चांगलें ज्ञान असलें, व त्यानें तो मनापासून विद्यार्थ्यांस समजावून दि-ला, ह्मणजे त्यांची समजूत पडल्याशिवाय राहणार नाहीं. ही सामान्यशिक्षणाची गोष्ट झाली. परंतु मुलांच्या स्वभा-वांत अशा सुलभ रीतीनें सुधारणा होत नाहीं. नीति-विषयक एकादा नियम तुम्हीं मुलांना कितीही स्पष्ट रीतीनें सांगितला, व त्याप्रमाणें वागण्याविषयीं त्यांजवर सक्तीही केली; तरी तीं तो नियम पाळितीलच

मुलांना शिकविण्याचें काम सोपें; परंतु सन्मार्गा-स लावण्याचें कठीण आहे.

असें खातरीनें म्हणतां येत नाहीं. असले नियम मुलांस विशेष फोडून सांगण्याची फारशी आवश्यकता नसते; परंतु मुलें जेव्हां जेव्हां हे नियम मोडितील, तेव्हां तेव्हां त्यांस ताकीद देणें अवश्य असतें; व हे नियम पाळण्याविषयीं अन्य रीतीनें त्यांना उत्तेजन देणेंही जरूर असतें. ह्यावरून उघड होतें कीं, सामान्य शिक्षण सर्व मुलांना एकदम देतां येण्यासारखें आहे. परंतु नीतिशिक्षण देतां येण्यास कोणत्या मुलांत कोणते दोष आहेत हें शिक्षकानें विशेष काळजीपूर्वक ठरविलें पाहिजे.

मुलांचें वर्तन सुधारण्यासाठीं शिक्षकाच्या अंतःकरणांत त्यांजविषयीं खरें प्रेम असलें पाहिजे.

आपलें वर्तन सुधारण्यास मुलें झटत असतां त्यांना अनेक अडचणी येतात. त्या अडचणी दूर करून त्यांना सन्मार्गास लावितां येण्यास शिक्षकांच्या आंगीं मुख्यत्वें एक गुण असलाच पाहिजे. तो कोणता म्हणाल तर **मुलांविषयीं खरा कळकळ.** मुलांच्या स्वभावांत विशेष गुणदोष काय आहेत, हें शिक्षक लक्षपूर्वक पाहील तेव्हांच त्याला त्यांचे स्वभाव सुधारण्याच्या कामास योग्य दिशेनें आरंभ करितां येईल. तथापि मुलांना त्यांच्या मातापितरांपासून बुद्धीचा व शरीरसंपत्तीचा वांटा जसा जन्मतःच मिळालेला असतो, त्याप्रमाणें त्यांच्या स्वभावांतील विशेष गुणदोषही मुलांमध्यें जन्मतःच आलेले असतात. हें सर्वसाधारण तत्त्व ध्यानांत आणून त्यांचे स्वभाव सुधारण्याचा प्रयत्न केला पाहिजे. मुलांच्या स्वभावांत कित्येक दोष उपजतच असतात, ह्याविषयीं कोणी

शंका घेईलसें दिसत नाहीं; म्हणून ह्या संबंधानें विशेष प्रतिपादन करण्याची आवश्यकता नाहीं. परंतु ही गोष्ट शिक्षकानें ध्यानांत ठेवून त्याप्रमाणें वर्तन ठेविलें नाहीं, तर मुलांना त्यानें अन्यायानें वागविल्याप्रमाणें होईल; व त्याच्या आंगीं अवश्य तितकी दीर्घदृष्टि नाहीं, असें म्हणावें लागेल. पहा, एकादें मूल जन्मतःच आनंदी असतें, व एकादें जन्मतःच चिडखोर असतें. तथापि हे गुणदोष त्यांजमध्यें उपजत आलेले असल्यामुळें एकाची स्तुति करून दुसऱ्याला नांवें ठेवणें योग्य नाहीं. ह्या दोघांची एकाद्यानें चटकन कांहीं खोडी काढिली तर पहिल्याला त्याबद्दल कांहींच वाटत नाहीं; परंतु दुसऱ्याच्या मनावर तेव्हांच परिणाम होतो. तथापि ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. दोघांचे स्वभाव अगदीं भिन्न प्रकारचे असल्यामुळें दोघांच्या मनावर एकाच कृत्याचे निरनिराळे परिणाम घडणें अगदीं साहजिक आहे. तेव्हां ह्या चिडखोर मुलाला आपल्या स्वभावांतील तो मुख्य दोष कसा काढून टाकितां येईल, एवढाच महत्त्वाचा प्रश्न असून त्याचा विचार शिक्षकानें करावयाचा आहे. एकाद्या मुलाचा स्वभाव जन्मतःच चिडखोर असला तर त्याला त्याजबद्दल शिक्षा करणें अन्यायाचें होय. तसेंच एकादें मूल उपजत भितरें असतें, व एकादें उपजत अविचारी असतें; म्हणून त्यांस नांवें ठेवणें किंवा इतर रीतींनीं शिक्षा करणें वेडेपणाचें होय. उलट प्रत्येकांतील दोष नाहींसा होण्यास कोणकोणत्या विशेष अडचणी आहेत, व त्या दूर करण्यास त्यांना उत्तम प्रकारें मदत देण्याचे मार्ग कोणते; एवढाच

त्यांच्या स्वभावांतील भिन्न भिन्न दोष.

विचार शिक्षकानें करावा. भित्र्या मुलाच्या शरीराची जन्मतःच अशी घडण असते कीं, त्याच्या मज्जातंतूंवर एकाद्या गोष्टीचा तावडतोब परिणाम होतो; म्हणून क्षुल्लक कारण घडलें तरी तें तेव्हांच घाबरून जातें. त्यामुळें त्याच्या सर्व शरीरांत चळवळ उत्पन्न होऊन तिचा परिणाम मनावर घडतो. ह्या मुलाला त्याच्या भित्रेपणाबद्दल शिक्षा करणें किंवा त्याची थट्टा करणें ही मोठी चूक होय. परंतु अशा चुका शिक्षकाकडून अनेक वेळां घडतात; तेणेंकरून अति नुकसान होतें; व नीतिशिक्षणाच्या मुख्य नियमाचें ज्ञान शिक्षकास नसून त्या संबंधानें त्यानें विचार केलेला नाहीं, असें ह्या चुकांवरून सिद्ध होतें. मुलांच्या आंगचा भित्रेपणा घालवून त्यांच्या आंगीं धीटपणा आणण्यासाठीं शिक्षकानें कांहीं उपाय मनांत विचारपूर्वक योजून ठेविले पाहिजेत. तसेंच हे उपाय ठरवितांना निरनिराळ्या प्रसंगीं मनुष्याच्या मनाची स्थिति कसकशी बदलते, ह्याचाही त्यानें विचार केला पाहिजे. शिक्षकानें असें केलें नाहीं तर विद्यार्थ्यांचें त्याच्या हातून अकल्याण होण्याचा संभव आहे; व अशा रीतीनें झालेलें नुकसान मुलांना जन्मभर सोसावें लागेल. सारांश, मुलांमधील निरनिराळे दोष प्रथम लक्षांत आणून नंतर त्यांची सुधारणा करण्यास शिक्षकानें आरंभ केला पाहिजे; आणि त्यांचे ते दोष घालविण्यास कोणत्या अडचणी येणार आहेत, त्या ध्यानांत आणून दिवसेंदिवस तीं विचारानें व सावधगिरीनें वर्तूं लागतील, अशा तऱ्हेनें त्यांशीं शिक्षकानें वागलें पाहिजे.

मनुष्याचा **मूळचा स्वभाव** आणि **बाह्योपायांनीं बनणारा स्वभाव** ह्यांत मोठा फरक आहे; तो विद्याप्रसा-

रार्थ झटणारांनीं अवश्य ध्यानांत ठेवावा. मुलांच्या मूळच्या स्वभावांतच कित्येक दोष असून ते काढून टाकावयाचे असतात. मुलें सुस्वभावी होण्यास त्यांजमध्यें हे दोष अगदीं राहून उपयोग नाहीं. नीतिदृष्ट्या सर्वांत उत्तम आचरण कोणतें, त्याच्या खालोखाल कोणतें, इत्यादि गोष्टींचा विचार येथें कर्तव्य नाहीं. कारण प्रस्तुत विषयाच्या विवेचनास त्याची अवश्यकता नाहीं. शिक्षकाला मुलांचे स्वभाव सुधारण्याच्या कामांत केवढी अडचण येते, व त्यांचे दोष घालविण्यास त्यांना कोणत्या रीतीनें वागवावें ह्याविषयीं त्याचा अनेक वेळां किती गोंधळ उडतो, हें मागील विवेचनावरून स्पष्टपणें कळून येईल. एकाद्या मुलामध्यें जन्मतःच एक सद्गुणाचा व एक दुर्गुणाचा अंकुर असेल; तर सद्गुणाच्या अंकुराची जोपासना करून तो वाढविण्यास शिक्षकाला विशेष परिश्रम पडणार नाहींत. परंतु तो दुर्गुणाचा अंकुर युक्तिप्रयुक्तीनें समूळ उपटून काढण्यास त्याला फार परिश्रम पडतील. तो दुर्गुण घालविण्याचें काम अति नाजूक असून प्रसंगानुसार शिक्षकाला फार विचारपूर्वक वर्तलें पाहिजे. मुलांच्या आईबापांना व शिक्षकांना अति धोरण राखावें लागतें तें ह्याच कामीं होय. सर्व मुलांचे दोष घालविण्यास लागू पडतील असे सामान्य नियम ठरविणें अगदीं अशक्य आहे.

मूळ स्वभाव व बाह्योपायांनीं बनणारा स्वभाव ह्यांतील फरक.

सारांश, मुलांचे स्वभाव सुधारण्यास काय उपाय योजावे हा विषय मोठा घोंटाळ्याचा आहे. तथापि मुलांना

मुलांचे स्वभाव शिक्षकांस सुधारितां येत नाहींत;

तर त्या कामीं त्यांना फक्त मदत देतां यते.

**उत्तम वळण लावण्याचें सामर्थ्य शिक्षकाच्या आंगीं फार असतें** हें नीट ध्यानांत आणिलें असतां त्या संबंधानें थोडे बहुत नियम आपणांस ठरवितां येतील. मुलांचे स्वभाव शिक्षकास सुधारितां येत नाहींत; तर त्यांनीं आपापले स्वभाव कसे सुधारावे, ह्याजबद्दल त्यांना मदत देतां येते. हा मुद्दा अति महत्त्वाचा असून त्यांना मदत कोणत्या रीतीनें द्यावी, हें ठरवितांना ह्याचा फार उपयोग आहे. मुलांचे स्वभाव सुधारण्यास प्रथम त्यांच्या आंगीं आत्मसंयमनाचा गुण पूर्णपण खिळला पाहिजे; आणि हें आत्मसंयमन ज्याचें त्यानेंच करावयाचें असल्यामुळें स्वभाव सुधारण्याचें काम वस्तुतः ज्या त्या व्यक्तीवर अखेरीस येऊन पडतें. मुलांच्या स्वभावांत कोणत्याही प्रकारचा फेरफार होत चालला तरी, बुद्धिपुरःसर ते ज्या सवयी लावून घेतात, त्यांमुळेंच तो होत असतो. त्यांच्या स्वभावांत जन्मतःच कित्येक प्रकारचे कल विशेष जोराचे असतात; व ह्या कलांचें कांहीं चालूं न देतां आपलें वर्तन ताळ्यावर आणण्याचें सामर्थ्य त्यांस येईल, तेव्हांच नीतिदृष्ट्या त्यांच्या स्वभावांत सुधारणा झाली असें समजावें. ह्या कलांचें कांहीं चालूं न देतां त्यांचें नियमन मुलें करूं लागतील, तेव्हांपासून त्यांच्या स्वभावांत सुधारणा होण्यास आरंभ झाला; असें म्हणण्यास हरकत नाहीं. जेव्हां जेव्हां मुलें बरेंच आत्मसंयमन दाखवितात, तेव्हां तेव्हां त्यांच्या आचरणावर विचाराचा पगडा बसत चालला आहे असें स्पष्ट ठरतें. मुलांचा स्वभाव चांगला बनो वा वाईट बनो; तो गैर समजुतीनें वागल्यामुळें बनलेला नसतो. एकादी

गोष्ट वाईट आहे असें त्यांच्या मनाला नक्की वाटत असतें; परंतु तिकडे मन जाऊं द्यावयाचेंच नाहीं, इतका निग्रह आंगीं नसल्यामुळें त्या गोष्टीची त्यांना सवय लाग-ते; व अशा रीतीनें स्वभाव बिघडतो. उत्कृष्ट रीतीनें मुलांचे स्वभाव सुधारण्याचें काम मोठें नाजूक आहे; व तें एक दोन वर्षांत होणारें नसून कित्येक वर्षें प्रयत्न सुरू ठेविला पाहिजे. हें काम लांबणीवर टाकिलें असतां किंवा तें अयोग्य रीतीनें केलें असतां नुकसान होईलच; परंतु मुलांवर ह्या कामीं सक्ती केली असतां अतोनात नुकसान होईल. मुलांनीं आपखुषीनेंच आपला वर्तनक्रम ताळ्यावर आणिला पाहिजे; आणि अशी इच्छा त्यांस उत्पन्न होण्यास बिनतोड उपाय दोन आहेतः-( १ ) स्वतःच्या विचारशक्तीचा उपयोग; आणि ( २ ) ज्या वडील माणसांबद्दल मुलांची पूज्यबुद्धि झालेली असेल त्यांनीं खरी कळकळ दाखवून दिलेलें उत्तेजन.

सहवासाचा स्वभावावर परिणाम.

शिवाय हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, मुलांना चांगल्या मंडळीचा सहवास असेल तर तेणेंकरून त्यांचे स्वभाव सुधारण्यास फार मदत होईल. परंतु सहवास वाईट असेल तर ह्या कामीं फार अडथळे येतील. घरचीं वडील माणसेंच स्वतः अनीतीनें वागूं लागलीं तर मुलांना सद्वर्तनाचें महत्त्व वाटेनासें होईल. तसेंच त्यांची मित्रमंडळी आप्पलपोटी असली, तर हा निंद्य दुर्गुण ह्यांच्याही स्वभावांत हळू हळू शिरूं लागेल. स्वार्थ साधण्याची इच्छा मानवी स्वभावांत विशेष असते; आणि आत्मसंयमनाचें काम मनुष्यास फार त्रासदायक वाटतें;

ह्मणून आपला फायदा थोड्या श्रमानें जेणेंकरून होईल त्या मार्गाचें अवलंबन तो तेव्हांच करितो; मग तो मार्ग नीतीचा असो वा अनीतीचा असो. आतां स्वतःचें नुकसान करून घेण्यास तयार झाल्याशिवाय आत्मसंयमनाचा गुण आंगीं यावयाचा नाहीं. परंतु असें नुकसान झालें तरी कांहीं चिंता नाहीं, इतक्या उच्च स्थितीस मन नेण्यास फार आयास पडतात. हें काम मोठें कष्टदायक असून आरंभीं आरंभीं तर माणसाची पक्की परीक्षा पाहणारें आहे. तथापि अशा प्रकारचें नुकसान करून घेण्यास विद्यार्थ्यांना घरच्या वडील माणसांकडून उत्तेजन मिळालें पाहिजे; आणि त्यांच्या मित्रमंडळीकडून अडचणीच्या प्रसंगीं त्यांना मदत मिळाली पाहिजे. ह्मणजे त्यांना ह्या आयासाचें फारसें ओझें वाटणार नाहीं व त्यांना फारसें दुःख होणार नाहीं. सारांश, सद्गुणांस उत्तेजन मिळून ते दिवसेंदिवस वाढत जातील अशा रीतीनें शाळेंतील सर्व बंदोबस्त ठेवून हरएक प्रकारचें वळण मुलांना शिक्षकानें लाविलें पाहिजे.

केवळ अधिकाराच्या जोरावर स्वभाव सुधारितां येत नाहींत.

तथापि अशा प्रकारचें उत्तेजन मुलांस दिलें म्हणजे शिक्षकाचें कर्तव्य संपलें असें नाहीं. शाळेंत शिस्त राहण्यासाठीं शिक्षक जे उपाय योजितो, त्याचीही ह्या कामीं मदत होते. परंतु ह्या अशा प्रकारच्या मदतीपासून सर्व कार्यभाग कांहीं उरकत नाहीं.

---

* "उत्तम प्रकारचे नागरिक बनविणें" हेंच शिक्षकाचें कर्तव्य होय, असें **डा० डोनल्डसन** यांनीं म्हटलें असून त्यांचें तें म्हणणें यथार्थ आहे.

वर्ग सुरू असतां मुलें कितीही उत्तम रीतीनें वागत असलीं, तरी सुटी होऊन तीं शाळेबाहेर पडलीं ह्मणजे कांहीं निराळाच प्रकार आपल्या दृष्टोत्पत्तीस येण्याचा संभव आहे. तेव्हां मुलांना मनसोक्त वागण्याची मोकळीक मिळाल्यामुळें त्यांच्या स्वभावांत जे निरनिराळे दोष असतात ते आपणास नीट कळून येतात. मुलांचे स्वभाव बरेच भिन्न भिन्न प्रकारचे असतात, व कित्येक मुलें तर आपल्या सोबत्यांस त्रास देण्यास अगदीं मागेंपुढें पाहत नाहींत; असें आपणास तेव्हां आढळतें. वर्गांत जें वळण लागलेलें दिसतें, तें अधिकाराच्या जोरावर असतें. परंतु स्वभावांत सुधारणा होणें, ती केवळ अधिकाराच्या जोरावर होत नाहीं. उलट तो जोर वारंवार दाखविला तर मुलांचा स्वभाव सुधारण्याचें एकीकडे राहून तो बिघडण्याचा मात्र संभव असतो. तसेंच कित्येक शिक्षक उठल्या बसल्या छडीचा उपयोग करून हा जोर दाखवितात, व त्यामुळें मुलांना वर्गांत ब्रही काढितां येत नाहीं. हा प्रकार तर अगदीं निंद्य होय. अधिकाराच्या जोरावर मुलें आज्ञा पाळितात, ती बहुधा नाखुषीनें पाळितात; व अशा रीतीनें त्यांना जबरीनें सन्मार्गास लाविल्यास स्वभावांत कायमची सुधारणा होण्यास फारशी मदत होत नाहीं. असें सक्तीचें दडपण मुलांवर ठेविल्यास त्याचा त्यांना मनापासून मोठा तिटकारा वाटूं लागतो; व ह्यामुळें पुढें फार अनिष्ट परिणाम घडण्याचा संभव असतो. ह्मणून मुलांची नीतिविषयक आचरणाविषयीं पक्की समजूत घालून देऊन तीं आपण होऊन तसें आचरण ठेवितील अशा धोरणानें त्यांना शिक्षण दिलें पाहिजे. नाहींतर त्यां-

त्यावर दडपण आहे तोंपर्यंत तीं दाबांत राहतील; परंतु तें दूर झाल्याबरोबर अगदीं बेसुमार वर्तू लागतील. कवायतीच्या कामांत मुलें कितीही निष्णात झालीं तरी तेवढयावरून त्यांच्या स्वभावांत नीतितत्त्वें बिंबलीं, असें होत नाहीं. तसेंच विद्याप्रसाराचे उपाय कितीही उत्कृष्ट रीतीचे योजिले, तरी त्यांनींही हें काम पूर्णपणें होत नाहीं. अशा प्रकारच्या बाह्योपायांनीं स्वभावांत पूर्ण सुधारणा होऊं शकत नाहीं. मग ते उपाय कितीही स्तुत्य असोत. अशा आगंतुक उपायांनीं मुलांस सन्मार्गास लावितां येईल, तर सद्वर्तनाची किंमत फार कमी ठरेल. सारांश, सद्वर्तनाची योग्यता प्रत्येक मुलाच्या अंतःकरणांत पूर्णपणें ठसून त्यानें आपण होऊन स्वतःचें वर्तन सुधारीत गेलें पाहिजे.

मुलांचे स्वभाव सुधारण्याचे कामीं त्यांना मदत देण्यासाठीं शिक्षकानें प्रथम त्यांचे **व्यक्तिविषयक दोष ध्यानांत आणिले पाहिजेत.** इतिहास, भूगोल, गणित इत्यादि विषयांचें शिक्षण शंभर मुलांना देखील एकदम देतां येईल. परंतु त्यांच्या स्वभावांची सुधारणा अशा एकाच रीतीनें व्हावयाची नाहीं. प्रत्येक मुलाचा स्वभाव शिक्षकानें बारकाईनें पूर्णपणें ध्यानांत आणून त्याच्यामध्यें विशेष दोष कोणते आहेत, तें प्रथम समजून घ्यावें. हे दोष त्याला समजलेले नसतील तर त्याच्या मदतीचा खरा उपयोग विद्यार्थ्यास होणार नाहीं. पहा, वैद्याला शंभर रोगी पाहण्यास जावयाचें आहे; प-

मुलांचे स्वभाव सुधारण्यासाठीं प्रत्येक मुलाला निरनिराळ्या प्रकारची मदत करावी लागते.

रंतु तो घरींच औषधांच्या कशा तरी शंभर यादी खरडून त्या ओळीनें रोग्यांचीं घरें लागतील तसतशा फेंकून देईल, तर त्यांचा कांहीं उपयोग होईल काय? म्हणून प्रत्येक मुलामध्यें विशेष दोष कोणता आहे, हें ध्यानांत आणिल्याशिवाय शिक्षक वर्तेल तर त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. मुलाच्या स्वभावाची खरी सुधारणा करितां येण्यास त्याच्या स्वभावाची पूर्ण ओळख शिक्षकास होणें अति आवश्यक आहे. आतां कोणी अशी हरकत आणितील कीं, विद्यार्थ्यांस भिन्न भिन्न विषय शिकविणें हें शिक्षकाचें मुख्य कर्तव्य असल्यामुळें प्रत्येक मुलाच्या स्वभावाची माहिती करून घेण्यास त्याला वेळच राहणार नाहीं. तथापि मुलाच्या स्वभावांवर नजर ठेवण्याची ज्यांना सवय असेल, त्यांना असें लक्ष ठेवण्यास स्वतंत्र वेळ नेमून देण्याची आवश्यकता नाहीं. ह्या धंद्यांत जे मोठे नामांकित शिक्षक होऊन गेले, ते वर्गांत सामान्य अभ्यास सुरू असतांनाच मुलांच्या स्वभावांवरही लक्ष ठेवीत असत. सारांश, शिक्षकाला अशाच रीतीनें लक्ष ठेविल्याशिवाय गत्यन्तर नाहीं. मुलांच्या स्वभावांतील दोष शाळेंतील नेहमींचे अभ्यास सुरू असतांच शिक्षकाच्या चांगले ध्यानांत येतात. प्रत्येक मुलाशीं खाजगी रीतीनें बोलण्याचे प्रसंग आणून त्याच्या स्वभावांतील दोष ताडण्याचा प्रयत्न शिक्षक करूं पाहील, तर फारसा उपयोग होणार नाहीं. कारण अशा प्रसंगीं मुलांवर शिक्षकाचें प्रत्यक्ष वजन राहिल्यामुळें तो फार सावधगिरीनें वागेल; ह्यामुळें त्याच्या आंगचे दोष दृष्टोत्पत्तीस येणार नाहींत. म्हणून वर्गांत नंबरासाठीं मुलांची

चढाओढ सुरू असते; तीं एकमेकांना चिडवीत असतात; वरचेवर त्यांचा आशाभंग होत असतो; आणि खेळण्याचा तास आला म्हणजे त्यांस एक प्रकारचें स्फुरण येत असतें; अशा प्रसंगींच प्रत्येकांत कोणकोणते दोष आहेत ते लक्षपूर्वक पाहून ते घालविण्यासाठीं आपण काय करणें अवश्य आहे, हें शिक्षकानें ठरविलें पाहिजे. वर दर्शविलेल्या प्रसंगीं विद्यार्थ्यांवर त्याचें लक्ष राहिलें पाहिजे. कारण ह्या वेळीं प्रत्येक मुलास वाटत असतें कीं, आपल्यावर शिक्षकाचें फारसें लक्ष नाहीं; व ह्मणून तो मनसोक्त वागत असतो. ह्यास्तव अशा वेळीं त्याच्या स्वभावांतील दोष कळण्यास फार उत्तम संधी असते. चिडखोर मुलें कोणतीं; हट्टी कोणतीं; अविचारी कोणतीं भितरीं कोणतीं; आपले हेतु गुप्त ठेवून कपटानें वागणारीं कोणतीं; आणि इतर मुलांवर ताबेदारी चालवून त्यांजवर आपलें वर्चस्व मिरविणारीं कोणतीं; हें शिक्षकाला अशा रीतीनें नजर ठेविल्यानें तेव्हांच कळून येतें. हे दोष एकदां ध्यानांत आले ह्मणजे आपल्याला पुढें काय करावयाचें हें शिक्षकाच्या ध्यानांत येईल; आणि ह्या सर्व मुलांस सरसकट एका तऱ्हेनें सुधारितां येणें अशक्य आहे, अशी त्याची खातरी होईल. हरएक मुलास त्याच्या आंगचा दोष घालविण्यास योग्य प्रकारची मदत वक्तशीर देण्यास शिक्षकानें झटलें पाहिजे. मुलानें एकादें सत्कृत्य केलें असतां शिक्षकानें थोडें प्रसन्न मुद्रेनें त्याजकडे पहावें; व अप्रशस्त वर्तन ठेविलें असतां त्याला आपली नाखुषी दर्शवावी, ह्मणजे तेणेंकरून आपण कशा रीतीनें वागत आहों ह्याचा बोध मुलाला तेव्हांच हो[illegible]

परंतु अशा प्रकारचें उत्तेजन किंवा धमकी ज्या मुलाला देणें असेल, त्याला मात्र तिचा बोध व्हावा; शाळेंतील सर्व मुलांच्या ध्यानांत ती गोष्ट येऊं नये. शाळेंतील *लॉग-बुकामध्यें ह्या नुसत्या नजरेला फारसें महत्त्व दिलेलें आढळणार नाहीं. परंतु मुलांच्या कोंवळ्या अंतःकरणावर ह्या नजरेचा कायमचा ठसा उमटतो. एकादा मुलगा अनुचित वर्तन करीत आहे; असें आढळल्याबरोबर हळूच एकादा रागाचा शब्द उच्चारावा; इतका हळू कीं, त्याच्या शिवाय दुसऱ्यास तो ऐकूंच जाऊं नये; ह्मणजे तसें वर्तन इतःपर न करण्याविषयीं तो मुलगा निश्चय करील. तथापि त्याचा तो निश्चय निरंतर जागृत राहील, अशा तऱ्हेनें शिक्षकानें पुढें त्याशीं दररोज वागलें पाहिजे. अशा शब्दाचें स्मरण मुलाला जन्मभर राहण्याचा संभव आहे. ह्या संबंधानें प्रोफेसर काल्डरवूड ह्यांना स्वतः अनुभव आलेला आहे. ते म्हणतातः-

" एडिंबर्ग हायस्कुलांत डा० वाइड नांवाच्या एका पूज्य गुरूच्या वर्गांत मी होतों. तेव्हां त्यांनीं एकदां मजकडे रागानें पाहिलें होतें; त्याचें मला अद्यापि इतकें स्मरण होत आहे कीं, जणूं काय तो प्रकार कालच घडला! आमच्या वर्गांतील कित्येक मुलें एका मुलाच्या पाठीस लागून त्याला फार त्रास देत होतीं, तें त्यांनीं

---

* लॉग-बुक म्हणजे वर्गाच्या तपासणांचा तक्ता. हेडमास्तरांनीं खालच्या वर्गाची तपासणी करून आढळलेली स्थिति त्यांत नमूद करावयाची; व शाळेच्या वार्षिक परीक्षेच्या वेळेस शाळा तपासण्यास येणाऱ्या अधिकाऱ्यांस हा तक्ता दाखवावयाचा. (इ. स. १८९९ तील " देशी भाषांच्या शाळांतील मास्तरांकरितां नियमसंग्रह. " पृष्ठ ३९ पहा. ) ( भा. क. )

पाहिलें. त्या वेळीं ते म्हणाले:—अशा प्रकारचें अयोग्य कृत्य करण्यांत तुमच्यापैकीं निदान एक मुलगा तरी सामील होणार नाहीं, असें मला वाटत होतें. हे शब्द त्यांनीं मला अनुलक्षून उच्चारिले, व तेव्हां त्यांची नजर-ही मजकडेच होती. त्या गोष्टीचें मला अद्यापि पक्कें स्मरण आहे. ह्यावरून त्या नजरेचा व त्या शब्दांचा माझ्या मनावर किती परिणाम झाला ह्याचें अनुमान सहज करितां येईल.

मुलगा आत्मसंयमन करण्यास आरंभ करील, तेव्हांच त्याच्या स्वभावां-त सुधारणा होऊं लागेल.

आत्मसंयमन करण्याविषयीं हरएक मुलाचें मन वळ-वितां आलें, ह्मणजेच त्याच्या स्वभावांत सुधारणा हो-ण्यास आरंभ झाला असें सम-जावें. आत्मसंयमनाचें काम स्वतःचें आहे, हें प्रत्येक मुलानें लक्षांत आणून हा गुण संपाद-ण्यास सर्वकाळ झटलें पाहिजे. जिचा अंमल स्वतःवरच चालावयाचा अशी आत्मसंयमन ही प्रचंड शक्ति असून हिचा उद्भव मुलाच्या अंतःकरणांत झाला पाहिजे. आ-पणांस जें कांहीं मिळवावयाचें आहे तें आत्मसंयमनच, अशी त्याची समजूत होऊन त्या धोरणानेंच त्याच्या मनाचे सर्व व्यापार सतत सुरू झाले पाहिजेत. आत्मसं-यमन करीत असतां पदोपदीं येणाऱ्या अडचणी त्यानें सो-शिल्या पाहिजेत; आणि ह्या कामीं मधून मधून यश येतें तेव्हां जो आनंद होतो, तेणेंकरून मनाला हुरूप आ-णिला पाहिजे. स्वभाव सुधारणें हें आत्मसंयमन आंगीं आ-णण्यावर अवलंबून आहे; आणि हा गुण आंगीं आणणें हें केवळ ज्या त्या मुलाचें काम आहे. म्हणून शिक्षकानें

मुलांना स्वभाव सुधारण्याचे कामीं मदत करावयाची ह्याचा अर्थ आत्मसंयमन हा गुण आंगीं आणण्यास त्यांना मदत करावयाची एवढाच झाला. हा गुण आंगीं आणण्यास मुलें मनःपूर्वक झटतील असें आपण केलें नाहीं, तर अखेरीस यश येण्यास मुख्य अवश्य गोष्ट अनकूल नाहींशी होईल. आपलें वर्तन कोणत्या धोरणानें ठेवावयाचें, याचा निश्चय मुलांनींच अगदीं अंतःकरणपूर्वक ठरविला पाहिजे. ज्याच्या स्वभावांत अप्पलपोटेपणाचा दुर्गुण असेल, त्यालाच तो काढून टाकण्याचा निश्चय करितां येईल? इतरांस कसा येईल? मनाचा मोठेपणा हा गुण मोठा स्तुत्य आहे खरा; परंतु प्रत्यक्ष मुलाची अशी समजूत झाल्याशिवाय व त्यानें स्वतः प्रयत्न केल्याशिवाय त्याच्या मनांत ह्या गुणाचें बीजारोपण कसें होईल? सारांश, सन्मार्ग कोणता तें दाखवून त्या मार्गानें मुलें जाऊं लागलीं ह्मणजे त्यांस उत्तेजन देणें, एवढेंच काय तें शिक्षकांना किंवा इतर वडील माणसांना करितां येण्यासारखें आहे. प्रत्यक्ष क्रिया मुलांकडूनच घडली पाहिजे. तथापि मुलांना एकदम नीतीचे पुतळे बनविण्याचा प्रयत्न शिक्षक करूं लागेल तर सर्व काम फसेल. ह्या बाबतींत मुलांना आपणास खरोखर कितपत मदत देतां येईल, ह्याचा शिक्षकानें विशेष लक्षपूर्वक व शांतपणानें विचार केला पाहिजे. प्रत्यक्ष आत्मसंयमनाचें कृत्य अति बिकट असून तें मुलानें स्वतःच करावयाचें आहे. ह्मणून ह्या कृत्याकडे शिक्षकानें त्याचें लक्ष होईल तितकें लवकर लावून आपले दोष काढून टाकण्याचें काम मुलगा स्वतः लहानपणापासूनच करूं

लागेल असें करावें; ह्मणजे हें काम त्या मानानें सुलभ जाईल; व अखेरीस यशही खातरीनें येईल.

विचार हा आत्मसंयमनाचा पाया होय.

**आत्मसंयमनाचा उद्भव विचारशीलतेपासून आहे.** आपलें कोणतें आचरण न्यायाचें व कोणतें अन्यायाचें ह्यासंबंधीं विचार मनांत घोळूं लागणें, हाच आत्मसंयमनाचा खरा आरंभ होय. परंतु मुलांचा स्वभाव सुधारण्याचे कामीं ह्या विचारांचा खरोखर उपयोग व्हावा, अशी इच्छा असेल तर तेणेंकरून त्यांच्या नुसत्या बाह्य वर्तनांत सुधारणा होऊन उपयोग नाहीं; तर त्यांच्या मनोवृत्तींतच विशेष सुधारणा झाली पाहिजे. ह्मणून अशा प्रकारचे विचार मुलांच्या मनांत उत्पन्न करून त्यांचें पुष्टीकरण होण्यासाठीं मुलांना शिक्षकानें होईल तितकी मदत दिली पाहिजे; व त्याच्या आंगीं विद्वत्ता व विशेष शांत रीतीनें अवलोकन करण्याची शक्ति असेल तरच त्याला अशी मदत देतां येईल. आतां ही जी विचारसरणी मुलांच्या मनांत उत्पन्न करावयाची तिच्या संबंधानें थोडें जास्त स्पष्टीकरण करणें जरूर आहे. लबाडी फार वाईट अशी एकाद्या मुलाची खातरी करण्यास शिक्षकाला मोठेंसें व्याख्यान झोडण्याची जरूरी नाहीं; मात्र गृहशिक्षण वाईट मिळून ह्या संबंधानें मुलाचे विचार तो शाळेंत येण्यापूर्वींच बिघडून गेलेले असतील, तर गोष्ट निराळी. एकद्यानें आपणास जाणूनबुजून फसाविलें असतां त्याची मुलाला जितकी चीड येते तितकी इतर कोणत्याही गोष्टीची येत नाहीं. ह्याप्रमाणें चोरी करणें निंद्य आहे, अशावि-

षयींही सामान्यतः मुलाची खातरी करून देण्याची आवश्यकता नसते; मात्र अगदीं लहानपणापासून चाऱ्या करावयाची त्याला सवय असेल तर गोष्ट निराळी. तथापि आपली एकादी वस्तु कोणीं चोरिली कीं, कोणतेंही मूल तेव्हांच बोभाट करूं लागतें; मग तें स्वतः चोरटें असलें तरी चिंता नाहीं. ह्यावरून चोरी फार वाईट असें त्यालाही कळत असतें, हें उघड ठरतें. तसेंच घरीं आईबापांचें शिक्षण कितीही वाईट प्रकारचें असलें तरी दया हा गुण फार चांगला आहे, ही गोष्ट प्रत्येक मुलास अवगत असते. शाळेंत येण्यापूर्वीं कैक दिवस हें त्यांच्या ध्यानांत आलेलें असतें. सारांश, चांगला गुण कोणता, वाईट कोणता हें मुलांना शिक्षकाच्या मदतीशिवाय कळलेलें असतें. परंतु प्रत्यक्ष सदाचरण कसें ठेवावें ह्या कामीं त्यांना शिक्षकाची मदत लागते. तसेंच दुर्गुणाच्या पाशांत सांपडण्याचा जेव्हां अधिक संभव असतो, तेव्हां तर अशी मदत विशेष *लागते. मुलाच्या स्वभावांत एकादा दुर्गुण असेल तर तिकडे त्याचें लक्ष लावण्यासाठीं शिक्षकाची मदत पाहिजे. कारण असा दुर्गुण एकदां चिकटून दिला कीं, तेणेंकरून वाईट कृत्यें करण्याची प्रेरणा उत्पन्न होते. बोटांना शाई लागली किंवा परीटवडीच्या सद्र्यावर शाई सांडली, तर

*महाराणी सरकारच्या शाळाखात्यांतली इन्स्पेक्टर मि० जाली ह्यांनीं मुलांस शाळांतून **नीतिशिक्षण** कसें द्यावें ह्या संबधानें सन १८७२ त एक उत्कृष्ट रिपोर्ट लिहिला आहे. त्यांतील त्यांचे बहुतेक विचार फार योग्य आहेत. विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, अशा प्रकारचें शिक्षण देणें तें योग्य प्रसंग पाहून दिलें पाहिजे, ह्मणजे तें चांगलें ठसेल.

मुलाच्या तें तेव्हांच ध्यानांत येईल. परंतु त्याच्या अंतःकरणांत एकाद्या दुर्गुणाचें बीजारोपण होत असलें तर तिकडे त्याचें मुळींच लक्ष जाणार नाहीं. तेव्हां अशा कामीं विचार करण्यास त्यांना शिक्षकानें वारंवार लाविलें पाहिजे. मुलें उत्तरोत्तर मोठीं होतात, तसतसे त्यांच आंगीं कित्येक गुण येतात; त्यांपैकींच विचारशक्ति हा एक गुण होय. हा गुण आंगीं येण्यास कांहीं कमी आयास पडत नाहींत. शिक्षकाची विद्यार्थ्यास ह्या कामीं जी मदत मिळणार तिची किंमत करितां येणार नाहीं; व जेव्हां जेव्हां तिची अवश्यकता लागेल तेव्हां तेव्हां ती देतां येण्यासारखी आहे. एकादा दुर्गुण स्वभावांत शिरूं लागतो तेव्हां ही मदत लागलीच दिली पाहिजे. अशा रीतीनें स्वभावांत शिरूं लागणाऱ्या दुर्गुणाकडे मुलाचें लक्ष पूर्णपणें लाविलें ह्मणजे नीतिदृष्ट्या त्याची सुधारणा करण्याची मुख्य गोष्ट अनुकूल झाली, असें शिक्षकानें खातरीनें समजावें. ह्मणून शिक्षकानें अशा प्रसंगीं मदत करावयाची ती दूरवर नजर देऊन वक्तशीर व मुलाबद्दल खरी कळकळ बाळगून केली पाहिजे. तसेंच ही मदत नुसत्या नजरेनें, शब्दानें, किंवा दुसऱ्या कांहीं सांकेतिक खुणेनें करावी. आत्मसंयमनाच्या मार्गास मुलांना लावण्यासाठीं शिक्षकास थोडें-बहुत करितां येण्यासारखें आहे, तें अशा प्रसंगींच. मानवी प्राण्याची मानसिक वाढ उत्तरोत्तर योग्य रीतीनें होत जावी, ह्मणून त्यास कांहीं एक विशिष्ट रीतीनें वागवावें लागतें. त्यांतील अति नाजूक व महत्त्वाचा भाग ह्मटला म्हणजे ही वर दर्शविलेल्या प्रकारची मदत होय. म्हणून

हें काम मोठ्या कुशलतेनें करण्याची हातोटी शिक्षकाच्या आंगीं असणें अति अवश्य आहे.

मुलांचे स्वभाव सुधारण्यास कोणत्या गोष्टीची जरूर आहे, ह्याविषयीं वर विवेचन केलं आहे. तें यथार्थ असेल तर हें उघड आहे कीं, मुलांच्या मनांत शिक्षकाविषयीं पूज्यभाव आणि प्रेमबुद्धि जों जों अधिक असतील त्या मानानें त्याच्या आंगीं स्वभाव सुधारण्याचें सामर्थ्यही अधिक येईल. परंतु मुलांच्या मनांत त्याजाविषयीं पूज्यभाव व प्रेमबुद्धि नसेल तर त्याला त्यांचे स्वभाव अगदीं सुधारतां येणार नाहींत. आपल्या आंगीं आत्मसंयमन असून आपलें स्वतःचें आचरण नीतीला अनुसरून आहे, अशी शिक्षकानें विद्यार्थ्यांची खातरी करून दिल्यास त्याच्या संबंधानें पूज्यभाव मुलांच्या मनांत उत्पन्न होईल. शांतपणाचें व सभ्य रीतीचें वर्तन ठेविल्यानें सर्व विद्यार्थ्यांच्या मनांत शिक्षकाविषयीं विश्वास उत्पन्न होतो, व प्रसंग पडेल तेव्हां त्याच्या आंगचें पाणी दृष्टीस पडल्याशिवाय रहावयाचें नाहीं, अशी त्याची खातरी असते. परंतु शिक्षकाची मुद्रा सर्वकाळ उदास व त्रासिक असेल, त्याच्या स्वभावाला शांतपणा माहीत नसेल, तो चिडखोर असून वर्गांत वारंवार चिरडीस जात असेल; तर ह्या सर्व दुर्गुणांमुळें विद्यार्थ्यांची अशी समजूत होईल कीं त्याच्या आंगीं फारसें पाणी नाहीं; व त्यांना असेंही वाटेल कीं त्याचा अधिकार जुमानिला नाहीं तरी चालेल. आतां मुलां-

मुलांचे स्वभाव सुधारण्याचें सामर्थ्य शिक्षकाचे आंगीं येण्यास त्याजबद्दल त्यांचे मनांत पूज्यभाव आणि प्रेमबुद्धि हीं असलीं पाहिजेत.

च्या मनांत प्रेमबुद्धि उत्पन्न करण्यास रामबाण उपाय म्हटला ह्मणजे त्यांजविषयीं आपण खरी कळकळ बाळगणें हाच होय. विद्यार्थ्यांस वेळोवेळीं येणाऱ्या अडचणी नीट रीतीनें ध्यानांत आणून त्यांच्यासाठीं खरी कळकळ शिक्षक दाखवील, तर त्यांजविषयीं विलक्षण प्रेमबुद्धि त्यांचे मनांत उत्पन्न होईल. परंतु ती जागृत केली नाहीं तर काय उपयोग ? आजोबांनीं मोहरांचा हांडा जमिनींत पुरून ठेविलेला आहे, परंतु तो प्रत्यक्ष सांपडेल तेव्हांच त्याचा उपयोग व्हावयाचा. आगगाड्या, गिरण्या, आगबोटी वगैरेंतील यंत्रें जशीं एकाच स्थितींत फिरत असतात, त्यांत अणुमात्र फरक पडत नाहीं; त्याप्रमाणें दररोज ११ वाजतां शाळा सुरू; पुढें तीन तास वेळापत्रकाबरहुकूम अभ्यास; मध्यें दोनपासून तीनपर्यंत सुटी; पुनः तीनपासून पांचपर्यंत अभ्यास; आणि नंतर शाळा बंद; अशा रीतीनें शाळेंतील अभ्यासक्रम दररोज ठेविला तर तो मुलांस अगदीं कंटाळवाणा वाटतो. अशा प्रकारचा नित्यक्रम कवायतीप्रमाणें ठाकठिकीचा दिसतो खरा; परंतु नीतिदृष्ट्या ह्यापासून फारसा फायदा नसतो; व शिक्षणापासून मुलांवर जे महत्त्वाचे परिणाम घडणें अवश्य आहे, ते ह्या ठराविक शिक्षणक्रमापासून घडत नाहींत. शाळाखात्याच्या कोडाअन्वयें अशा शाळांची परीक्षा घेतली असतां ती फार उत्तम लागेल. शाळेंत नित्य किती अभ्यास होतात ते क्याटलॉगांत वगैरे लिहून ठेविलेले असतात; त्यांवरून शाळेचें काम अगदीं व्यवस्थित रीतीनें उत्तम प्रकारें चाललें आहे असें आढळेल. परंतु अशा शाळांतून नीतिशिक्षणाचा थोडाबहुत तरी ठसा विद्या-

र्थ्यांवर उमटलेला आहे किंवा नाहीं, हें पाहूं गेलें असतां एकंदरीनें समाधानकारक स्थिति कधींही आढळून येणार नाहीं. लष्करी सैन्याच्या स्थितीकडे किंचित् लक्ष द्या; ह्मणजे हें ह्मणणें चांगलें ध्यानीं येईल. ह्या सैन्याच्या टोळीला कवाईत शिकविणारा हवालदार नेमिलेल्या मुदतीं-आपल्या टोळींतील लोकांस सर्व हडेलहप उत्तम रीतीनें शिकवील. परंतु ह्या कवायतीमुळें त्या लोकांचीं मनें नीतिमार्गाकडे फारशीं लागण्याचा संभव नाहीं, व तसा विचार त्या हवालदाराच्या मनांत फारसा येतही नाहीं. सारांश, एकाद्या टोळींतील लोक कवायतीच्या कामांत कितीही निष्णात असले, तरी नीतिदृष्ट्या त्यांची स्थिति अति निंद्य असूं शकेल. म्हणून मुलांना उत्तम प्रकारचें नीतिशिक्षण देण्याचा संकल्प शिक्षकानें नेहमीं लक्षांत बाळगिला नाहीं तर शाळांतूनही अशीच स्थिति आढळून येईल; आणि हा संकल्प त्यानें ढळूं दिला असतां अखेरीस त्याला यश न येतां त्याची फजिती होईल. एकादा शिक्षक आपला वेळ अगदीं फुकट घालवीत नाहीं; ह्मणजे प्रत्येक टोल्याबरोबर जो तो विषय सुरू करितो, आणि आपलें काम अगदीं पद्धतीनें यथासांग करीत असतो. तथापि त्या कामाविषयीं त्याला फारसा उत्साह वाटत नसतो; विद्यार्थ्यांविषयीं त्याच्या अंतःकरणांत फारशी कळकळ नसते; आणि दगडाला टांकी मारून मारून कंटाळलेल्या एकाद्या पाथरवटाप्रमाणें तो संध्याकाळीं शाळा सुटतांना अगदीं कंटाळून जातो. असा मनुष्य ह्या धंद्यांत विशेष नांवालौकिकास कधीं चढणार नाहीं. तसेंच, स्पष्ट वर्णोच्चार, चांगलें सावकाश

वाचन, शुद्ध रीतीनें कविता पाठ ह्मणणें, चटाचट हिशेब करणें आणि सुबक अक्षरांच्या पुस्त्या काढणें, इतक्याच विषयांचें महत्त्व शिक्षकास वाटेल, तर तो लष्करी सैन्याला कवाईत शिकविणारा हवालदारच होय. सारांश, दूरवर धोरण राखून जो शिक्षक अनुभवानें शहाणा होत गेला असेल, त्यालाच मुलांच्या आंगचे उत्तम उत्तम गुण चांगल्या रीतीनें उदयास आणितां येतील. ह्मणून अशा प्रकारच्या शिक्षकाचें उदाहरण डोळ्यांपुढें ठेवून त्याचें अनुकरण करण्यास सर्वांनीं झटावें. मुलांना विषयवैचित्र्याची मोठी हौस असते; त्यांची वृत्ति सतत उल्हासी असते; त्यांना अनेक वेळां निष्कारण मोठी भीति वाटत असते; एकामागून एकेक काळजी उत्पन्न होत असते; त्यांचीं मनें वारंवार बुचकळ्यांत पडत असतात; आणि अनेक वेळां आशाभंग होऊन त्यांच्या मनाला वाईट वाटत असतें. परंतु ह्या सर्व गोष्टी शिक्षकाला पोरकट वाटून त्यांचा विचार करण्याची आपणास मुळींच जरूर नाहीं असें वाटेल, तर मुलांबद्दल योग्य प्रकारची कळकळ त्याच्या मनांत राहणार नाहीं; आणि मुलांच्या शिक्षणांतील अति महत्त्वाच्या गोष्टींसंबंधानें तो उदासीन राहिल्याप्रमाणें होईल. ज्याला हा धंदा पोरकट वाटत असेल त्यानें हा खुशाल सोडून देऊन त्याच्या समजुतीनें विशेष मर्दुमकीचा धंदा वाटेल तो धरावा; आणि ज्यांच्या मनाचा अद्यापि विकास होणें आहे अशा अल्प बुद्धीच्या ह्या मुलांमुलींना मोठ्या धोरणानें शिक्षण देण्याचें हें नाजूक व अवघड काम त्यानें इतरांकडे सोंपवावें. कारण मुलांचें व मुलींचें मोठेपणीं उत्तम स्त्रीपुरुषांस साजेल असें आचरण राहणें

हें ह्या लहानपणच्या शिक्षणावरच अवलंबून असतें. मुलांच्या आंगावर खसकन ओरडणें, पाय आपटणें, लांबलचक छडी, चाबूक, तसेंच पुस्तकें, नकाशे, लेखण्या, कागद, एवढींच काय तीं कित्येक शिक्षकांचीं शिक्षण देण्याचीं साधनें असतात. परंतु असे शिक्षक ह्या धंद्यांत कधींही उदयास येणार नाहींत. ह्या धंद्यांत नांवाजलेल्या शिक्षकांचे विचार अधिक उदात्त असून त्यांचीं साधनेंही वरच्यांहून विशेष चांगलीं असतात. कित्येक विद्यार्थी मोठे **चुकार** असतात, अशी ओरड आपण नेहमीं ऐकितों. परंतु वर दर्शविल्या प्रकारचे कोते विचार ज्या शिक्षकाचे असतील तो वेळापत्रकाला अगदीं धरून चालणारा असला तरी एका प्रकारें चुकारच होय; व त्याच्या चुकारपणापासून अधिक नुकसान आहे. वर शिक्षण देण्याचीं सामान्य साधनें सांगितलीं आहेत तीं तर पाहिजेतच; शिवाय विद्यार्थ्यांवर हरएक गोष्टीचा काय परिणाम होतो, तें जाणण्याची शिक्षकाला खरी कळकळ असावी; ह्मणजे विद्यार्थ्यांना सामान्य शिक्षणाच्या कामीं त्याला मदत करितां येऊन आत्मसंयमन हा गुण आंगीं आणण्यासाठींही मदत देतां येईल. लहानपणीं मुलांचीं मनें हळू हळू विकास पावत असतां त्यांना योग्य वळण लावण्याचें काम शिक्षकाला फार मनोरंजक वाटलें पाहिजे. तशा वयांत हरएक प्रकरणीं त्यांस होणारा जाच कमी करण्यांत त्याला आनंद वाटला पाहिजे; आणि आपले विद्यार्थी मनसोक्त रीतीनें थट्टामस्करी करीत असतां त्याला स्वतः लहानपणीं केलेल्या खोड्यांचें स्मरण होऊन तशी मौज वाटली पाहिजे; तरच त्याला विद्यार्थ्यांस मद-

त देतां येईल, त्यांच्यावर छाप बसवितां येईल, आणि आपलें आयुष्य सन्मार्गानें घालविण्याविषयीं उन्नत विचार त्यांच्या अंतःकरणांत उत्पन्न करितां येतील; एरव्हीं कधीं करितां येणार नाहींत. सारांश, मुलें शाळेंत जाऊं लागल्यापासून पहिल्या एक दोन वर्षांतच त्यांच्या स्वभावांत सुधारणा करणें इष्ट असेल तर विद्यार्थ्यांच्या पक्कें अनुभवास आलें पाहिजे कीं, शिक्षकाच्या अंतःकरणांत आपल्याविषयीं अति प्रेम आहे. असें प्रेम असेल तरच ह्या कामीं येणाऱ्या अडचणी शिक्षकास निवारितां यतील. मुलांच्या मनांत सदाचरणाविषयीं योग्य प्रेरणा उत्पन्न करितां येईल; आणि कर्तव्यदक्षता हा गुण आंगीं आणणें जरी फार दुर्घट आहे, तरी तें कृत्यही अशा रीतीनें मुलांना फार मजेचें वाटेसें करितां येईल.

मुलांचे स्वभाव सुधारण्यासाठीं त्यांचे दुर्गुण प्रथम नाहींतसे केले पाहिजेत.

मुलांचे स्वभाव सुधारण्याचा कामीं त्यांना मदत करण्याचा शिक्षकास मुख्य मार्ग ह्मटला ह्मणजे त्यांच्या स्वभावांतील दुर्गुण नाहींतसे करणें, हाच होय. त्यांच्या आंगच्या सद्गुणांबद्दल त्यांस उत्तेजन देऊन ते गुण दृढ करण्याचें काम सोपें; परंतु दुर्गुण घालविण्याचें हें काम अति दुर्घट व शिक्षकाची पक्की खातरी करणारें आहे. तथापि त्यांच्या स्वभावांत सद्गुणांचा प्रसार व्हावा, ह्मणून दुर्गुणांस तेथें जागा ठेवून उपयोग नाहीं. दुर्गुणांवर दाब ठेवावयाचा तो कडक रीतीनें ठेवणें शहाणपणाचें नाहीं; व तशा दाबापासून इष्ट हेतु सिद्धीसही जावयाचा नाहीं. ह्मणून हा दाब फार निराळ्या रीतीनें ठेविला पाहिजे. एकाद्या मुलाचा दुर्गुण

घालविण्याचा सर्वोत्कृष्ट उपाय झटला झणजे तो दुर्गुण काढून टाकण्याविषयीं त्यास वरचेवर उत्तेजन देणें, हाच होय. हा उपाय मुलांस जाचणारा नाहीं, ही मोठी सुदैवाची गोष्ट आहे. मुलांच्या स्वभावांतील दुर्गुणाकडचे कल काढून टाकिले पाहिजेत, ही गोष्ट निर्विवाद आहे; आणि हें काम त्यांचें त्यांजकडूनच करवावयाचें आहे. परंतु हे कल नाहींतसे करण्याचे उत्कृष्ट उपाय शिक्षक मित्रत्वाच्या नात्यानें उपदेश करून सुचवील, तर महत्कार्य होईल. नुसते हुकूम फरमाविल्यानें किंवा ते मुलांकडून सक्तीनें अमलांत आणिल्यानें तसें कार्य होत नाहीं. एकाद्या दुष्कृत्याकडे मुलाची प्रवृत्ति होऊन, ते करावें न करावें, अशी त्याच्या मनाची चलबिचल सुरू होते. अशा प्रसंगीं शिक्षकानें त्याच्या कानांत दोन उपदेशाचे शब्द सांगावे; व त्याला आलेली अडचण आपल्या ध्यानांत आली असून ती दूर करणें किती कठीण आहे ह्याचाही अंदाज आपणास आहे; असें त्यानें त्या मुलास दर्शवावें. आणखी असेंही दर्शवावें कीं, ह्या आणीबाणीच्या प्रसंगीं मुलानें आपलें मन आवरून त्या दुष्कर्मापासून परावृत्त केलें, तर त्याला स्वतःला जितका आनंद होईल तितकाच आपणासही होईल, झणजे तसें कृत्य कधीं न करण्याविषयीं मुलाच्या मनांत निश्चय उत्पन्न होईल. तसेंच अशा रीतीनें दुष्कृत्यापासून मन परावृत्त करणें फार प्रयासाचें आहे; तथापि तेंही मुलांना बरेंच सोपें वाटेल. मनुष्याच्या मूळ स्वभावांत कित्येक दोष विशेष प्रबळ असतात, व ते काढून टाकण्यासाठीं तो झटतो तेव्हां त्यास अति कष्ट पडतात; ही गोष्ट शिक्षकानें नेहमीं लक्षांत

ठेवणें जरूर आहे. एकादें मूल अशा प्रकारचे दोष काढून टाकण्यास झटत असतां त्यास येणाऱ्या अडचणी शिक्षक मार्मिकपणानें ध्यानांत आणील, तर त्याच्या आंगीं मुलाला योग्य प्रकारची मदत देण्याचें बरेंच सामर्थ्य येईल. परंतु शिक्षकानें कितीही मदत दिली तरी हें काम थोडेंसें कष्टदायक वाटेलच. तथापि ह्या कष्टाला भिऊन तें सोडून देऊन उपयोग नाहीं. स्वभावाची खरी सुधारणा होत जाण्यास असले कष्ट सोशिल्याशिवाय गत्यन्तर नाहीं. आत्मसंयमन करण्यास मनाचा निश्चय करावा लागतो; व त्या कामीं पुष्कळ कष्ट सोसावे लागतात. परंतु हा निश्चय व हे कष्ट एकादा मुलगा टाळूं पाहील, व शिक्षक अशा वेळीं त्यास ममतेनें वागवील, तर तिला ममता ह्मणतां येणार नाहीं; उलट त्याचें तें कृत्य अति निर्दयपणाचें होईल. हे कष्ट टाळण्याचा निर्दोष मार्ग एकच आहे. तो असा कीं, आत्मसंयमनासंबंधीं प्रयत्न करावयास मनुष्यानें आरंभीं अगदीं डगमगूं नये. अशा रीतीनें हा प्रयत्न सतत सुरू ठेविल्यामुळें तो आंगवळणीं पडतो; व त्याजबद्दल उत्तरोत्तर कांहींच कष्ट वाटेनासा होतो; आणि अखेरीस सदाचरणाचा स्तुत्य विचार मनांत उत्पन्न झाल्यामुळें जो आनंद वाटतो, त्यापुढें ह्या कष्टाचा कांहींच त्रास वाटत नाहीं. आत्मसंयमन हें अति कष्टसाध्य आहे खरें; तथापि आईबाप किंवा शिक्षक ह्यांनीं मुलास ह्या कामीं पडणारे कष्ट वांचविणें कांहीं शहाणपणाचें नाहीं. आपण ह्मणतों कीं, "पोर बिघडलें"; परंतु तें बिघडण्याचें वास्तविक कारण पदोपदीं मनसोक्त वागण्यास आपल्याकडून त्यास जें उत्तेजन मिळतें, तेंच

होय. आपल्याला वाटतें कीं, आपण त्याजवर "माया" करीत आहों. परंतु या मायेचा परिणाम असा घडतो कीं, मुलाच्या मनांत विवेक उत्पन्न होण्याचा संभव असल्यास तो नाहींसा होतो; आणि आत्मसंयमनार्थ त्याजकडून प्रयत्न होण्याचा संभवही राहत नाहीं. स्वभावांतील दोष काढून टाकण्यास मूल झटत असतां त्याला दुःख व्हावयाचेंच; परंतु अशा दुःखांतून त्याची सुटका करण्याविषयीं त्याचे शिक्षक किंवा पालक कळकळ दाखवितील, तर ती निरर्थक समजावी. परिणामीं तिजपासून अति नुकसान होईल. अशा प्रकारची कळकळ **अविचाराची** होय. आईबाप, शिक्षक व इतर वडील माणसें शेंकडों प्रसंगीं अशी वेडगळपणाची माया दाखवितात. ह्यावरून प्रेम कोणावर कसें बसेल याचा नेम नसतो, असें दिसून येईल. अशा अविचाराच्या मायेचें अति निंद्य उदाहरण म्हटलें ह्मणजे मूल आत्मसंयमनकरण्यास झटत असतां त्याजवर केलेली मायाच होय. तात्पर्य हेंच कीं, सारासारविचार करून प्रीति केली तर तिचेंच नांव उत्कृष्ट प्रीति. आपण हरएक प्राण्यावर हरएक प्रसंगीं प्रीति करीत गेलों तर लोक आपणास उदार म्हणतील, अशी पुष्कळांची समजूत असते; परंतु व्यवहारांत ही त्यांजकडून फार मोठी चूक होते. आत्मसंयमन आगीं आणण्यासाठीं मुलांना अति दुःख सोसावें लागतें हें खरें; परंतु हें दुःख त्यांस न व्हावें म्हणून आईबाप व शिक्षक त्यांजवर माया करितील, तर मुलांच्या आंगीं मनोनिग्रह नसल्यामुळें जे गुन्हे त्यांजकडून पुढें घडणार तिकडेही त्यांचें लवकरच दुर्लक्ष होऊं लागेल. म्हणून मुलांवर प्री-

ति करावयाची ती वर दर्शविल्या प्रकारची पोकळ माया असूं नये; अशाविषयीं शिक्षकानें खबरदारी घेणें फार जरुरीचें आहे. मुलगा मनसोक्त वागूं लागल्यास त्याचें पोरवय आहे ह्मणून गय करून उपयोगी नाहीं. मुलांवर ममता करितांना शिक्षकानें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, मनोनिग्रह तीं जितका लवकर करूं लागतील तितकें त्यांना तें काम सुलभ जाईल. परंतु मुलांनीं हें काम मोठ्या उमेदीनें आरंभिलें असतां त्यांस जितकी मदत देणें शक्य असेल, तितकी शिक्षकानें मनापासून दिली पाहिजे. मात्र प्रत्यक्ष आत्मसंयमनाचें काम ज्या त्या मुलानेंच करावयाचें आहे, हें त्यानें सर्वकाळ ध्यानांत बाळगिलें पाहिजे. मुलें आपल्या आंगचे दुर्गुण काढून टाकण्यास झटत असतां त्यांच्याबद्दल खरी कळकळ शिक्षकानें दाखविली तरच तिजपासून त्यांना मदत होते. तसेंच त्यांना आपल्या आंगचा अप्पलपोटेपणा समूळ घालवितां यावा, आपला राग आवरून धरितां यावा, व दुसऱ्यानें दुःख दिलें असतां उसनें न फेडितां तें सहन करण्याची शक्ति आंगीं यावी, म्हणून अशा प्रकारची अतिशय कळकळ शिक्षकानें नेहमीं दाखविली पाहिजे. अशी कळकळ दाखविण्याचें काम कित्येकांस जड जाईल, व कित्येकांस सोपें जाईल. तथापि प्रत्येक शिक्षकानें हें केलेंच पाहिजे. ही कळकळ कोणत्या रीतीनें दाखवितां येईल तें प्रत्येकानें स्पष्ट रीतीनें आपल्याशीं ठरवून ठेविलें पाहिजे. आपल्या वर्गांतील प्रत्येक मुलाची नीतिदृष्ट्या सुधारणा करण्यास कोणकोणत्या गोष्टींची आवश्यकता आहे हें ज्याला कळतें, आणि अशा रीतीनें

व्यक्तिविषयक दोष ध्यानांत आणून ते घालविण्याचें काम ज्याला मजेचें वाटतें, असा शिक्षक मिळणें हें मुलांचें मोठें सुदैव होय. मुलाला अशा प्रकारें चांगली मदत करणारा शिक्षक मिळाला असतां त्याचें निमें काम झालेंच असें समजावें. मुलगा कितीही लहान असला तरी अशा मदतीचा परिणाम त्याच्या मनावर होऊन तिचें खरें महत्त्वही त्यास कळतें. एथें हेंही सांगणें अवश्य आहे कीं, वडील माणसें मुलांवर अनेक प्रकारांनीं ममता करितात; व त्यांचे परिणाम भिन्न भिन्न प्रकारच होतात. परंतु ह्या सर्व कृत्यांना तीं मायाच समजतात. तथापि माया करण्याच्या अनेक प्रकारांपैकीं, व त्यांच्या परिणामांपैकीं बरें वाईट कोणते, हें स्पष्टपणें मुलांना कळतें. त्यांच्या स्वभावांत असा एक गुण असतो कीं, त्या योगानें अशा प्रकारचें ज्ञान त्यांना तेव्हांच होतें; त्यांच्या आंगीं विशेष विचारशक्ति असल्यामुळें होतें, असा भाग नाहीं. तसेंच निष्फळ ममता कोणती, आणि स्वतः झीज सोसून मुलांसही झीज सोसावयास लावणारी ममता कोणती, ह्याचें ज्ञानही मुलांना ह्याच गुणामुळें होतें. तीं लहानपणीं अनेक खोड्या करितात; त्यांपैकीं बऱ्याच अशा असतात कीं, त्यांसंबंधानें त्यांजवर सक्त नजर ठेवणें अवश्य असतें. परंतु एकादा शिक्षक तिकडे कानाडोळा करितो; आणि मुलांनीं कांहीं गोष्टींविषयीं त्याची पाठ पुरविली असतां, तो त्यांचें म्हणणें मान्य करितो. अशा सुस्वभावी व सरळ मनाच्या शिक्षकासंबंधानेंही एक प्रकारची प्रीति मुलांच्या मनांत उत्पन्न होते; व त्याला तीं मोठा आनंदी प्राणी समजतात. परंतु एकादा शिक्षक

मागील पुढील धोरण राखून काम करणारा असतो, व विद्यार्थ्यांनीं कितीही पिच्छा पुरविला तरी त्यांचें अयोग्य म्हणणें मान्य करीत नाहीं; आणि आपल्या हाताखालच्या विद्यार्थ्यांच्या हिताहिताची जबाबदारी आपल्या शिरावर आहे असें समजून त्यांस सन्मार्ग सोडून जाऊं देत नाहीं; अशा शिक्षकांविषयीं मुलांच्या मनांत निराळ्याच प्रकारची प्रीति उत्पन्न होते; व ती विशेष मन:पूर्वक असते. सारांश, मुलांवर ममता कोणत्याप्रकारें करावी ह्या विषयींही नियम आहेत; आणि ते एका बाजूस ठेवून आपणं त्यांजवर भलत्याच प्रसंगीं फाजील ममता केल्यास आपल्या चांगुलपणाविषयीं त्यांची पूज्यबुद्धि कमी होते, व अशा ममतेमुळें मुलांचें आत्मसंयमनाचें कामही मंदावतें. अशा प्रकारच्या ममतेपेक्षांही वाईट असा एक दुर्गुण शिक्षकांत आढळण्याचा संभव असतो; तो हाच कीं, मनाचा फाजील कोमळपणा. अशा कोंवळया मनाच्या शिक्षकानें आपलें एकादें ह्मणणें एकदां अमान्य केलें, तरी त्याची हांजी हांजी करून व त्याशीं लाडीगोडी लावून आपला कार्यभाग करून घेण्यास विद्यार्थ्यांस उत्तेजन मिळतें; व अशा रीतीनें हे दुर्गुण त्यांस जडतात. अशा नरमपणानें शिक्षक अधिकार बजावील, तर मुलें खचित बिघडतील. अशा शिक्षकाच्या वर्गांतील मुलांना लबाडीनें आपलें काम कसें साधावें ह्याचें उत्तम शिक्षण मिळून त्या कामीं त्यांस उत्तेजनही मिळत जातें, व ह्या कावेबाजपणामुळें त्यांच्या सर्व नीतिवर्तनास हरताळ लागतो. वडील माणसें-आई-बाप अथवा शिक्षक- मुलांना अशा रीतीनें वागवितील तर त्यांचे स्वभाव सुधारण्याचा पाया त्यांजकडून उभार-

ण्याचें एकीकडेच राहील; उलट त्यांच्या नित्याचरणाची इमारत ह्याच पायावर उभारणें शक्य असल्यामुळें तो पाया तीं डळमळीत मात्र करितील. मुलांचें नित्याचरण निर्दोष होण्यास त्यांच्या स्वभावांत अप्रामाणिकपणाचा लेशही उपयोगी नाहीं. आणि मुलांस योग्य मार्ग दाखवून त्या मार्गानें जाण्यास त्यांना उत्तेजन देणें शिक्षकाचें कर्तव्य आहे. ह्मणून नीतिविषयक नियम पूर्णपणें पाळण्याविषयीं त्यांस लहानपणापासून सवय लाविली पाहिजे. कारण पदार्थविज्ञानशास्त्राच्या नियमांत ज्याप्रमाणें कधींही चलत्रिचल किंवा फेरफार होत नाहीं; त्याप्रमाणेंच ह्या नीतिशास्त्राच्या नियमांतही होत नाहीं.

स्वभावांतील दुर्गुण घालविण्याच्या कामीं येणाऱ्या अडचणी.

मुलाच्या स्वभावांतील दुर्गुण घालविण्याविषयीं वर विचार झाला. ह्या विचारावरून शिक्षणाच्या संबंधें इतर कित्येक वादग्रस्त प्रश्न उद्भवतात. ह्या वादग्रस्त प्रश्नांचें सूक्ष्म रीतीनें सविस्तर विवेचन येथें करण्याचें प्रयोजन नाहीं. शिक्षकानें आपल्या आंगचें व्यवहारज्ञान खर्चूनच प्रत्येक मुलाच्या स्वभावांतील दोष पूर्णपणें ध्यानांत आणिले पाहिजेत; आणि त्याच्या मूळ स्वभावाची पक्की माहिती करून घेऊन ते दोष घालविण्यास योग्य अशा नीतिविषयक नियमांची योजना त्या कामीं केली पाहिजे. मुलांवर अधिकार चालवितां यावा, व त्या अधिकारापासून त्यांचे स्वभाव सुधारण्याच्या कामीं आपल्याला मदत व्हावी, अशी इच्छा असेल तर शिक्षकाच्या आंगीं व्यवहारज्ञान असलेंच पाहिजे. मुलांचे कित्येक अपराध नीतिदृष्ट्या फार निंद्य असतात.

ह्मणून तशा गुन्हेगारांची सर्व शाळेंत फाजिती झालीच पाहिजे. चांगल्या शिक्षा कोणत्या, वाईट कोणत्या, ह्या प्रश्नाचा येथें विचार करावयाचा नाहीं. तथापि लबाडी, निर्दयपणा आाण अप्रामाणिकपणा ह्या गुन्ह्यांबद्दल शिक्षा झाल्याशिवाय राहणार नाहीं, अशी मुलांची पक्की समजूत झाली पाहिजे. नीतिदृष्ट्या मुलांचें आचरण सुधारण्यासाठीं हे दोष घालविणें अवश्य आहेच. परंतु इतका उन्नत विचार लक्षांत आणिला नाहीं तरी वर्गांत चांगली शिस्त राहण्यासाठींही मुलांचे हे दोष समूळ घालविणें इष्ट आहे. असें वर्तन दोषास्पद आहे, अशी त्यांच्या मनाची खातरी करून दिली पाहिजे. असले गुन्हे आपल्या हातून घडणें फार धोक्याचें आहे; कारण हे शिक्षकाच्या ध्यानांत आले असतां आपणांस शिक्षा झाल्याशिवाय राहणार नाहीं; एवढीच त्यांची समजूत झाला ह्मणजे इष्टकार्य होत नाहीं. शरीर शिक्षेचा मुलांस इतका विलक्षण बाऊ वाटत असतो कीं, ही शिक्षा भोगण्याचा प्रसंग होईल तितका टाळावा, असा विचार त्यांच्या मनांत प्रथमतः उत्पन्न होण्याचा संभव असतो. शरीरशिक्षेपासून जे विशेष प्रकारचे तोटे आहेत, त्यांतीलच हा एक तोटा आहे. ह्या शिक्षेच्या भयंकर धास्तीमुळें मुलें कदाचित गुन्हे करण्यास प्रवृत्त होणार नाहींत. तथापि ह्यामुळें त्यांच्या स्वभावांत सुधारणा झाली असें ह्मणतां येणार नाहीं. करितां तसे गुन्हे करणें नीतिदृष्ट्या अति निंद्य आहे, असा ठसा त्यांच्या मनावर उमटविणें विशेष महत्त्वाचें आहे. एकाद्या मुलानें चोरी केल्याचें आढळल्याबरोबर त्याला पांच फटके मा-

रण्यास फारसा वेळ लागणार नाहीं. परंतु त्या शिक्षेमुळें मुलाच्या स्वभावांत मुळींच सुधारणा होणार नाहीं. कदाचित् तो अधिक बिघडण्याचा मात्र संभव आहे. चोरी करणें हें कृत्य फार निंद्य आहे, असें त्याचें त्याला वाटूं लागेल, अशा तऱ्हेनें मुलाला विचार करावयास लावणें, एवढेंच शिक्षकाचें कर्तव्य होय. असलें कृत्य एकाही माणसास कधीं पसंत पडणार नाहीं, अशी मुलाची समजूत पडली पाहिजे. शिवाय आपली एकादी वस्तू दुसऱ्यानें चोरिली असती तर आपणास जसा त्याचा फार राग आला असता, तसा आपण दुसऱ्याची वस्तू चोरिल्यास त्यालाही येईल; अशी त्याची खातरी करून दिली पाहिजे. तसेंच अशा चोऱ्या आपले हातून वरचेवर घडूं लागल्यास अखेरीस परिणाम भयंकर होईल असें त्याच्या मनांत पक्कें बिंबविलें पाहिजे. ह्या रीतीनें त्याच्या मनाची खातरी करण्यासाठीं शिक्षक वेळ खर्चील तर त्याचा सदुपयोग होईल. मुलांचे स्वभाव सुधारण्याचा पाया भक्कम रीतीनें घालण्याच्या कामीं शिक्षकाचें जें कर्तव्य आहे, तें अशा रीतीनें शिक्षण दिल्यास त्यानें बजाविल्याप्रमाणें होईल.

कित्येक मुलांचीं मनें इतकीं कोमल असतात कीं, त्यांच्यावर एकाद्या गोष्टीचा परिणाम फार त्वरित होतो.

मुलांचे स्वभाव सुधारण्यासाठीं शिक्षकानें त्यांस विशेष कडकपणानें वागवून उपयोग नाहीं.

ह्मणून त्यांस शिक्षा करण्याचा प्रसंग फार क्वचित् आणावा. मात्र जेव्हां शिक्षा करणें असेल तेव्हां तिचा योग्य परिणाम होईल अशाविषयीं फार खबरदारी ध्यावी. शिक्षक अति करडा अंमल ठेवील, तर विद्यार्थ्यांच्या मनावर पक्का

परिणाम घडेल, अशी कित्येकांची समजूत असते; परंतु ती चुकीची होय. मुलांच्या मनावर सदुपदेशाचा ठसा वठण्याचा संभव असतो; परंतु त्यांना धाक दाखविल्याबरोबर हा संभव नाहींसा होतो. नीतिविषयक नियमांचा ठस मुलांच्या हृत्पटलावर सूक्ष्म रीतीनें उठविणें हें शिक्षकाचें कर्तव्य आहे. परंतु तो त्यांना कडक रीतीनें वागवील, तर हें काम क्षणांत बिघडून जाईल. सारांश, प्रत्यक्ष शिक्षेचा प्रसंग जों जों कमी येईल तों तों परिणाम अधिक चांगला होईल. एकादा मुलगा किंवा मुलगी कांहीं अयोग्य आचरण करीत आहे, असें आढळल्याबरोबर शिक्षकानें केवळ आश्चर्यदर्शक स्वरानें "रामा!" किंवा "यमे!" अशी हाक मारावी; ह्मणजे या शब्दाचा परिणाम मुलांच्या मनावर प्रायः पक्का व्हावयाचाच. तसेंच लबाडीसारख्या अनीतीच्या कृत्यांपासून दूर राहण्यास वर्गांतील सर्व मुलांस एकदम शिक्षण देणें तेंही शिक्षकानें स्पष्ट रीतीनें, शांतपणानें व विशेष पाल्हाळ न करितां द्यावें; ह्मणजे अशीं कृत्यें आपल्या हातून घडलीं असतां आपली सर्वांत फजिती उडेल; अशी भीति मुलांच्या मनांत उत्पन्न होऊन त्याच्या शिक्षणापासून बरेंच कार्य होईल. वर्गांत सर्वत्र शांतता असतां शिक्षकानें गंभीर स्वरानें, सावकाश व शांत रीतीनें जो उपदेश करणें तो करावा. ह्मणजे त्यापासून परिणाम विशेष घडेल. मोठ्या संतापानें आदळआपट करून चार तास उपदेश केला, तरी ह्याच्या शतांशही परिणाम घडणार नाहीं.

शाळेंतील शिक्षणक्रमासंबंधानें केव्हां केव्हां मोठे घों-

अति व्रात्य मुलास शाळेंतून हांकून द्यावें काय ?

टाळ्याचे प्रश्न उत्पन्न होतात. वर दर्शविलेले सामान्य नियम तथ लागू पडत नाहींत. उदाहरणार्थ, कित्येक मुलें मोठीं हट्टी, दुराग्रही व बेपर्वा असतात. तर अशा मुलांसंबंधानें काय उपाय योजावे ? या प्रश्नाचें उत्तर देणें फार कठीण आहे. शरीरशिक्षेचा कित्येक विद्वान् अगदीं निषेध करितात; तथापि त्यांचें हें मत सयुक्तिक दिसत नाहीं असें मागेंच दर्शविलें आहे. आतां अशा शिक्षेच्या ऐवजीं दुसरे उपाय शोधून काढणें कठीण आहे. परंतु आपला कार्यभाग तडीस जाण्याजोगे जितके उपाय सुचतील, त्या सर्वांचा उपयोग शिक्षकांनीं करून घेणें फार इष्ट आहे. व्रात्य मुलास शाळेंतून अजी घालवून देणें, हा उपाय अगदीं निदानीचा आहे. म्हणून होतां होईतों तो टाळणें शहाणपणाचें आहे. आपल्यांकडे मराठी शाळांतून मुलें फार तर १४।१५ वर्षांचीं असतात. अशा मुलांच्या संबंधानें तर हा उपाय कधींच योजूं नये. परंतु ह्यांहून मोठालीं मुलें शाळेंत असतील, तर त्यांच्यापुरता ह्या शिक्षेचा उपयोग केल्यास कदाचित् चालेल. सारांश, लहान लहान मुलांसंबंधानें हा उपाय सयुक्तिक ठरावयाचा नाहीं. मुलाला शाळेंतून घालवून देणें ह्मणजे आलेली अडचण अजी टाळण्याप्रमाणें होतें. परंतु ती अजी न टाळितां युक्तीनें दूर करणें इष्ट आहे. व्रात्य मुलास शाळेंतून घालवून देणें ह्मणजे त्यास ताळ्यावर आणण्याचें सामर्थ्य आपणामध्यें नाहीं असें कबूल करण्यासारखेंच आहे. म्हणून शाळेंत असा प्रत्यक्ष प्रसंग टाळितां येईल तितका टाळणें नेहमीं अवश्य आहे.

मुलांस अजी हांकून लाविल्यानें शिक्षकाचें नीतिदृष्ट्या विद्यार्थ्यांवर अधिक वजन बसत नाहीं. उलट तें कमी होतें. ह्मणून अशा मुलाला त्यानें केव्हां ममतेनें वागवावें; केव्हां शांत रीतीनें व मोठया कळवळ्यानें त्याला एकीकडे दान कानउघाडणीचे शब्द सांगावे; आपल्या आंगीं सहनशीलता फार आहे अशी त्याची खातरी करावी; आणि लागेल तेव्हां योग्य मदत देण्याविषयीं त्याला अभिवचन द्यावें. प्रसंगवशात् ह्या उपायांची योजना त्यानें व्रात्य मुलांना ताळ्यावर आणण्यासाठीं करावी. अशा मुलाला आपण शाळेंतून हांकून लाविलें असतां तो दुसऱ्या एकाद्या शाळेंत जाऊन तेथील शिक्षकाला त्रास देणारच; आणि त्या बिचाऱ्याला हें पोर इतकें व्रात्य आहे हें माहीत नसल्यामुळें तो त्यास शाळेंत घेणार. परंतु आपला त्रास चुकवावा ह्मणून अशी युक्ति लढविणें अप्रशस्त होय. सारांश, अशा मुलाला अजी हांकून न लावितां त्याच्याविषयीं जिवापाड कळकळ बाळगून त्याला ताळ्यावर आणण्यासाठीं जे जे उपाय सुचतील, त्यांची योजना शिक्षकानें करून पाहिली पाहिजे. डा. गथी यांनीं या संबंधानें एक गोष्ट लिहिली असून ती मोठी मनोवेधक आहे. ती वाचिली असतां मनाला पाझर फुटल्यावांचून राहणार नाहीं. यास्तव ती एथें देतों:—“ इंग्लंदांत एका तटबंदी शहरांत एक पलटण ठेविलेली होती तींतील एका शिपायानें कांहीं गुन्हा केल्यावरून त्याला त्या पलटणीच्या मुख्य अधिकाऱ्याकडे त्याच्या हवालदारानें नेलें. तो शेंकडों वेळां गुन्ह्यांत सांपडलेला असून त्याला कैक वेळां शिक्षा झालेली होती. त्याचें नांव मुख्य

अंमलदारास कळविल्याबरोबर तो अधिकारी ह्मणाला, ' आली ही स्वारी पुनः ! ह्याला चाबकानें फोडून काढिलें, ह्याची चारचौघांत फजिती उडविली, व ह्याला कैदेचीही शिक्षा देऊन पाहिली. सारांश, आतां कोणताही उपाय राहिलेला नाहीं. ' हें ऐकून तो हवालदार त्या अधिकाऱ्याजवळ आला; आणि आपण जे दोन शब्द बोलणार त्याची माफी मागून ह्मणाला, ' महाराज, एका उपायाची प्रचीति ह्याच्यासंबंधानें अद्यापि मुळींच घेऊन पाहिलेली नाहीं. ' अधिकाऱ्यानें विचारिलें, 'तो कोणता उपाय ?' हवालदारानें उत्तर केलें. ' महाराज, ह्याला आजपर्यंत **क्षमा** मुळींच करून पाहिलेली नाहीं. ' ही विलक्षण कल्पना कानीं पडल्याबरोबर तो मुख्य अधिकारी आश्चर्यचकित होऊन ह्मणाला, ' काय ! ह्याला क्षमा ! ' पुढें अधिकाऱ्यानें थोडा वेळ विचार करून त्या गुन्हेगारास आपणासमोर आणण्यास हुकूम दिला; आणि तो आल्यानंतर हल्लींच्या आरोपाविषयीं त्याचें काय ह्मणणें आहे तें त्याला विचारिलें. त्यानें उत्तर केलें, ' महाराज, मला कांहीं सांगावयाचें नाहीं. माझ्या हातून घडलेल्या गुन्ह्याबद्दल मी फार दिलगीर आहें, इतकेंच माझें ह्मणणें आहे. ' शिपायाला पक्कें वाटत होतें कीं, आपण जसजसे अधिक गुन्हे करूं, त्या मानानें आपणास शिक्षाही कडक होत जाईल. परंतु ह्या प्रसंगीं अधिकाऱ्यानें त्याजकडे ममतेनें व कळवळ्यानें पाहिलें, आणि तो त्याला ह्मणाला, ' ठीक आहे. तुला ह्या वेळीं आह्मीं क्षमा करण्याचा निश्चय केला आहे !' हें ऐकतांच शिपाई विलक्षण आश्चर्यचकित झाला; त्याच्या नेत्रांतून

अश्रुधारा वाहूं लागल्या; आणि एकाद्या लहान मुला-प्रमाणें तो रडूं लागला. त्याचा पूर्वीचा सर्व दंडेलपणा जाऊन तो एकाद्या गोगलगाईप्रमाणें मऊ आला; आणि आपल्या अधिकाऱ्याचे आभार मानून तेथून तो निघून गेला. परंतु पूर्ववत् शिरजोरपणाचें किंवा कोडगेपणाचें वर्तन त्यानें इतः-पर ठविलें नाहीं. ह्यापुढें त्याचा वर्तनक्रम अगदीं बदलला. ज्यानें ही गोष्ट लिहिली, त्याच्या नजरेखालीं हा शिपाई कित्येक वर्षें होता; आणि ह्याच्याइतकें सुवर्तन राणी-सरकारच्या फौजेंतील दुसऱ्या कोणत्याही शिपायाचें त्या-ला आढळलें नाहीं." अशा प्रकारचा परिणाम शेंकडा एकाद्या माणसावरच होईल असें मानिलें, तरीही ह्याचा विचार करणें अवश्य आहे. शिवाय वरील उदाहरणा-संबंधानें हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, तो शिपाई शिक्षा भोगून भोगून निगरगट्ट बनलेला होता; आणि ह्या प्रसंगीं त्यास माफी देऊन पाहिली होती खरी; परंतु या माफीमुळें त्यानें आपलें वर्तन सुधारिलें नसतें, तर त्याला पुनः माफी मिळाली नसती. शिक्षक मुलांस ह्याप्रमाणें ममतेनें वागवील तर त्याच्या अंगीं एक प्रकारचें साम-र्थ्य येईल, म्हणून वर दर्शविलेल्या प्रकारचा अनुभव त्यानें मधून मधून अवश्य घ्यावा व अशा अनुभवावरून-च कोणत्या मुलास किती ममतेनें वागविल्यास हरकत नाहीं, हें त्यानें ठरवावें.

शाळा चालविण्याचे कामीं शिक्षकावर नीतिदृष्ट्या

शाळेचें काम चालवात असतां **नीतिदृष्ट्या कित्येक प्रकारचें जोखीम** शिक्षकावर पडतें. मुलांचें नीतिवर्तन उत्तरोत्तर सुधारण्याचे त्याचे प्रयत्न सुरू असतां त्यानें हें

पडणारें दुसरें एक जोखीम. जोखीम विसरतां कामा नये. हें जोखीम अशा प्रकारचें आहे कीं, त्या संबंधानें विद्यार्थ्यांस होतां होईं तों जागृत ठेवणें हें शिक्षकाचें महत्त्वाचें काम आहे. उदाहरणार्थ, शाळेंत वर नंबर मिळविण्यासाठीं मोठी चढाओढ सुरू असते, व तीमुळें विद्यार्थ्यांच्या मनांत एकमेकांविषयीं **मत्सर** उत्पन्न होण्याचा संभव असतो. रोजच्या रोज अशी चढाओढ मुलांमध्यें सुरू ठेवणें, त्यांना नंबराप्रमाणें मार्क देणें व अशा नंबरांवरून कोणास काय बक्षीस द्यावयाचें तें ठरविणें; इत्यादि प्रकार वर्गांत सुरू असल्यामुळें मुलांची इतकी धांदल उडून जाते कीं, तेणेंकरून त्यांच्या आत्मसंयमनाच्या प्रयत्नास बराच व्यत्यय येण्याचा संभव आहे. प्रतिष्ठा मिळविण्यासाठीं प्रत्येक मुलगा अति उत्सुक असल्यामुळें कोणत्या तरी रीतीनें वर नंबर मिळविण्यास तो टपलेला असतो; आणि हें साध्य न होऊन दुसऱ्या मुलानें वर नंबर मिळविल्यास त्याच्याविषयीं त्या मुलाच्या मनांत शत्रुभाव उत्पन्न होतो. चढाओढीमुळें जें एक प्रकारचें उत्तेजन मुलांना मिळतें, त्याची किंमत फार आहे; ह्यांत शंका नाहीं. तथापि ह्या फायद्याबरोबरच जे इतर तोटे आहेत, त्यांजकडे आपलें दुर्लक्ष होऊन उपयोग नाहीं. नंबराची योग्यता फार आहे; आणि सरळ रीतीनें वर्गांत चढाओढ सुरू असल्यास शाळेंतील सर्व शिक्षणक्रम विद्यार्थ्यांस फार मौजेचा वाटतो. तेव्हां नंबर दिल्यानें अशा प्रकारचें उत्तेजन मिळत असल्यामुळें नंबर देण्याचा क्रम अजी बंद करणें फारसें सयुक्तिक नाहीं; हें खरें. तथापि अशा स्पर्धेपासून

शिक्षणसंबंधीं कामांत खरोखर फायदा होतो किंवा नाहीं, ह्याविषयीं पुष्कळ शिक्षकांना अलीकडे मोठी शंका येऊं लागली आहे; ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. नंबर देण्यापासून जे नफेतोटे होतात, त्यांची लक्षपूर्वक तुलना करून ह्या वादग्रस्त प्रश्नाचा निर्णय ठरविणें कठीण आहे. तथापि एक गोष्ट निर्विवाद दिसते ती हीच कीं, मनुष्य कोणत्याही प्रकारचा प्रयत्न करीत असला तरी त्यांत चढाओढ आहेच. मनुष्यास त्याच्या आयुष्यांत असा एकही धंदा नाहीं कीं ज्यांत चढाओढीचा संबंध मुळींच नाहीं. त्यास उदरनिर्वाहासाठीं ह्या जगांत जे अनेक प्रकारचे कामधंदे करावे लागतात, त्यांतील बहुतेकांमध्यें ह्या चढाओढीचे परिणाम पदोपदीं दिसून येतात. तेव्हां एकादा धंदा शिकून आपला चरितार्थ चालविण्याचें पूर्ण सामर्थ्य ज्याप्रमाणें शाळेंतील शिक्षणामुळें मुलाच्या आंगीं येतें, त्याचप्रमाणें अशा प्रकारच्या चढाओढीमुळें त्याच्या मनावर अनिष्ट परिणाम घडणार नाहींत, असें शिक्षणही त्याला शाळेंतच मिळालें पाहिजे. सारांश, मनुष्य कोणत्याही धंद्यांत पडो; त्या धंद्यांत इतरांशीं त्याची चढाओढ सुरू असतां त्यानें आपलें वर्तन शांतपणाचें, प्रामाणिकपणाचें व उदारपणाचें ठेवणें अति महत्त्वाचें आहे. कारण अशा रीतीचें वर्तन तो ठेवील तरच त्याचें स्वतःचें हित साधून चारचौघांशींही त्याला सलोख्यानें राहतां येईल. म्हणून मुलें कोणत्याही धंद्यांत पडलीं तरी अशा रीतीनें त्यांस वागतां येईल, असें शिक्षण त्यांना शाळांतून मिळेल, तर सर्व समाजावर शिक्षकाचे महत् उपकार होतील. चढाओढीमुळें होणाऱ्या तोट्यांकडे

विद्यार्थ्यांचें शिक्षकानें सर्वकाळ लक्ष लावावें; व मुलें तसे तोटे करून घेणार नाहींत असें करावें. तथापि शिक्षकानें स्वतः या विषयाचें सतत मनन केल्याशिवाय त्याला विद्यार्थ्यांना ह्या संबंधानें योग्य शिक्षण देतां येणार नाहीं. उदार अंतःकरणाच्या माणसांच्या आंगीं मोठा दोष ह्मटला ह्मणजे महत्त्वाकांक्षाच होय; व ह्या महत्त्वाकांक्षेमुळें त्यांच्या हातून नीच कृत्यें घडण्याचा संभव असतो. तसेंच या दोषामुळें त्यांच्या आंगचें सामर्थ्य व औदार्य नष्ट होऊन तीं माणसें निःसत्त्व व हलक्या मनाचीं होण्याचा संभव आहे.

मुलांकडून मोठेपणीं थोडेंबहुत देशहित झालेंच पाहिजे.

येथपर्यंत मुलांच्या प्रत्यक्ष शाळेंतील आयुष्यक्रमाचा विचार झाला. आतां थोडेंसें पुढें जाऊन त्यांच्या मोठेपणच्या आयुष्यक्रमाचा राष्ट्रीय दृष्टीनें विचार करूं. हा आयुष्यक्रम चांगल्या रीतीनें घालवितां येण्यास मुलांच्या आंगीं कित्येक गुण यावे लागतात. ह्मणून **देशांत ज्या दुर्गुणांचा प्रसार होत असेल, त्यांजकडे शिक्षकांनीं लक्ष दिलें पाहिजे.** तसेंच त्या* दुर्गुणांचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य अल्पवयस्क विद्यार्थ्यां-

---

* हें विवेचन स्काटलंदांतील वस्तुस्थितीस अनुलक्षून आहे. आपल्या स्थितीस हें सर्वांशीं जुळेलसें ह्मणतां येत नाहीं. उदाहरणार्थ, मद्यपानासंबंधानें येथें जी स्थिति वर्णिली आहे, तितकी शोचनीय स्थिति आपल्या देशाची खरोखर नाहीं. तथापि या सर्व विवेचनावरून ध्यानांत इतकेंच ठेवावयाचें कीं, मुलांचा आयुष्यक्रम मोठेपणींही उत्कृष्ट रीतीनें जाईल; व त्यांच्या हातून सर्व राष्ट्राचें थोडेंबहुत हित होईल; अशा तऱ्हेचें शिक्षण त्यांस देण्याचा प्रयत्न शिक्षकांचा असला पाहिजे. ( भा० क० )

च्या आंगीं आणण्यासाठीं उत्कृष्ट उपाय कोणते, तेही त्यानें लक्षांत आणिले पाहिजेत. मनुष्याचा स्वभाव उद्धट व दांडगा असेल,तर त्याला संसारांत सुख मुळींच होणार नाहीं; व ह्या दुर्गुणांमुळें त्याच्या हातून जुलमाचीं कृत्यें घडूं लागतील. हे दुर्गुण मुलांस जडूं नयेत ह्मणून तीं शाळेंत येऊं लागल्यापासूनच शिक्षकानें फार सावधगिरी ठेविली पाहिजे. मुलांच्या अंतःकरणांतील कुविचार वरचेवर नष्ट होत जातील अशाप्रकारें शिक्षकानें त्यांस सतत उपदेश केला पाहिजे. वाचनपुस्तकें म्हणा, इतिहास म्हणा, किंवा वर्गांत प्रत्यक्ष घडणाऱ्या इतर गोष्टी म्हणा; ह्या सर्वांच्या आधारें जेव्हां जेव्हां उपदेश करितां येण्यासारखा असेल तेव्हां तो करून हा उद्देश शिक्षकानें सिद्धीस नेला पाहिजे. सारांश, मुलांचीं मनें सुधारून त्यांस उन्नतावस्थेस पोहोंचविण्यासाठीं शिक्षकानें हरएक उपाय योजिले पाहिजेत. अशा रीतीनें स्वभावांत सुधारणा होऊन मुलें हळू हळूच उन्नतावस्थेस पोहोंचलीं असतां मोठेपणीं त्यांच्या हातून निर्दयपणाचीं कृत्यें घडत नाहींत; व तीं आपला अधिकार सौम्य रीतीनें बजावितात. कित्येक देशांत मुलांमुलींना एकाच शाळेंत शिक्षण देण्याची व्यवस्था असते; व अशा शाळा स्काट्लंदांत आहेत. मुलांनीं मुलींशीं वर्तन ठेवणें तें सभ्यतेचें व उदारपणाचें असलें पाहिजे; असें शिक्षण या शाळांतून देण्यास फार संधी मिळते. ह्या शिक्षणाची योग्यता वस्तुतः फार असून ह्याचे परिणाम पुढील पिढ्यांवरही होतात. मुलें सन्मार्गानें चालत असतां त्यांस वारंवार उत्तेजन देणें, हेंच खरें शिक्षण होय. आपल्या सोबत्यांशीं निष्ठुरपणानें

वागणें हा दुर्गुण आहे, अशी विद्यार्थ्यांची शिक्षकानें समजूत करून दिलीच पाहिजे. परंतु एकादा मुलगा एकाद्या मुलीशीं दांडगाईनें वागेल तर तें विशेष निंद्य होय; अशी त्यानें शाळेंतील सर्व विद्यार्थ्यांची खातरी करून दिली पाहिजे. विद्यार्थ्यांची ही खातरी अशा रीतीनें करून द्यावी कीं, मुलांना तर आपल्यावर कांहीं विशेष जोखीम ठेविलेलें आहे असें वाटावें. तथापि मुलींची अशी समजूत होऊं नये कीं, आपल्याकरितां कांहीं निराळा सौम्य कायदा आहे; व आपल्या हातून गुन्हे घडले असतां आपणांस फारशी शिक्षा होणार नाहीं. सारांश, मुलांमुलींसंबंधानें न्यायाचा कांटा तंतोतंत कसा धरावा, हें चतुर शिक्षकाला तेव्हांच समजेल. मुलीनें दांडगेपणाचें वर्तन केल्यास त्याजबद्दल अधिकच तिरस्कार दर्शविला पाहिजे. कारण सौम्यवृत्ति आणि मर्यादशीलपणा हे स्त्रीजातीचे नैसर्गिक गुण असल्यामुळें मुलींना असें वर्तन अगदींच शोभत नाहीं. मुलांच्या आंगीं मोठेपणीं असभ्यपणा येऊं नये; तसेंच मुलींच्या आंगीं मोठेपणीं सौम्यवृत्ति रहावी; कारण सौम्यवृत्तीनें कामें जितकीं चांगलीं होतात, तितकीं नुसत्या दांडगाईनें होत नाहींत. ह्यास्तव मुलांच्या आंगीं सभ्यपणा आणि मुलींच्या आंगीं सौम्यवृत्ति हे गुण आणण्यासाठीं चांगला शिक्षक अति परिश्रम करितो. हे सद्गुण मुलांच्या आंगीं यावे म्हणून त्या धोरणानें दिलेलें शिक्षण अत्युत्कृष्ट प्रतीचें होय. ह्यास्तव त्याप्रमाणें शिक्षण देण्यास सर्वांनीं झटावें. हें शिक्षण देण्यासाठीं केलेल्या परिश्रमामुळें मुलांच्या स्वभावांत जी सुधारणा होईल, ती शाळेच्या

वार्षिक परीक्षेच्या वेळीं दृष्टोत्पत्तीस येण्यासारखी नाहीं; कारण परीक्षकांचें ह्या गोष्टीकडे लक्षच नसतें. **मुलें पास होतील त्या मानानें शाळांना सरकारांतून मदत द्यावयाची** असा शाळाखात्याचा हल्लीं नियम आहे. म्हणून शाळाखात्याकडून शाळेला किती मदत मिळाव-याची, ह्याविषयीं परीक्षकांकडून जो तक्ता तयार होतो, त्यांत ह्या नीतिशिक्षणाचा उल्लेख मुळींच आढळणार नाहीं; आणि स्कूलबोर्डाच्या जमेंत ह्याच्या योगानें भर मुळींच पडणार नाहीं. कारण असे सद्गुण मुलांस लावि-ल्याबद्दल निराळी मदत शाळाखात्याकडून मिळावयाची नाहीं. तथापि ह्या सर्व गोष्टी गौण होत. मुलांच्या मनावर नीतिशिक्षणामुळें प्रत्यक्ष जे परिणाम घडतात, ते चिरस्थायी असल्यामुळें शिक्षणक्रम संपल्यानंतर समाजांतही सर्वत्र त्यांचा प्रसार होतो. फार कशाला, पु-ढील विद्यार्थ्यांच्या पिढ्यांवरही त्यांचा परिणाम होतो. ह्मणून हा फायदा आपणा सर्वांस अति महत्त्वाचा होय.

मद्यपाननिषेध.

**स्काटलंदांतील** शिक्षकांनीं विद्यार्थ्यांस ज्या दुर्गुणा-संबंधानें विशेष सावध राहण्याविषयीं इशारत देणें अवश्य आहे, तो मद्यपानच होय. हें एक दुर्व्यसन तेथील लोकांस अस-ल्यामुळें त्या देशाची फार नाचक्की होत आहे; आणि ह्या दुर्व्यसनामुळें त्या देशाचें द्रव्यद्वारा नुकसान होत असून त्या लोकांस शारीरिक क्लेश इतके होत आहेत कीं, ते ऐकून आंगावर कांटाच उभा राहील! मात्र ह्या विषयासंबंधीं आंकड्यांचें चांगलें मनन केलें नाहीं, तर हें नीटसें ध्यानांत येणार नाहीं. हें निंद्य दुर्व्यसन ते लोक जसजसें

टाकून देतील, तसतसें त्या देशाचें उत्तरोत्तर कल्याण होत जाईल. एकादा मनुष्य जात्या मोठा बुद्धिमान् असला, तरी ह्या दुर्व्यसनाच्या सपाट्यांत एकदां सांपडला कीं, त्याच्या बुद्धीचा ऱ्हास झालाच. ही जशी एका व्यक्तीची स्थिति तशीच सर्व राष्ट्राची होय. सारांश, मद्यपान हें इतकें निंद्य दुर्व्यसन आहे कीं, तें समूळ नाहींसें होईल असें शिक्षण शाळेंत मिळालें पाहिजे. अशा प्रकारचें शिक्षण शिक्षक देऊं लागला असतां त्याला सांप्रत अति अडचणी येतील. स्काट्लंदांतील मोठमोठ्या शहरांच्या ज्या भागांत दारिद्र्य अठरा विश्वे भरलेलें आहे, व तळख दारूच्या घातक परिणामामुळें ज्यांची स्थिति अगदीं निकृष्ट झालेली आहे, तेथें तर अशा अडचणी विशेषच येतील. तथापि ह्या दुर्व्यसनासंबंधानें उपदेश करण्यास योग्य असे प्रसंग साधण्यासाठीं शिक्षकानें नेहमीं दक्ष असावें; हा प्रयत्न दृढ निश्चयानें सतत सुरू ठेवावा; हरएक प्रसंगीं उपदेश करावयाचा तो मनःपूर्वक करावा; आणि मद्यपि लोकांचा उपहास करणें शहाणपणाचें नसल्यामुळें तसें करूं नये; ह्मणजे हें दुर्व्यसन फार निंद्य आहे अशी तरुण विद्यार्थ्यांची खातरी हळूहळू बहुधा होत जाईल. शिवाय मद्यपानांत कित्येक वर्षें घालविल्यामुळें मुलांच्या हालअपेष्टा होत असतात, व त्या पशुतुल्य स्थितीचा मुलांस जो थोडा फार अनुभव आलेला असतो तो अति दुःखदायकच असतो. ह्मणून असा उपदेश त्यांच्या मनांवर ठसविण्यासाठीं त्या अनुभवाचा उपयोग होण्याचा संभव आहे. तसेंच प्रसंगोपात्त मद्यपानाचे घातक परिणाम मुलांच्या मनांवर बिंबविले असतां आहार-

विहारांत नेमस्तपणा हा जो सर्व सद्गुणांचा पाया त्याची योग्यताही त्यांच्या मनांत शिक्षकाला ठसवितां येते. शिवाय मोठेपणीं आपलें आयुष्य उत्तम प्रकारें घालवितां येण्यास आत्मसंयमन आंगीं असणें अवश्य आहे; अशाविषयींही त्यांची पक्की खातरी शिक्षकास करितां येते. मद्यपानामुळें कांहीं एकच प्रकारचें नुकसान होत नाहीं; शारीरिकशक्तीचा ऱ्हास होऊन जीव नकोसा होतो; मानसिकशक्तीचाही अर्थात् ऱ्हास होतो; आणि घरेंच्या घरें धुळीस मिळतात. हीं सर्व नुकसानें अशा तऱ्हेचीं आहेत कीं, ह्यांचे परस्परसंबंध मुलांस सहज रीतीनें तेव्हांच दाखवितां येतील. ह्या सर्व नुकसानांचा विचार केला असतां अशी सहज खातरी होईल कीं, मूल मोठेपणीं दारूबाज बनून समाजांत आपलें हांसें करून घेणार नाहीं, अशाविषयीं शिक्षकानें खबरदारी घ्यावी. तरुण मुलांच्या अंतःकरणांत ह्या दुर्व्यसनाविषयीं तिटकारा उत्पन्न करण्याची शिक्षकाची इच्छा दिसून येईल, तर त्याला लोकांनीं प्रोत्साहन देणें अवश्य आहे. परंतु ज़ेव्हां जेव्हां ह्या विषयाला अनुलक्षून उपदेश करणें असेल, तेव्हां तेव्हां आपल्या भाषणानें मुलांच्या मनोवृत्तींस यत्किंचितही न दुखवितां मोठ्या शिताफीनें शिक्षकानें हें काम बजाविलें पाहिजे. ह्या मद्यरूपीं भयंकर पिशाचाचा प्रवेश स्कॉट्लंदांतील किती कुटुंबांत झालेला आहे, आणि ह्याच्या घावांनीं पडलेल्या क्षतांमुळें किती तरुण माणसांचीं अंतःकरणें होरपळून जात आहेत, हें तेथील शिक्षकांनीं ध्यानांत बाळगिलें पाहिजे. तेथील मोठमोठ्या शहरांतील शाळांची व्यवस्था स्कूलबोर्डाकडे जाऊन थोडेच दिवस झाले

आहेत. तथापि ह्या काळांत त्या शाळांची सुधारणा करण्यास हीं बोर्डें झटत असतां त्यांच्या दृष्टोत्पत्तीस अति शोचनीय स्थिति आलेली आहे; इतकी कीं, तिचें वर्णन करण्यास लेखणी धजावत नाहीं. त्या देशांत सक्तीनें शिक्षण देण्याचा कायदा अलीकडे सुरू झाल्यामुळें बरींच मुलें अशा स्थितींतून बचावण्याचा संभव आहे; ह्मणून त्या मुलांना ह्या दुर्व्यसनांत पडण्याचा मोह कधींही उत्पन्न होणार नाहीं, अशा तऱ्हेचें शिक्षण देण्याची फारच अवश्यकता आहे.

मुलांचे स्वभाव सुधारण्यास शिक्षकाला मुख्यत्वें दोन मार्ग आहेतः—एक त्यांच्या स्वभावांतील **दुर्गुण काढून टाकणें**; आणि दुसरा त्यांच्या स्वभावांतलि **सद्गुणांबद्दलत्यांस उत्तेजन देणें.** पहिल्या उपायासंबंधानें विवेचन येथवर झालें. दुसरा उपाय अमलांत आणण्याचें काम मनाला आनंद देणारेंच आहे. दुष्ट मनोवृत्ति नष्ट करण्यास चांगल्या मनोवृत्तींचें पुष्टीकरण करणें ह्यासारखा उत्कृष्ट मार्ग नाहीं. पहा, उदार आचरणाविषयीं मुलाच्या मनांत प्रेरणा उत्पन्न करून तिचें पुष्टीकरण करीत गेल्यानें नांच विचारांस थाराच मिळेनासा होईल. हीच गोष्ट सर्वत्र लागू आहे. सूर्योदयाबरोबर ज्याप्रमाणें तिमिराचा नाश व्हावयाचा, त्याप्रमाणें सद्गुणांचा उदय झाला कीं दुर्गुणांचा अस्त झालाच, असें समजावें. आपल्या वर्तनानें दुसऱ्याच्या मनास दुःख होईल किंवा कसें, असा विचार मनांत घोळूं लागल्यास दांडगाईनें वागण्या-

मुलांच्या स्वभावांतील सद्गुणांबद्दल शिक्षकानें त्यांस शाबासकी दिली पाहिजे.

स मुलें कचरूं लागतील. मुलाच्या अंतःकरणांत उदार विचारांचा पगडा बसल्यानंतर क्वचित् अप्पलपोटेपणाची कल्पना उत्पन्न झाल्यास त्याचेंच मन त्याला तत्काळ खाऊं लागेल. सत्यप्रीति मनांत बिंबली कीं, सत्यास धरून चालण्यास अवश्य तें धैर्य त्याच्या आंगीं आलेंच. म्हणजे खरें बोलल्यानें फार शिक्षा होण्याची भीति असली व खोटें बोलल्यानें तें सर्व टळण्याचा संभव असला. तरी हा नीच मार्ग स्वीकारण्याकडे त्यांच्या मनाची प्रवृत्ति नंतर व्हावयाची नाहीं. सारांश, मुलांकडून दुराचरण होऊं नये अशी इच्छा असेल तर, त्यांनीं सत्कृत्यें केलीं असतां शिक्षकानें विचारपूर्वक व मनःपूर्वक त्यांस उत्तेजन देत जावें; म्हणजें त्यानें ह्या संबंधाचें आपलें बरेंच कर्तव्य बजाविल्याप्रमाणें होईल.

ह्यापुढें ओघानेंच प्रश्न उत्पन्न होतो तो असाः-शिक्षकानें विद्यार्थ्यांस कोणत्या रीतीनें वागवावें ह्मणजे ते खरोखर सद्गुणी होत जातील ! या कामीं विद्यार्थ्यांस मदत करण्याचा मुख्य उपाय ह्मटला ह्मणजे शाळेंत त्यांस उत्तम वळण लावितांना शिक्षकानें स्वतःचें वर्तन चोख ठेवणें हा होय. शाळेंत मुलांस उत्तम वळण सर्वकाळ लावावयाचें असल्यामुळें या उपायाचा उपयोगही शिक्षकास सर्वकाळ होणारा आहे. असें वळण लावीत असतां त्याचें स्वतःचें वर्तन चांगल्या प्रकारचें आढळेल तर मुलांच्याही मनांत त्याच्या सुस्वभावाविषयीं सहजच पूज्यबुद्धि

त्यांचें मन नीतिमार्गाकडे वळविण्यासाठीं त्यांस मदत देण्याचा पहिला उत्कृष्ट उपायः—त्यांस उत्तम वळण लावितांना त्यांस सुनीतीनें वागाविणें.

उत्पन्न होऊन तीं त्याचें अनुकरण करण्यास प्रवृत्त होतील. मुलांचा बंदोबस्त ठेवण्यासाठीं जुलूम जबरदस्ती केल्यानें त्यांच्या मनांत सद्गुणांची अभिवृद्धि कधीं व्हावयाची नाहीं. म्हणून असा बंदोबस्त ठेवणें तो नीतिदृष्टया उत्कृष्ट उपाय दिसतील त्यांच्या आधारेंच ठेविला पाहिजे. आपणांस शिक्षक अन्यायानें वागवितो, अशी तक्रार करण्यास विद्यार्थ्यांस थोडीशी संधी दिली तरी त्यांच्या नीतिशिक्षणास थोडा बहुत धक्का पोहोचतो. ह्मणून शाळागृहांत शिक्षकाचें वर्तन सदा सर्वकाळ पूर्ण न्यायाचें व व ममतेचें असलें पाहिजे; म्हणजे मुलें उत्तरोत्तर पूर्ण नीतिमान् होत जातील. आतां शाळत शिक्षकानें सर्वकाळ न्यायानें व ममतेनें वर्तलें पाहिजे, असें दर्शविलें आहे खरें; परंतु ह्यांत यत्किंचित् व्यंग पडलें क ं, सर्व काम फसलें, असा कांहीं अर्थ समजावयाचा नाहीं. उत्कृष्ट प्रतीचें नीतिशिक्षण देण्यास शिक्षकाच्या हातून कधींही अन्याय घडतां कामा नये, अशी अट ठरविण्याचें कारण नाहीं. मुलांस नीतिमार्गास लावितां येण्यास शिक्षक स्वतः नीतीचा पुतळा असला पाहिजे, असा कांहीं भाग नाहीं. हें सर्व खरें आहे. तथापि विद्यार्थ्यांची इतकी खातरी झाली पाहिजे कीं, अति नीतिमान् पुरुषांविषयीं आपल्या शिक्षकाची खरोखर फार पूज्यबुद्धि आहे; आणि अशा पुरुषांचें होईल तितकें अनुकरण करण्यास तो मनःपूर्वक झटत आहे. विद्यार्थ्यांची एकदां अशी खातरी झाल्यानंतर शिक्षकाच्या हातून क्वचित् अन्यायाचें वर्तन घडलें तरी त्यांचा विश्वास त्याजवरून उडणार नाहीं; उलट अशा प्रसंगीं तो दृढतर

होईल. हें म्हणणें प्रथम दर्शनीं थोडेंसें विसंगत वाटेल. तथापि किंचित् मनन केलें असतां दिसून येईल कीं, आपल्या हातून अन्याय घडला आहे, अशी एकाद्या माणसाची खातरी झाल्यानंतर तो आपलें वर्तन ज्या प्रकारचें ठेवितो, त्यावरून त्याच्या स्वभावाविषयीं आपण अनेक वेळां अधिक निश्चयात्मक मत ठरवितों. नेहमींच्या वर्तनक्रमांत त्याजकडून अनेक सत्कृत्यें घडत असतील; परंतु त्यांवरून त्याच्या स्वभावाची इतकी नक्की परीक्षा आपणांस होत नाहीं. मुलांचें आपल्या शिक्षकाविषयीं जें मत बनतें त्याला तर हें तत्त्व विशेष लागूं पडतें. शिक्षकाच्या हातून एकादी चूक घडली; आणि तो ती नाकबूल करण्याची किंवा तिची छपवाछपव करण्याची खटपट करीत आहे, असें विद्यार्थ्यांच्या ध्यानीं आलें; तर त्या गोष्टीची त्यांच्यांत तत्काळ चर्चा सुरू होते. इतर कोणत्याही विषयाची चर्चा करण्यास तीं इतकीं उत्सुक नसतात. सारांश, मुलांच्या वर्तनासंबंधानें वारंवार नियम ठरवून त्यांजकडून त्या नियमांचें उल्लंघन झाल्यास त्यांना शिक्षक सावध करीत असतो. परंतु त्याच्याच हातून प्रसंगोपात्त चूक घडल्यास त्यानें ती स्वतः कबूल करावी; व तिजबद्दल प्रांजलपणें दिलगिरी प्रदर्शित करावी; म्हणजे त्याचा उपदेश मुलांस विशेष निष्कपटपणाचा वाटेल. कारण दुसऱ्यांनीं जे नियम पाळावे अशी त्याची इच्छा असते, त्यांअन्वयें स्वतः वर्तण्यास तो खरोखर झटत आहे, अशी विद्यार्थ्यांची खातरी होते. ह्मणून आपल्या हातून चुकून अन्यायाचें कृत्य घडल्यास शिक्षकानें तें प्रांजलपणें कबूल करावें. इतकेंच नाहीं,

तर अवश्य दिसल्यास शाळेंतील सर्व मुलांसमक्ष तसें कबूल करावें; आणि ती चूक सुधारितां येण्यासारखी असेल तितकी सुधारावी. मनुष्यप्राणी चुकीस पात्रच आहे, म्हणून आपल्या हातून चूक कधींही घडणार नाहीं असा बाणा कोणीं मिरवूं नये. असा बाणा मिरवून कोणी आपल्या वर्गाचें काम चालवील, तर तें निवळ ढोंग समजावें. योग्य प्रसंगीं आपली चूक कबूल केल्यानें शिक्षकाचा दाब कमी होत नाहीं. तथापि जेव्हां जेव्हां शिक्षक आपली चूक कबूल करील, तेव्हां तेव्हां विद्यार्थ्यांच्या मनावर उत्कृष्ट प्रकारच्या नीतिशिक्षणाचा ठसा उमटावा, असा त्याचा उद्देश व्यक्त झाला पाहिजे. त्याच्या आंगीं कांहीं व्यंग असून अगदीं घाबरून गेल्यामुळें तो आपली चूक कबूल करीत आहे, अशी विद्यार्थ्यांची समजूत होणें अनिष्ट आहे. सारांश, आपल्या शिक्षकाच्या आंगीं आत्मसंयमन आहे, त्याचा लोप झालेला नाहीं; अशी विद्यार्थ्यांची अशा प्रसंगीं खातरी झाली पाहिजे.

ह्याच्या खालच्या प्रतीचा उपाय म्हटला ह्मणजे मुलांनीं सुवर्तन ठेविल्यास त्यास प्रत्यक्ष शाबासकी देणें, हा होय. शिक्षकानें स्वतः विषयीं विद्यार्थ्यांच्या मनांत प्रेम उत्पन्न करावें; आणि त्यास सन्मार्गास लावण्यास उत्तेजन देण्याचा आपला हेतु आहे अशी त्यांची प्रत्यक्ष खातरी करून द्यावी, ह्मणजे त्याची मुलांवर विलक्षण छाप बसेल. शिक्षकाचें आपल्याविषयीं

दुसरा उपायः— मुलांनीं सुवर्तन ठेविल्यास त्याजबद्दल त्यांना प्रत्यक्ष शाबासकी देणें.

उत्कृष्ट मत असावें, अशी मुलांना स्वभावतःच इच्छा असते; आणि त्या इच्छेचा उपयोग करून घेतल्यास त्यांच्या स्वभावांत दिवसेंदिवस सुधारणा करण्यास फार सुलभ जातें. तथापि त्यांची स्तुति किंवा निंदा करणें ती क्वचित् प्रसंगींच केली पाहिजे; वरचेवर केल्यास त्यांजवर छाप राहणार नाहीं, हें लक्षांत ठेवावें. मुलानें एकादें सत्कृत्य केल्यास तें आपणांस पसंत पडलें आहे, असें शिक्षकानें त्यास दर्शवून ती गोष्ट त्याच्या चांगली ध्यानांत आणून द्यावी. परंतु सर्व मुलांदेखत त्याची स्तुति फारशी करूं नये. मुलांचे स्वभाव सुधारण्याचें काम इतकें नाजूक आहे कीं, त्यांस वारंवार दोष दिल्यानें ह्या कामास जसा व्यत्यय येण्याचा संभव आहे तसाच व्यत्यय वारंवार शाबासकी दिल्यानेंही येण्याचा संभव आहे. सदाचरणाविषयीं वारंवार शाबासकी दिली असतां दोन प्रकारची भीति असते:-(१) मुलांच्या आंगचा गर्व वाढणें आणि (२) फक्त आपलें कर्तव्य केलें असतां मोठें शतकृत्य आपण केलें अशी कल्पना त्यांचे मनांत उत्पन्न होणें. ह्यांतील पहिली भीति, ह्मणजे मुलें गर्विष्ठ होण्याची भीति, विशेष असते. परंतु तीं गर्विष्ठ होत चालल्यास तें शिक्षकाचे ध्यानांतही आल्यावांचून राहत नाहीं; ह्यामुळें त्याचा प्रतिकार करण्याचे उपाय योजणें अवश्य आहे, असेंही त्याला कळूं लागतें. तथापि दुसऱ्या प्रकारच्या भीतिमुळें मुलांच्या मनावर होणारा परिणाम ह्याप्रमाणें सहज रीतीनें शिक्षकाचे लक्षांत येत नाहीं. तथापि ह्या परिणामामुळें मुलांचे स्वभाव मात्र लवकर बिघडूं लागतात. आपण एकादें सत्कृत्य केल्यास त्यांत कांहीं वि-

शेष पुरुषार्थ केला नाहीं, तर आपणांस जें करणें अवश्य तितकेंच केलें; अशी मुलांची पक्की समजूत करून दिली पाहिजे. तसेंच ज्याप्रमाणें बोलणें चालणें ह्या क्रिया आपण सहज करितों त्याप्रमाणें अशीं कृत्यें दररोज शंभर करावीं लागल्यासही आपणांस त्याबद्दल त्रास न वाटतां आपण तीं सहज व नेटानें केलीं पाहिजेत;अशी मुलांची पक्की समजूत पाडिली पाहिजे. मुलांनीं सत्कृत्य केलें असतां त्याजबद्दल साधारणपणें शिक्षकानें नुसती **पसंती दर्शवावी**, त्यांच्या **तोंडावर त्यांची स्तुति करूं नये;** ह्मणजे ही भीति टाळितां येईल. मुलांस उत्तेजन देणें तें नेत्रेंद्रियाच्याद्वारें सुलभ रीतीनें देतां येतें. तसेंच ह्या कामीं ह्या इंद्रियाचा उपयोग केल्यानें चूक किंवा इतर अनिष्ट परिणाम घडण्याचा संभव फारच कमी असतो. नजर ह्मटली ह्मणजे स्वभावतः चंचलच असते; ह्यामुळें एकाच ठिकाणीं ती फार वेळ राहूं शकत नाहीं. ह्मणून आपणांस जी भीति टाळावयाची आहे ती टाळितां येण्यास ह्याच गुणाचा उपयोग आहे. शिवाय नजर कितीही चंचल असली तरी तिच्याद्वारें दिलेलें उत्तेजन मुलांच्या लक्षांत फार वेळ राहतें. नकाशावर एकादी नदी दाखविली असतां ती त्यांच्या फार वेळ ध्यानांत राहणार नाहीं; परंतु शिक्षकानें नजरेनें दाखविलेला धाक किंवा दिलेलें उत्तेजन तीं कधीं विसरणार नाहींत. आपल्या हातून वारंवार अन्याय घडत आहे अशा समजुतीनें कित्येक मुलांचीं मनें अगदीं गोंधळून जाऊन तीं अगदीं उच्छृंखळ होण्याचा संभव असतो. अशा मुलांना त्यांच्या गुन्ह्यांबद्दल कडक शिक्षा केल्यानें फारसा फायदा होत

नाहीं; तर त्यांना उपदेशपर दोन शब्द सांगितले असतां अधिक फायदा होतो. मात्र उत्तेजन देणें तें साहाजिक रीतीनें प्रसंग येईल तेव्हां दिलें पाहिजे आपणांस शाबासकी मिळाली ती योग्य कारणानें मिळाली असें मुलांना वाटलें पाहिजे. नाहींतर त्यांच्या मनांतील उन्नत विचारांची गति कुंठित होऊन त्यांचा स्वभाव अधिक बिघडेल. सारांश, शिक्षकानें हरएक प्रसंगीं निस्पृहपणानें अधिकार बजाविला पाहिजे. तथापि शाबासकी देणें अवश्य असेल तेव्हां ती तत्काळ द्यावी. स्तुतिपात्र असेल त्याची स्तुति केलीच पाहिजे. एखादें मूल सदाचरण ठेवण्याविषयीं झटत असतां त्यास फार जड जातें. परंतु अशा प्रसंगीं त्याचा तो स्तुत्य प्रयत्न आपल्या लक्षांत आला असून आपणास फार पसंत आहे, असें शिक्षकानें त्यास खाजगी रीतीनें सांगावें. ह्मणजे त्याचा परिणाम मुलाच्या अंतःकरणावर कैक दिवसपर्यंत राहील. तथापि अशी पसंती दर्शविल्यानें मुलाच्या मनांत गर्व उत्पन्न होणार नाहीं, अशाविषयीं त्यानें सावधगिरी ठेवावी. का ण गर्व उत्पन्न झाल्यास आपला हेतु तडीस जाण्यास अडथळे येतील. ही पसंती केव्हां कशा रीतीनें दर्शवावी, हें नीटपणें समजण्यासाठीं शिक्षकानें वर्गांत सूक्ष्म रीतीनें अवलोकन ठेविलें पाहिजे, व त्याच्या आंगीं दीर्घदृष्टिही असली पाहिजे. मुलांचा गर्विष्ठपणा आपल्या हातून वाढणार नाहीं, अशाविषयीं त्यानें सावधगिरी ठेवावी. त्याचप्रमाणें मुलें बाह्यात्कारीं नम्रतेचें आचरण दाखवून अंतर्यामीं बिघडत जाणार नाहींत; अशाविषयींही त्यानें सावध रहावें. कित्येक गुन्हे असे

असतात कीं, त्यांजबद्दल मुलांना दोष देणेंच अवश्य असतें. अशा प्रसंगीं त्यांस बेधडक दोष द्या. तथापि कित्येक कृत्यांबद्दल त्यांस शाबासकी देणेंही अवश्य असतें. ह्मणून अशा प्रसंगीं ती देण्याविषयीं अनमान करूं नका. सारांश, आपल्या हातून सत्कृत्य घडलें असतां शिक्षकाकडून आपणांस शाबासकी मिळावयाचीच; त्याचप्रमाणें दुष्कृत्यांबद्दल शिक्षाही व्हावयाचीच; अशी विद्यार्थ्यांची खातरी असली पाहिजे; ह्मणजे त्यांच्या स्वभावांत नीतिदृष्ट्या प्रति दिवशीं सुधारणा करण्याचें सामर्थ्य शिक्षकाच्या आंगीं बरेंच येईल. एकाद्या मुलाच्या स्वभावांतील दुष्ट मनोवृत्ति काढून टाकून त्यास सदाचरणानें चालण्याविषयीं एकादा शिक्षक अशा प्रकारें शिक्षण देतो कीं, तेणेंकरून तें मूल अगदीं नाउमेद होतें; परंतु हेंच शिक्षण केव्हां केव्हां धमकी देऊन व केव्हां केव्हां शाबासकी देऊन मित्रत्वाच्या नात्यानें शिक्षक देईल, तर फार निराळा परिणाम घडेल अशा रीतीनें शिक्षण दिलें असतां मूल नाउमेद न होतां त्यास आपला स्वभाव सुधारण्यास मोठा हुरूप येईल. स्वभावांत सुधारणा करण्यास झटणें, हेंच मुलाचें हरएक प्रसंगीं कर्तव्य आहे. परंतु ह्या कामीं त्यास शिक्षकाकडून उत्तेजन मिळत गेल्यास तो विशेष परिश्रम करितो; व यश येण्याचाही त्यास विशेष संभव वाटतो. नीतिदृष्ट्या उत्तम प्रकारचें आचरण कसें ठेवावें, हें मुलाला क्रमाक्रमानें शिकवावयाचें असतें. हें आचरण इतकें महत्त्वाचें आहे कीं, तरुणपणीं मुलाला यशापयश येणें ह्यावरच अवलंबून असतें. तेव्हां असें आचरण ठेवण्याविषयीं शिक्षकाकडून त्याला उत्तेजन

मिळत जावें. शिक्षक मुलांपेक्षां वयानें, ज्ञानानें व अनुभवानें मोठा असतो; ह्मणून त्याजकडून नीतिदृष्ट्या योग्य अशी हरएक प्रकारची मदत मुलांना मिळत गेली, ह्मणजे त्यांना सन्मार्गानें चालण्यास उमेद येते.

दररोज अभ्यास सुरू होण्यापूर्वीं **स्काट्लंदांत** ***धर्मशिक्षण** देतात. असें शिक्षण योग्य प्रकारें दिलें असतां मुलांचे स्वभाव सुधारण्यास तेणेंकरून मदत झाल्याशिवाय रहाणार नाहीं. नीतिशिक्षणाची इमारत उभारण्यास खरा पाया धर्मशिक्षणच होय; आणि **स्काट्लंदां**तील प्रजेचेंही मत असेंच असून तें तिनें स्पष्ट रीतीनें व्यक्त केलें आहे. तसेंच शिक्षणाचा खर्च प्रजेनें कराच्या रूपानें दिलेल्या पैशांतून होत असल्यामुळें प्रजेच्या मताला मान देणें अवश्य आहे. मुलांस नीतिशिक्षण देणें हें आपल्या धंद्यासंबंधीं

स्वभाव सुधारण्याच्या कामीं धर्मशिक्षणाचा उपयोग.

---

* शिक्षणाचें हें अंग आपल्या शाळांतून मुळींच नाहीं, ही दिलगिरीची गोष्ट होय. आपल्या शाळांतून अनेक जातींचीं व धर्मांचीं मुलें येत असल्यामुळें अशा प्रकारचें शिक्षण शाळांतून सुरू करण्यास अनेक अडचणी आहेत खऱ्या. तथापि ही उणीव भरून काढण्यासाठीं भिन्न भिन्न समाजांतील लोकांनीं व सरकारनें कांहीं उपाय योजणें इष्ट दिसतें. हिंदु लोकांस व्यावहारिक शिक्षणाबरोबरच धर्मशिक्षणही मिळावें, अशा हेतूनें अलीकडे **काशी** येथें **मिसेस अनी बासंट** नांवच्या परोपकारी बाईनीं एक "हिंदु कॉलेज" स्थापिलें आहे, व मोठमोठ्या सरकारी अधिकाऱ्यांनीही त्यासंबंधानें आपली संमति दर्शविली आहे. तथापि ह्या एका संस्थेनें वीस कोटी प्रजेची उणीव कोठून पुरी होणार ? (भा. क.)

कर्तव्यांपैकींच एक कर्तव्य आहे, असें कित्येक शिक्षक मानितात; ते ह्या मताबद्दल प्रजेचे खरोखर आभार मानितील. मुलांस सुशिक्षण देण्यासाठीं आईबाप त्यांना शिक्षकाच्या हवालीं करितात; तथापि त्यांना धर्मसंबंधीं जो उपदेश करावयाचा, तेणेंकरून त्यांच्या आईबापांच्या धर्मसमजुतींस धक्का पोहोंचेल कीं काय, अशी भीति तेथील शिक्षकांना पूर्वीं नेहमीं असे; व ह्यामुळें त्यांना फार त्रास पडत असे. परंतु हल्लीं स्काटलंदांतील शाळाखात्यासंबधानें कोडांत अशा प्रकारचें एक कलम घालण्यांत आलें आहे कीं, तेणेंकरून ही भीति राहिली नाहीं. शाळेंत अभ्यास सुरू करण्यापूर्वीं अशा प्रकारचें शिक्षण देणें अवश्य आहे, असें तेथील बहुतेक लोकांचें मत असल्याविषयीं ह्या कलमांत स्पष्ट सांगितलें आहे. तसेंच क्वचित् कोणी ह्या गोष्टीस अपवाद घेणारा निघाला तर त्याजकडून शिक्षकास अगदीं त्रास पोहोंचूं नये, अशी तजवीजही ह्या कलमांत केलेली आहे. धर्मशिक्षण देत असतां मनुष्याच्या अंतःकरणांत पूर्णपणें बिंबेल असा उपदेश करण्याचे प्रसंग शिक्षकास वारंवार येतात, व ह्यांचा उपयोग नीतिशिक्षण देण्याचे कामीं अति होतो. ईश्वर आपलें हरएक कृत्य पाहतो, अशा समजुतीनें आपलीं सर्व कर्तव्यकर्में बजावण्याविषयीं मुलांची समजूत शिक्षकानें घालून द्यावी. तसेंच लहानपणीं आपण सुमार्गानें चालण्याविषयीं परिश्रम करूं लागलों तर ईश्वरासही आपली दया येऊन त्याजकडून आपणांस साहाय्य होईल; अशीही त्यांची शिक्षकानें खातरी करावी. असें झालें असतां त्यांच्या अंतःकरणांत उन्नत विचार

तेव्हांच उत्पन्न होतील; आणि सन्मार्गानें जाण्यास जे परिश्रम करावे लागतात ते त्यांस कष्टप्रद न वाटतां उलट आनंददायक वाटूं लागतील. मानवी स्वभावांत धर्मसंबंधीं समजुतींचें प्राबल्य विशेष असतें; म्हणून अशा समजुतींची आणि नीत्याचरणाची सांगड घालून दिल्यास मुलांचे स्वभाव सुधारण्याच्या ह्या बिकट कामीं शिक्षकास अति मदत होते. धर्मसंबंधीं कोणत्या समजुती विचाराच्या व कोणत्या वेडगळपणाच्या; हा प्रश्न वादग्रस्त असून त्याचा आपणांस येथें विचार करावयाचा नाहीं. ह्याचा निर्णय ज्या त्या व्यक्तीनेंच केला पाहिजे. ह्या प्रश्नाचा विचार करणें प्रत्येकास महत्त्वाचें वाटेल; व शिक्षकास तर हें अधिकच महत्त्वाचें वाटण्याचा संभव आहे. परंतु शिक्षकाच्या नात्यानें ह्या संबंधानें प्रत्यक्ष काय करितां येईल एवढेंच आपणांस तूर्त पहावयाचें आहे; नुसते कल्पनातरंग लढवीत बसण्याची शाळेंत आवश्यकता नाहीं. मुलांच्या आंगीं लहानपणीं जें थोडंबहुत ज्ञान असतें, त्याच्या अनुरोधानें त्यांची पूर्णपणें सुधारणा कशी होईल, एवढेंच कोडें शिक्षकाला उकलावयाचें आहे. हें कोडें उकलण्याच्या कामीं अभ्यास सुरू होण्यापूर्वी जें धर्मशिक्षण मुलांस द्यावयाचें त्याचा शिक्षकाला बराच उपयोग होतो. शुद्ध अंतःकरणानें *ईश्वरी उपासना करावी; म्हणजे फार फायदा

* धर्मसंबंधीं शिक्षण देण्यास आपल्या शाळांतून अडचणी आहेत, ह्याचा उल्लेख मागील एका टिपेंत आलाच आहे. तथापि निरनिराळ्या धर्माचीं मुलें शाळेंत असलीं तरी प्रसंगोपात्त ईश्वराच्या महत्त्वाविषयीं सामान्यत्वेंकरून उपदेश

होईल. तसेंच साक्रेटीस, क्राइस्ट, तुकाराम, रामदास इत्यादि साधुपुरुषांवर मोठमोठे प्रसंग आले असतांही त्यांनीं आत्मसंयमन करून मनाची शांति कशी कायम ठेविली हें त्यांना अशा प्रसंगीं सांगत जावें. ह्मणजे विचारपूर्वक आत्मसंयमन कसें करावें, ह्याचें शिक्षण मुलांस सुलभ रीतीनें देतां येईल. ह्या दोन गोष्टींचा ह्या कामीं जितका उपयोग होतो, तितका इतर कोणत्याही गोष्टीचा होत नाहीं. तथापि ईश्वरोपासना करणें ती मनःपूर्वक असेल, तरच उत्तम मदत होईल. उपासना केलीच पाहिजे म्हणून कशी तरी एकदां करून टाकिली; व सत्पुरुषांच्या गोष्टी वगैरे सांगणें त्याही निष्काळजीपणानें सांगितल्या; तर धर्मशिक्षणानें महत्त्व नष्ट होऊन उलट त्यापासून अनिष्ट परिणाम घडण्याचा फार संभव आहे. कारण ईश्वराची स्तुति मनःपूर्वक केली नाहीं, आणि साधूंच्या गोष्टी विचारपूर्वक सांगितल्या नाहींत, तर ह्या दोन्ही गोष्टींतील रहस्य मुलांच्या मनांत बिंबणार नाहीं. धर्मशिक्षणाचा मुलांच्या मनावर योग्या-

---

( मागील पृष्ठावरून )

करण्यास शिक्षकास प्रत्यवाय आहेसें दिसत नाहीं. सर्व धर्मांचें रहस्य एकच असून प्रत्येक धर्मांत असे सत्पुरुष होऊन गेले आहेत कीं, त्यांना परधर्मीय लोकही स्तुत्य मानितील. सारांश, भिन्न भिन्न धर्मांचा किंवा त्यांतील धर्मगुरूंची तुलना करण्याचें कृत्य सोडून देऊन सामान्यत्वें ईश्वराची महती विद्यार्थ्यांचे मनावर बिंबविण्याचे प्रसंग शिक्षकांनीं अवश्य साधावे; ह्मणजे धर्मशिक्षणासंबंधानें थोडें बहुत तरी कर्तव्य त्यांनीं बजाविल्याप्रमाणें होईल

( भा. क. )

योग्य परिणाम होणें, हें शिक्षकाचें त्या वेळचें वर्तन, त्याचा स्वर आणि त्याची भाषासरणी, ह्यांवर अवलंबून आहे. हीं सर्व निर्दोष असलीं तर लहान मुलांच्या मनांत उत्कृष्ट विचार उत्पन्न होऊन सुपरिणाम घडेल. सारांश, शिष्टाचार आहे म्हणून कशी तरी एकदां प्रार्थना करावयाची, असें मुलांस वाटून उपयोग नाहीं. तसेंच उत्कृष्ट वाचनपद्धति तीच कीं, वाचलेल्या भागाचें रहस्य श्रोत्यांच्या मनांत तेव्हांच उतरावें ह्मणून सत्पुरुषांच्या गोष्टी वगैरे मुलांस वांचून दाखविणें त्या शिक्षकानें अशाच तऱ्हेनें वाचून दाखवाव्या; म्हणजे नीतिविषयक ज्ञान त्यांस होऊन चांगलें वाचन कोणतें ह्याचाही मासला त्यांना प्रत्यहीं कळेल. वर दर्शविलेल्या सत्पुरुषांच्या आयुष्यक्रमांत अनेक हृदयद्रावक गोष्टी घडून आल्या आहेत. परंतु मुलांचे स्वभाव सुधारून त्यांच्या वर्तनक्रमास योग्य वळण लावण्यासाठीं त्यांचा उपयोग करून घेणें असेल तर तशा प्रसंगांचें वर्णन शिक्षकानें मोठ्या हृदयाद्रावक रीतीनेंच केलें पाहिजे.

---

# प्रकरण ५ वें.

## शिक्षकांस शेवटचे दोन शब्द.

शिक्षकांच्या धंद्यांत कोणीं पडावें ?

शिक्षणाचे उद्देश कोणते आहेत, आणि ते तडीस नेण्यासाठीं कोणते उपाय अवश्य आहेत, ह्याविषयीं येथवर विवेचन झालें. शिक्षणासारख्या महत्त्वाच्या कामांत शिक्षकावर अतिशय मोठी जबाबदारी आहे, ही गोष्ट ह्या विवेचनावरून स्पष्टपणें ध्यानांत येईल, तथापि हुशार शिक्षकाला हा धंदा कधींही निरस वाटणार नाहीं. आपल्या उद्योगधंद्यांत आपणांस फारशी तसदी पडूं नये, अशी कित्येकांची इच्छा असते; असे लोक शिक्षकाच्या धंद्याकडे न वळतां दुसरा एकादा धंदा पतकरील, तर फार चांगलें. तथापि आपल्या आयुष्यक्रमांतील धंदा विचारपूर्वक, शांतपणानें आणि दीर्घ प्रयत्नानें बजावण्यास जे लोक तयार असतील, त्यांना हा शिक्षकाचा धंदा मोठा लोकोपयोगी वाटून ह्यांत मोठी मौज वाटेल. शिक्षकाचा धंदा अगदीं एकमार्गी आहे, अशी पुष्कळ लोकांची तक्रार ऐकूं येते. परंतु शाळांतून अभ्यासाचे जे विषय शिकवावयाचे असतात, तवढ्याचपुरता हा धंदा एकमार्गी वाटणार आहे. इतर कोणत्याही दृष्टीनें तसा वाटणार नाहीं. खरोखर पाहिलें असतां शाळेंतील शिक्षणक्रमांत किती तरी वैचित्र्य आहे. पहा. वर्गांत वीस पंचवीस मुलें असलीं तर त्या सर्वांच्या

आंगीं जिज्ञासा एकसारखी नसते; तीं कमजास्त मानानें अभ्याससंबंधानें निष्काळजी असतात; त्यांच्या पुष्कळ समजुती चुकीच्या असतात; आणि शिकविलेला विषय कित्येकांस चटकन समजतो, परंतु कित्येकांस त्याचा उमज पडण्यास फार काळ लागतो. तेव्हां अशा भिन्न भिन्न प्रकारच्या लहान मुलांच्या मानसिक शक्तींचा विकास करण्याचें काम हुशार शिक्षकाला दिवसेंदिवस मोठ्या मौजेचें वाटत जातें. लहानपणीं मुलें आत्मसंयमन आंगीं आणण्याविषयीं झटत असतात; परंतु कित्येक प्रसंगीं तीं अशीं कांहीं फसतात कीं, तेणें-करून शिक्षकास हसूं आल्याशिवाय राहणार नाहीं. केव्हां केव्हां ह्याप्रमाणें फसल्यामुळें विशेष अनिष्ट परिणाम घडतात. तसेंच हें आत्मसंयमन आंगीं आणण्याविषयीं मुलांचा परिश्रम सुरू असतां त्यांच्या मनोवृत्ति क्षणोक्षणीं बदलत असतात. क्षणांत तीं मोठीं उल्हासी दिसतात; क्षणांत मोठीं गंभीर दिसतात; आणि क्षणांत त्यांस राग येतो. तेव्हां ह्या नानाविध प्रकारांमुळें शिक्षकाचा आयुष्यक्रम कंटाळवाणा न होतां आनंददायक होतो. म्हणून हा धंदा करीत असतां, नेहमीं उठून तेंच तें काम करावें लागतें, अशा समजुतीनें तो आपणास कंटाळवाणा वाटूं लागल्यास आपल्याच शिक्षणपद्धतींत कांहीं व्यंग आहे असें आपण समजावें. सारांश, ह्या धंद्यांत शिक्षकास एक मोठा उन्नत हेतु सिद्धीस न्यावयाचा असतो, आणि त्याच्या हाताखालीं येणाऱ्या अनेक विद्यार्थ्यांचे स्वभावही भिन्न भिन्न प्रकारचे असतात. म्हणून हा धंदा कोणासही मिळमिळीत वाटण्याचें कारण नाहीं.

मुलांस **विद्या देणें** आणि त्यांस **चांगलें वळण लावणें**, ह्या दोहोंमध्यें शिक्षणाच्या सर्व उत्कृष्ट हेतूंचा समावेश होतो. हे दोन्ही हेतु शिक्षकांस साधावयाचे असतात म्हणून हे दोन्ही साध्य होणार नाहींत किंवा ह्यांतील एकच साध्य होईल, तर त्याचे परिश्रम व्यर्थ झाले असें समजावें. ह्या धंद्यांत खरोखर उत्कृष्ट नांव मिळविण्याची ज्याची इच्छा असेल त्यानें वरील दोन हेतु साध्य होतील, अशा धोरणानें शिक्षण दिलें पाहिजे. त्याचे हेतु इतके उदात्त नसतील तर त्याची योग्यता लागलीच कमी होईल. पगाराच्या मानानें शिकविण्याच्या कामीं मेहनत करावयाची, असा क्षुल्लक विचार एकाही चांगल्या शिक्षकाच्या मनांत यावयाचा नाहीं. मनुष्य कोणत्याही धंद्यांत पडेना; केवळ पगाराकडे दृष्टी देऊन तो काम करूं लागल्यास आपण होऊन आपली योग्यता त्यानें कमी केल्याप्रमाणें होईल.

शिक्षणाचे मुख्य दोन हेतु; व शिक्षकांनीं पगाराकडे विशेष लक्ष न ठेवण्याची अवश्यकता.

शिकविण्याबद्दल पैसा घ्यावा किंवा नाहीं, ह्यासंबंधानें प्राचीन तत्त्ववेत्त्यांत मोठा वादविवाद होत असे; व ह्या वादविवादावरून एक गोष्ट निर्विवाद ठरते. ती हीच कीं, शिक्षकाची योग्यता व सामर्थ्य वाढण्यास त्याच्या आंगीं द्रव्यदृष्टि मुळींच उपयोगी नाहीं; अशी प्राचीनकाळीं समजूत होती. ह्या तत्त्ववेत्त्यांनीं त्या काळीं ह्या प्रश्नासंबंधानें मोठ्या जोरानें व उत्सुकतेनें वादविवाद केला; इतकेंच नाहीं, तर ह्या कामीं त्यांनीं फाजील कळकळ दाखविली, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. तथापि ह्यावरून इतकें

स्पष्ट ठरतें कीं, त्यांनाही ह्या प्रश्नाचें महत्त्व अति वाटत होतें. हे लोक उघड उघड पाखंडी होते, व ह्यांच्या वर्तनामुळें लोकांची ह्या विषयासंबंधानें त्या काळीं चुकीची समजूत झाली होती; परंतु ती समजूत सांप्रत नष्ट झाली असल्यामुळें ह्या प्रश्नाची आपणांस पुनः सरळ दृष्टीनें चर्चा करण्यास हरकत नाहीं. हरएक मनुष्यानें कांहीं तरी उद्योगधंदा करून आपला चरितार्थ चालविणें हेंच त्यास भूषणास्पद आहे; असें आपण हल्लीं मानितों. मात्र केवळ चरितार्थ चालावा एवढ्याच हेतूनें धंदा चालविणें हें लाजिरवाणें आहे. ह्मणून कोणत्याही धंद्यांत मनुष्य पडला तरी त्याला पगार देणें अवश्य आहे, व ह्यांतच सर्व लोकांचा फायदा असून हा मार्ग हरएक दृष्टीनें श्रेयस्कर आहे. ही गोष्ट कबूल केली असतां असें निर्विवाद ठरतें कीं, चार लोकांत आपल्या पदवीस साजेल अशा रीतीनें राहतां येईल, इतका पगार शिक्षकांना दिला पाहिजे. शिक्षक लोकांच्या पगाराचें साधारणपणें मान एकाद्या देशांत फार कमी असेल तर त्यावरून दोन अनुमानें निघतातः—एक तर तेथील लोकांत असावा तितका जोम नाहीं, कारण जोम असेल तर ते शिक्षकांचा पगार वाढविण्याविषयीं चळवळ केल्याशिवाय राहणार नाहींत; किंवा दुसरें विद्येची वास्तविक योग्यता किती ह्याविषयीं यांनीं पुरता विचार केला नाहीं. अशा प्रकारचा दोष स्कॉटलंदांतील लोकांच्या माथ्यावरही आहे. तथापि त्या लोकांवरील हा दोष नाहींसा होण्याचा सुदैवानें हल्लीं संभव दिसत आहे. कारण शिक्षकांकडून उत्तम प्रकारें नौकरी होण्यास त्यांस भरपूर पगार देणें फार अग-

त्याचें आहे, हें तत्त्व त्या देशांतील स्कूलबोर्डांच्या ध्यानीं आलें आहे, असें आतां स्पष्ट दिसते. सारांश, उत्कृष्ट काम होण्यासाठीं पगारही चांगलाच दिला पाहिजे. शिक्षकांना चांगले पगार देण्याविषयीं स्कॉटलंदांतील निरनिराळ्या शहरांतील स्कूलबोर्डांत एक प्रकारची चढाओढ हल्लीं सुरू झाली असल्यामुळें परिणामीं फायदा झाल्याशिवाय राहणार नाहीं. हें ह्या विषयाचें एका दृष्टीनें विवेचन झालें. तथापि शिक्षकांनीं मात्र केवळ पगाराकडे नजर न ठेवितां त्याहून विशेष उदात्त विचार सर्वकाळ मनांत बाळगिला पाहिजे. उद्योगधंदा करून पोटाला मिळविणें, आणि केवळ पोट भरण्यासाठीं उद्योग धंदा करणें; ह्यांत फार अंतर आहे. श्रम केले असतां त्यांजबद्दल मजुरी मिळणें अवश्य आहे. परंतु कोणत्याही धंद्यांत जिवापाड मेहनत घेऊन सर्व आयुष्य घालविलें असतां त्याचें बक्षीस केवळ पैसाच मिळेल, तर तें क्षुल्लक समजावें. " वाजवी काम केलें असतां वाजवी मजुरी मिळाली पाहिजे, " हें तत्त्व निर्दोष असून त्याचा उपयोग कोणत्याही धंद्यांतील मनुष्यासंबंधानें करण्यास हरकत नाहीं. परंतु ह्या एकाच तत्त्वाच्या आधारानें कोणी चालेल तर त्यानें आपली योग्यता आपणच कमी करून घेतल्याप्रमाणें होईल; मग तो धनी असो कीं चाकर असो. एकाच्या दृष्टीनें वाजवी मजुरी ह्मणजे किती हें ठरवितांना बराच बांधा पडेल; तसेंच दुसऱ्याच्या दृष्टीनें वाजवी काम किती तें ठरवितांना बांधा पडेल. सारांश, " जशी देणावळ, तशी धुणावळ " हा नियम अगदीं न्यायाचा आहे असें लोक नेहमीं ह्मण-

तात; परंतु आपल्या धंद्यासंबंधानें ज्याचे विचार अगदीं कोते असतील, त्यालाच ह्या नियमाचा उपयोग लागणार आहे. आतां वाजवी काम ह्मणजे किती हें, तें काम करण्याकडे खर्चिलेल्या शारीरिक अथवा मानसिक शक्तीवरून प्राय: आपण ठरवितों; परंतु एवढ्यानेंच कांहीं त्याची खरी कल्पना होत नाहीं. कारण वरील तीन गोष्टींपेक्षां त्यांत बऱ्याच इतर गोष्टींचाही समावेश होतो. रोज उठून एकाच पद्धतीनें शिकविणारा शिक्षक मजुराप्रमाणें होय; व त्याच्या हातून वरील ह्मणींत दर्शविल्या प्रकारचें **वाजवी काम** खरोखर पाहिलें असतां व्हावयाचेंच नाहीं. ह्मणून कोणा तरी उत्कृष्ट शिक्षकाचें उदाहरण डोळ्यापुढें ठेवून त्याचें होईल तितकें अनुकरण करावयाचें, असा हेतु सर्व शिक्षकांनीं मनांत बाळगिला पाहिजे. शिक्षकाच्या पगारासंबंधानें येथें उल्लेख करण्याचें मुळींच कारण नव्हतें. परंतु ज्यास्त पगार मिळेल तरच काम चांगलें करावयाचें, असा पुष्कळ शिक्षकांचा ग्रह असतो; ह्यामुळें ह्या विषयाचा उल्लेख करणें भाग पडलें. " वाजवी काम केलें असतां वाजवी मजुरी मिळाली पाहिजे, " असें तत्त्व वर दर्शविलें आहे; आणि शाळांच्या परीक्षांच्या मानानें त्यांस ग्रांट म्हणजे मदत देण्याची **स्काट्लंदांत** व इतर कित्येक ठिकाणीं जी पद्धति हल्लीं सुरू आहे, ती ह्या तत्त्वालाच अनुसरून आहे. ही पद्धति रास्तच आहे, आणि एकाद्या सार्वजनिक मोठ्या खात्याची व्यवस्था राखण्याचे कामीं अशा पद्धतीचा उपयोग केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. परंतु अशा पद्धतीनें शाळांना मदत दिली असतां शिक्षणासंबंधीं

महत्त्वाच्या गोष्टीकडे मुळींच लक्ष न दिल्याप्रमाणें होतें. इतकेंच नाहीं, तर ह्या परीक्षांच्या गर्दींत त्या गोष्टीकडे लक्ष देण्याचा विचारही मनांत येण्याचा संभव नसतो. शाळेचा बंदोबस्त ठेवण्याची रीति कितीही दोषास्पद असली तरी ह्या परीक्षांमुळें ती नजरेस येण्याचा फारसा संभव नसतो. अशा पद्धतीमुळें शाळेंत विद्यार्थ्यांवर विशेष चांगल्या रीतीनें शिक्षकाला दाब मुळींच ठेवितां येणार नाहीं. कोणत्या शाळेला किती मदत द्यावयाची हें ठरविण्यासाठीं ह्या परीक्षा ठीक आहेत; ह्मणजे तेवढ्यापुरतींच परीक्षांचें महत्त्व आहे. ह्या पलीकडे परीक्षांना महत्त्व दिल्यास त्यापासून प्रत्यक्ष अनिष्ट परिणाम घडणार आहेत. परीक्षेच्या निकालाच्या मानानें शाळेस मदत देण्याचें *स्कॉट्लंदांत जी ही पद्धति सुरू झाली आहे, तीमुळें अनेक अनिष्ट परिणाम घडण्याचा संभव आहे, व ते तेथील शिक्षकवर्गालाच टाळितां येण्यासारखे आहेत. कोडांत दर्शविलेलें शिक्षण विद्यार्थ्यांस देणें शिक्षकांना भागच आहे; परंतु त्यापेक्षां विशेष श्रेष्ठ प्रकारचें शिक्षण ( नीतिशिक्षण ) ते देणार नाहींत, तर त्यांनीं आपण होऊन स्वतः-ची किंमत कमी केल्याप्रमाणें होईल. परीक्षकानें शाळेसंबंधानें अत्युत्कृष्ट रिपोर्ट केला असतां त्यावरून इतकेंच निष्पन्न होईल कीं, कोडाच्या दृष्टीनें शाळेचें काम उत्तम वठलें आहे; परंतु नीतिशिक्षणासंबंधानें शाळेची स्थिति कितीही शोचनीय असली तरी ह्या चांगल्या रिपोर्टामुळें

---

* आपल्या देशांतही खाजगी शाळांना ग्रांट देणें ती पूर्वी परीक्षेच्या निकालाच्या मानानेंच देत असत; परंतु आतां शाळेची इमारत शिक्षकांची योग्यता इत्यादि गोष्टीही विचारांत घेनात. ( भा.क.)

तो लोकांच्या ध्यानांत न येतां त्यांचा शाळेसंबंधानें चांगलाच ग्रह होईल. म्हणून शिक्षकानें कोडाप्रमाणें कामगिरी तर बजाविलीच पाहिजे; परंतु तेवढ्यावर स्वस्थ न राहतां कांहीं विशेष करामत करून दाखविण्याचा उद्देश बाळगिला पाहिजे. मुलांना लिहिण्यावाचण्यास व हिशेब वगैरे करण्यास शिकविलेंच पाहिजे; आणि या प्रत्येक विषयांत मुलांची गति झाली आहे किंवा नाहीं, हें परीक्षेच्या वेळीं नक्की पाहतां येण्यासारखें आहे. परंतु सुशिक्षित मुलांकडून सर्व राष्ट्राची भरभराट होण्याचे कामीं बरीच मदत झाली पाहिजे; ती मदत एवढ्याच शिक्षणानें होण्यासारखी नाहीं. हें वरिष्ठ प्रकारचें शिक्षण – नीतिशिक्षण-शाळांतून कितपत दिलें जात आहे, हें पाहण्याचीं साधनें शाळाखात्यांतील अधिकाऱ्यांस नाहींत. इतिहास, भूगोल, इत्यादि विषय अमुक इयत्तांतून अमुक झाले पाहिजेत, असें कोडांत ठरवितां येईल; व तितक्या मानानें ते झाले आहेत किंवा नाहींत, हें परीक्षेच्या वेळीं पाहतां येईल. परंतु मुलांच्या स्वभावांतून अमुक इयत्तांतून अमुक प्रमाणानें सुधारणा होत गेली पाहिजे, हें कोडांत ठरवितां येणार नाहीं; व त्याप्रमाणें सुधारणा होत आहे किंवा नाहीं हें परीक्षेच्या रूपानें पाहतांही येण्यासारखें नाहीं. ह्या नीतिशिक्षणापासून कित्येक इतक्या महत्त्वाचे परिणाम घडण्यासारखे असतात कीं, त्यांची किंमतही करितां यावयाची नाहीं. परंतु अशा परिणामामुळें शाळेच्या मदतींत एक कवडीचीही भर पडावयाची नाहीं. तथापि परीक्षकाला ह्याचा उल्लेख आपल्या रिपोर्टांत करितां आला नाहीं, तरी मुलांचे आईबाप अशा शिक्षकाची

किंमत जाणतील. तसेंच अशा शिक्षणासाठीं शाळांच्या रिपोर्टांत निराळें सदर शाळाखात्याला घालितां आलें नाहीं, तरी ह्या शिक्षणाची किंमत स्कूलबोर्डांतील सभासदांना चांगली कळेल.

शिक्षणामुळें देशांतील दुर्व्यसनें आणि गुन्हे कमी होत गेले पाहिजेत.

उत्कृष्ट उद्देश मनांत योजून कोणताही धंदा करणें ह्यांतच खरें भूषण आहे. ज्या कामाची मजुरीच ठरवितां येत नाहीं, त्याचा मोबदला पैशाहून अधिक योग्यतेचा मिळतो. "ऐषआरामाच्यामागें लागण्यापेक्षां उत्तम प्रकारचे नागरिक बनविणें हें कृत्य विशेष स्तुत्य आहे," असें प्लेटो ह्या प्राचीन तत्त्ववेत्त्याचें म्हणणें आहे. परंतु ख्रिस्ती धर्मांतील ह्या विषयासंबंधाचें शिक्षण ह्याहून उदात्त आहे. तें हेंच कीं, हर एक प्रकारचें नीतिशिक्षण मिळण्याचे कामीं इतरांस जो मदत देईल त्याचें ऋण द्रव्यद्वारा कधीं फिटावयाचें नाहीं. आतां ह्यासंबधानें सर्वांत उत्कृष्ट मदत शिक्षकांनाच देतां येणारी आहे, हें उघड आहे. शिक्षणाचा प्रसार राष्ट्रांत झाल्याशिवाय त्याची गणना प्रमुख राष्ट्रांत व्हावयाची नाहीं. राष्ट्राचा जोम कायम राखून त्याचें वर्चस्व कायम राखण्याची भिस्त मुलांच्या पालकांवर व शिक्षकांवरच राहते; कारण नवीन नवीन पिढ्यांतील मुलांच्या स्वभावांना योग्य वळण लावण्याचें काम ह्यांचेंच आहे. फ्रेंच व जर्मन लोकांची थोड्या वर्षांपूर्वी लढाई झाली व तींत जर्मन लोकांना जय मिळाला. त्या वेळीं लोक वारंवार ह्मणत कीं, हा जय मिळण्याचें आदिकारण शिक्षकच होत; कारण जर्मन सैन्यांत चांगल्या

सुशिक्षित लोकांचाच भरणा होता. इंग्लंदांत लष्करी व्यवस्था ठेवण्याची जी पद्धति सुरू आहे, तीमुळें असे हुशार लोक इंग्लिश सैन्यांत आढळण्याचा संभवच नाहीं. तथापि कोणत्याही राष्ट्राचें सामर्थ्य केवळ तेथील सैन्यावर अवलंबून नसतें; इतर अनेक गोष्टींवर तें अवलंबून असतें; व त्यांचा संबंध फार लांबवर पोहोंचतो. लोकांमध्यें अवश्य तितका उत्साह उत्पन्न होण्यास नुसती बुद्धिमत्ता पुरी पडत नाहीं; ह्या बुद्धिमत्तेचा पाया नीतितत्त्वांवर असेल तर त्या नीतितत्त्वांमुळेंच योग्य उत्साह लोकांमध्यें गुप्तपणें उत्पन्न होत असतो. एकादी लढाई होऊन तिच्यांत आपल्या सैन्यानें नांव गाजवून दाखवावें; अशी इच्छा धरण्यांत विशेष अर्थ नाहीं. परंतु आपल्या देशांतील शिक्षकांनीं इतकेंच करावें कीं, लोकांतील दुर्व्यसनें आणि गुन्हे दिवसेंदिवस कमी होत जातील, अशा धोरणानें शांतपणानें व दृढ निश्चयानें शिक्षण द्यावें. आपल्या सैन्यास लढाईंत जय मिळाल्यास आपणास आनंद होणें साहजिक आहे; परंतु ह्या आनंदापेक्षां सर्व समाजाचें पाऊल नीतिमार्गांत पुढें पडत जाईल तर तो आनंद विशेष महत्त्वाचा होय. आपले हाडवैरी आपल्याच घरांत आहेत. आपले जिवलग मित्रही आपल्यामध्येंच आहेत. ते कोणते म्हणाल तर लोकांचें बुद्धिसामर्थ्य आणि आत्मसंयमन वाढवून उत्कृष्ट रीतीनें आयुष्य घालविण्याची आवड त्यांच्या मनांत अधिकाधिक उत्पन्न करितात ते. अशा लोकांमध्यें आपल्या शिक्षकांचा नंबर बराच वर लागेल. तसेंच एकाद्या मुलावर शिक्षणाचा परिणाम कितपत झाला आहे हें आपण पाहूं,

तेव्हां नीतिदृष्ट्या त्यांच्यांत जी सुधारणा झाली असेल तीच सर्वोत्कृष्ट होय, हें आपण कधीं विसरूं नये. एकादा शिक्षक दरसाल आपल्या वर्गांतील बहुतेक मुलें परीक्षेस बसवीत असेल, व त्यांतील शेंकडा ९० किंवा अधिक सर्व विषयांत पास होत असतील, तर त्याचें अभिनंदन करणें योग्यच आहे. तथापि शिक्षकाचा हेतु याहून उदात्त असला पाहिजे. तो एवढाच कीं, त्यानें विद्यार्थ्यांस आत्मसंयमनाची इतकी सवय लाविली पाहिजे कीं, लहानपणीं शाळेंत व घरीं त्यांच्या वर्तनावर जो दाब असतो व त्यांस जी मदत मिळते, तो सर्व दाब व ती मदत मोठेपणीं अगदीं नाहींशी झाल्यानंतरही शहाणपणानें वागण्याचें सामर्थ्य त्यांच्या आंगीं यावें. अशा रीतीनें शिक्षण दिलें असतां विद्यार्थी मोठेपणीं असे वागतील कीं तेणेंकरून शिक्षकाच्या श्रमाचें सार्थक्य होऊन त्याजविषयीं लोकांच्या मनांत पूज्यबुद्धि उत्पन्न होईल. कारण, बऱ्याच वर्षांनीं कां होईना, शाळेंत उत्तम वळण लागल्यामुळें त्यांच्या वर्तनावर घडलेले परिणाम लोकांच्या दृष्टोत्पत्तीस येऊं लागतील. शिक्षणाचा अति उत्कृष्ट परिणाम हाच होय. शिक्षकानें शिक्षणाच्या कामीं काळजीपूर्वक जो विचार व जे परिश्रम केले असतील, त्यांचा पूर्ण मोबदला हाच होय. लहानपणीं बहुतेक प्रसंगीं नीतिमार्गाकडे ज्यांचीं मनें आपण वळविलीं, अशा आपल्या विद्यार्थ्यांवर शिक्षणाचा असा सुपरिणाम झाल्याचें शिक्षकास आढळून आलें असतां आपल्या स्वतःच्या सुवर्तनाचा हुबेहुब कित्ता विद्यार्थ्यांनीं गिरविला आहे असें त्याला दिसून येतें; व त्याला फार आनंद होतो.

---

# प्रकरण ६ वें.

## गृह-शिक्षण.

उत्तम गृहशिक्षणापासून फायदे.

मुलांच्या शिक्षणाचें सर्व काम शाळेंत पुरें होण्याजोगें नाहीं. शाळेंत त्यांना उत्तम वळण लागलें ह्मणजे तेवढ्यानेंच त्यांच्या शिक्षणाची पूर्तता होत नाहीं. मुलांमध्यें व्यक्तिविषयक गुणदोष कोणकोणते आहेत, ह्याचें पूर्ण ज्ञान त्यांच्या वडील माणसांसच असणार. ह्मणून नीतिशिक्षणाचा पूर्ण ठसा त्यांच्या मनावर बिंबविण्याचें काम घरींच झालें पाहिजे. ह्या कामीं आईबापांनीं मुलांना केव्हां धमकी व केव्हां उत्तेजन दिलें पाहिजे. त्यांस उत्तम शिक्षण देण्यासाठीं जे उपाय योजितां येण्यासारखे आहेत, त्यांमध्यें गृहशिक्षणाचा नंबर फार वर आहे; हें आईबापांनीं ध्यानांत ठेवावें; म्हणजेच ह्या शिक्षणाची खरी योग्यता त्यांस कळेल. हें शिक्षण मुलांस देऊं लागल्यावर आईबापांची लवकरच खातरी होईल कीं, ह्याचा महत्त्वाचा भाग ह्मटला ह्मणजे मुलांस नीतिमार्गानें जाण्याविषयीं वारंवार उत्तेजन देणें, हाच होय. कुमार्गापासून त्यांस परवृत्त करण्यासाठीं आणि अनिष्ट विचार ज्यांपासून उत्पन्न होतात, अशा मनोवृत्ति समूळ नाहींतशा करण्यासाठीं त्यांस धाकदपटशा दाखविणेंही अवश्य आहे. परंतु असा धाक क्वचित् दाखविला तरच त्यांत शहाणपण आहे. ज्याप्रमाणें

स्वच्छ सूर्यप्रकाश पडला असतां आनंद वाटून मनास हुशारी येते, त्याप्रमाणें चांगल्या गोष्टी करण्याविषयीं आईबापांनीं मुलांस वारंवार उत्तेजन दिलें असतां त्यांस हुशारी वाटते. ह्मणून त्यांना सन्मार्गास लावण्यासाठीं वडील माणसांनीं धाक फारसा दाखवूं नये. शाळेंत नंबर वगैरे न मिळाल्यामुळें मुलांस होणारें दुःख कमी करणें, आत्मसंयमनासाठीं तीं परिश्रम करीत असतां त्यांस मदत देणें, आणि अभ्यास करण्याविषयीं त्यांना उत्तेजन देऊन त्यांचीं मनें उल्हासी राहतील असें करणें, हे तीन उद्देश विचारपूर्वक गृहशिक्षण दिलें असतां साध्य होण्यासारखे आहेत. मात्र अशा रीतीनें गृहशिक्षण देतां येण्यास आईबापांनीं विचारपूर्वक फार परिश्रम केले पाहिजेत. शिक्षकांना स्वतः सुवर्तन ठेविल्याशिवाय मुलांस चांगली शिस्त लावितां यावयाची नाहीं; व तोच नियम आईबापांनाही अक्षरशः लागू आहे.

शाळेंतील शिक्षणक्रमास अडथळा येणार नाहीं, अशा रीतीनें मुलांची घरची व्यवस्था ठेविली पाहिजे.

लहान मुलांस चांगलें वळण लावण्यासाठीं उपाय योजितांना एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे. ती हीच कीं, मुलांचे शाळेंतील अभ्यास आणि त्यांची घरची व्यवस्था हीं सुयंत्र चाललीं पाहिजेत; ह्मणजे कोणत्याही एका गोष्टीमुळें दुसरीस व्यत्यय येऊं नये. मुलांची घरची व्यवस्था कशी काय ठेवावी, ह्यासंबंधानें आईबापांनीं शिक्षकाची सल्लामसलत घेतली असतां आणखी एक फायदा होतो; तो हाच कीं, येणेंकरून मुलांच्या मनांत गुरूविषयीं पूज्यबुद्धि वृद्धिंगत होते. ही

पूज्यबुद्धि वाढविण्याची जबाबदारी मातापितरांवर असल्यामुळें तें काम अशा रीतीनें आयतेंच होतें. परंतु एवढें केलें म्हणजे ह्या संबंधाचें आईबापांचें कर्तव्य पुरें झालें नाहीं. शिक्षक आणि आईबाप ह्यांजमध्यें सलोख्याचें दळणवळण पाहिजे, तें एवढ्यापुरतेंच नव्हे. मुलांची घरची व्यवस्था लावावयाची ती त्यांच्या शाळेंतील अभ्यासाला जितकी जुळती लावितां येईल, तितकी लाविली पाहिजे. ह्या दोहोंमध्यें विरोध तेव्हांच उत्पन्न होण्यासारखा असतो. घरची व शाळेंतील व्यवस्था उत्तम प्रकारें ठेवण्याचा मुख्य हेतु एवढाच आहे कीं, शिक्षणाचा मुलांच्या मनावर चांगला परिणाम व्हावा. असा इष्ट परिणाम होण्यास ह्या दोन्ही व्यवस्था उत्तम असल्याच पाहिजेत. शाळेंतील शिक्षणामुळें मुलांचें बुद्धिसामर्थ्य वाढत जाऊन त्यांची नीतिदृष्टयाही पूर्ण सुधारणा होत जावी, असा आपला हेतु असतो. परंतु त्या शिक्षणाला गृहशिक्षणाचें पाठबळ नसेल तर हा हेतु सिद्धीस जाणार नाहीं.

शाळेंतील अभ्यासासंबधानें घरच्या वडील माणसांवर पडणारी जबाबदारी.

वराहून करून आणण्यासाठीं शिक्षकानें शाळेंत मुलांना किती अभ्यास नेमून द्यावे ह्या प्रश्नाचा, व मुलांना शिक्षक भाराभर अभ्यास नेमून देतात, अशी आईबापांची जी नेहमीं ओरड असते, तिचाही विचार एथें ओघानेंच येता घरचीं माणसें म्हणतात कीं, मुलांचा सगळा दिवस शाळेंत अभ्यासाकडे जातो; आणि घरीं आल्यावर संध्याकाळचा वेळही दुसऱ्या दिवसाचे अभ्यास करण्याकडे जातो.

तसेंच आरंभीं आरंभीं मुलें ताजींतवानीं असतात, तेव्हां-चा त्यांचा वेळ शाळेंत जातो; त्यामुळें शिक्षकाला फार-सा त्रास पोहोंचत नाहीं; परंतु संध्याकाळीं तीं घरीं ये-तात, तेव्हां अगदीं कंटाळून गेलेलीं असतात. ह्मणून क्षुल्लक कारणानेंही तीं संतापून जातात; व अभ्यास करण्याकडे त्यांचें फारसें लक्ष लागत नाहीं. ह्यामुळें घरीं आईबापांना अनेक प्रकारें मुलांकडून त्रास पोहोंचतो. तेव्हां मुलांचा अभ्यासाचा त्रास कमी करून तेणेंकरून पर्यायानें आईबापांचाही त्रास कसा वांचवितां येईल, ह्याचा विचार करणें अवश्य आहे. हा त्रास कमी करण्याची मुख्य जबाबदारी शिक्षकावरच आहे. कारण त्याचें कर्तव्य कांहीं नुसतें अभ्यास ह्मणून घेण्याचें नाहीं; किंवा घरांहून करून आणण्यासाठीं भाराभर अभ्यास नेमून देण्याचेंही नाहीं. ह्याचा उल्लेख मागेंही आ-लेलाच आहे. मुलांचें वय आणि त्यांची अभ्यासांतील प्रगति हीं ध्यानांत आणून त्यांना घरचा अभ्यास किती देणें वाजवी आहे, हें त्यानें विचारपूर्वक दररोज ठरविलें पाहिजे. ही शिक्षकाची गोष्ट झाली. तथापि घरच्या माणसांवरही ह्यासंबंधानें एक मोठी जबाबदारी आहे. शाळेंत मुलांचे अभ्यास कितीही झाले, तरी आईबापांची तृप्ति होत नाहीं. त्यांना वाटतें कीं एकाद्या पुस्तकाचीं जितकीं जास्त पानें शाळेंत शिकविलीं जातील तितका मुलांचा अभ्यास चांगला होतो. परंतु ही समजूत चुकी-ची आहे. कारण एकाद्या पुस्तकाचीं पुष्कळ पानें शिक-विलीं ह्मणजे शिक्षण जास्त झालें असें नाहीं. तो विषय मुलांना थोडा शिकविला तरी चालेल; परंतु शिकविलेल्या

भागाचें पूर्ण ज्ञान झालें पाहिजे. म्हणून अभ्यास बेताबातानें झाले तरी त्याविषयीं कुरकूर करावयाची नाहीं, असा संकल्प आईबापांनीं केला पाहिजे. एकाद्या शाळेंत इतर सर्व शाळांपेक्षां वाचनपुस्तकाचीं जास्त पानें होत असलीं, किंवा इतर शाळांपेक्षां अधिक विषयांचें शिक्षण तेथें मिळत असलें तर तेवढ्यावरून त्या शाळेंत फारच उत्तम अभ्यास चालतात, असें मानणें मोठें चुकीचें होय. मुलांना जें शिक्षण द्यावयाचें तें त्यांस मौजेचें वाटेल, त्यांना त्याचा सहज उमज पडेल, व तेणेंकरून त्यांच्या आंगीं आत्मसंयमनशक्ति येईल; तरच त्यांची अभ्यासांत प्रगति होत आहे, असें समजावें. शिक्षणाची मौज वाटण्यासाठीं त्यांत विषयवैचित्र्य पाहिजे; विषयाचा उमज पडण्यासाठीं मुलांना स्वतःची बुद्धि चालविण्याची सवय लाविली पाहिजे; आणि त्यांच्या आंगीं आत्मसंयमनशक्ति येण्यासाठीं फाजील अभ्यास त्यांस कधीं न देण्याविषयीं जपलें पाहिजे. आपण त्यांना फाजील अभ्यास दिल्यास तीं त्रासून जाऊन त्यांचें मन त्यांच्या ताब्यांत राहीनासें होतें. असें झाल्यास त्याचा बोल मुलांकडे काय? तेव्हां ह्या सर्व गोष्टी आईबाप व शिक्षक ह्या उभयतांनींही नेहमीं ध्यानांत बाळगणें अवश्य आहे.

मुलांच्या अभ्यासाचें ओझें घरच्या मंडळींनें होईल तितकें हलकें करण्याची आवश्यकता.

तथापि घरच्या अभ्यासांची व्यवस्था आईबापांनींच कोणत्या तरी उपायांनीं लावणें अवश्य आहे. अति अभ्यास दिले असतां बहुतेक विद्यार्थ्यांना फार त्रास पोहोंचतो, ह्मणून योग्य उपायांनीं हें ओझें

होईल तितकें हलकें करणें इष्ट आहे. मुलें शाळेंतून घरीं आल्यानंतर तास अर्धातास खेळ, पुढें तास अर्धातास अभ्यास, पुन्हा थोडा खेळ; असा क्रम आळीपाळीनें विचारपूर्वक ठरविल्यास फार फायदा होईल. मुलांना आपण मोकळें मात्र सोडावें, कीं तीं बहुतेक आपापली करमणूक तेव्हांच करून घेतात. तथापि कित्येक मुलांच्या संबंधानें—विशेषतः व्यायाम वगैरे गोष्टींची ज्यांना फारशी हौस नाहीं अशा मुलांच्या संबंधानें—थोडीबहुत कल्पना आईबापांनीं लढविली पाहिजे. कोणत्या तरी प्रकारचा शारीरिक व्यायाम, मिळेल तितकी मोकळी हवा आणि साधारणपणें उल्हासवृत्ति, ह्या तीन गोष्टींची मुलांना अति आवश्यकता आहे. खेळाचा वेळ त्यांना आनंदांत व स्वच्छंदपणें घालवूं द्या; ह्या वेळांत त्यांजवर होतां होई तों मुळींच दाब ठेवूं नका. असें करणें अगदीं सुलभ आहे खरें; परंतु तसें करण्याविषयीं पक्का निश्चय ठेवून त्यांत तिळमात्र ढळूं नका. आतां आणखी एका प्रश्नाचा विचार केला पाहिजे. तो असा कीं, मुलाला थकवा आला, व अभ्यास करण्याचा त्याचा हुरूप कमी झाला, आणि धडे तर अर्धवटच झालेले असले, तर काय करावें? मुलांच्या अभ्यासावर देखरेख ठेवणारांनीं विद्यार्थ्यांच्या ह्या स्थितीकडे नेहमीं लक्ष ठेविलें पाहिजे. मुलांना अभ्यासाचा कंटाळा आला असतां आईबापांनीं किंवा इतर पालकांनीं त्यांचें लक्ष एकाद्या नवीन गमतीच्या विषयाकडे लावावें; ह्मणजे त्यांचा कंटाळा व कुरकूर नाहींशी होऊन पुढें तासभर तीं चांगल्या रीतीनें अभ्यास करितील. लहान मुलांचा कंटाळा घालविण्यासाठीं

काय उपाय योजावे, ह्याचें ज्ञान त्यांच्या अभ्यासावर नजर ठेवणारांच्या आंगीं फार अवश्य आहे. ह्याप्रमाणें मुलांना आलेला कंटाळा घालविणें अवश्य आहे खरें. तथापि अभ्यासाच्या कामीं कितीही अडचणी आल्या तरी तो केल्याशिवाय सुटका नाहीं, व त्या अडचणी अजी कधीं टाळितां यावयाच्या नाहींत; अशी विद्यार्थ्यांची नेहमीं समजूत करून दिली पाहिजे.

बोर्डिंग स्कुलांचे उद्देश व उपयोग.

मुलांची शाळेंतील व्यवस्था आणि घरची व्यवस्था ह्या एकमेकींस जुळत्या राहतील अशा ठेवणें फार कठीण आहे; व हें काम चांगल्या रीतीनें सिद्धीस जावें, ह्मणूनच बोर्डिंग स्कुलांची स्थापना अलीकडे होऊं लागली आहे. तेव्हां अशा स्कुलांतून विशेष लक्ष कोणत्या गोष्टीकडे दिलें पाहिजे, ह्याचा विचार येथें ओघानेंच येतो. ह्या स्कुलांपासून शिक्षणसंबंधीं कामांत अति महत्त्वाचा उपयोग होतो खरा; परंतु हीं स्कुलें चांगल्या रीतीनें चालविण्यासही अनेक अडचणी येतात. शाळेंत उत्तम वळण मुलांस लागावें, म्हणून विशेष कडक नियमांची योजना शिक्षकास करावी लागते; परंतु घरचे अभ्यास व घरचीं इतर कामें मुलांकडून करवीत असतां आईबाप त्यांना बरीच सवलत देतात. सारांश, शाळेंतील विषय फार कडक व घरचे बरेच सवलतीचे असतात. म्हणूत बोर्डिंग स्कुलांतील व्यवस्था अशा प्रकारें ठेविली पाहिजे कीं, तेथें आईबापांच्या देखरेखीखालीं होणारें गृहशिक्षण व शाळेंतील शिक्षण हीं दोन्ही नीट रीतीनें चालतील. अशी व्यवस्था ठेवितां येण्यास ह्या

स्कुलांवरील व्यवस्थापकांच्या आंगीं विलक्षण आत्मसंयमन असलें पाहिजे; व मुलांना वळण लावण्याचें चातुर्य ज्याच्या आंगीं असेल त्यालाच हें काम फार चांगलें साधेल. मुलांची घरची व्यवस्था त्यांना सुखकारक होईल अशी ठेवितां येऊन वर्गांतही त्यांच्यावर चांगला दाब ठेवितां येणें, ही एक प्रकारची देणगीच होय; व असाच मनुष्य बोर्डिंग स्कुलांवरील व्यवस्थापकाच्या जागीं नेमिला पाहिजे. अशी देणगी ज्याला असेल तो मुलांना विशेष कडक रीतीनें वागविणार नाहीं; कोणत्या मुलाला कोणती गोष्ट आवडते इकडे लक्ष ठेवून त्या धोरणानें त्याला वागवील; कोणत्याही मुलाचें मन न दुखवितां प्रत्येकास चांगली मदत व्हावी म्हणून त्याच्याशीं नेहमीं उल्हासवृत्तीनें व विनोदानें वागेल; आणि मुलांना वेळोवेळीं अडचणी येतील तेव्हां त्यांजविषयीं खरी कळकळ दाखवील.

मुलांकडून घरीं अभ्यास करविणें ते काळजीपूर्वक करविले पाहिजेत; अर्धवट करवून उपयोग नाहीं.

आतां गृहशिक्षणासंबंधानें आईबापांचें कर्तव्य काय त्याजकडे पुन्हा वळूं. मुलें जे अभ्यास घरीं करितात ते पक्के करविण्याकडे आईबापांनीं फार लक्ष दिलें पाहिजे. त्यांना निष्काळजीपणानें अभ्यास करूं दिले असतां अति नुकसान आहे. हें नुकसान होऊं देणें नसेल तर आईबापांनीं फार परिश्रम केले पाहिजेत. आतां असे परिश्रम करणें ते मुलें शाळेंत जाऊं लागतात तेव्हांपासूनच करणें इष्ट आहे; कारण त्यांना बऱ्यावाईट सवयी लागण्याचा काळ तोच होय. मुलांना घरीं

नेमून दिलेले धडे केव्हां केव्हां फार कठीण असतात. अशा प्रसंगीं ते धडे तयार कारितांना मुलें गांगरून जाणार नाहींत, अशी व्यवस्था आईबापांनीं विचारपूर्वक केली पाहिजे; व त्यांना प्रत्यक्षही थोडीबहुत मदत मिळण्याची तजवीज केली पाहिजे; कित्येक मुलांना अभ्यासाची स्वभावतःच मौज वाटून धडे करण्यांत त्यांचें मन नेहमीं चूर असतें. अशा मुलांवर नजर ठेवण्याची किंवा त्यांच्या क्रमांत ढवळाढवळ करण्याची आईबापांना जरूर नाहीं. तथापि कित्येक मुलांना अभ्यासाचा त्रास वाटून तो तयार करण्याचें काम चेंगटपणाचें वाटतें. अशा मुलांना घरीं कोणी मार्गदर्शक लागतो. ही मदत मुलांस देण्याचा अगदीं उघड व अत्युत्तम मार्ग एकच आहे. तो असा कीं, आईबापांनीं [ किंवा शिक्षकांनीं ] मुलांबरोबर स्वतः मूल होऊन त्यांजबरोबर धडे तयार करण्यास लागावें. मुलांचे धडे नुसते तोंडपाठ म्हणवून घेणें हें ज्याप्रमाणें शाळेंत फायदेशीर नाहीं त्याप्रमाणें घरींही फायदेशीर नाहीं. आपणास विषयाचें ज्ञान मुळींच झालेलें नाही हें मुलाला पक्कें कळत असतें; व धडे पोपटाप्रमाणें म्हणवून घेत असतां आईबापांच्याही हें ध्यानांत येण्याचा संभव आहे; परंतु नुसतें ध्यानांत येऊन उपयोग काय ? सर्वांत उत्कृष्ट प्रकारची देखरेख म्हटली ह्मणजे तींत पुढील गोष्टींचा समावेश होतो. लहानपणापासून मुलें धडे कोणत्या प्रकारें करितात इकडे बारकाईनें लक्ष ठेवणें; त्यांची स्मरणशक्ति वाढत जाईल अशा प्रकारच्या सूचना त्यांना देणें; त्यांची बुद्धि वाढत जाईल अशा रीतीनें कोणत्याही गोष्टीची समजूत घालून

देणें; आणि ज्या विषयाचें ज्ञान त्यांस मिळवावयाचें असेल तें मिळविण्याचा मार्ग त्यांना दाखविणें. इतक्या प्रकारें मुलांना मदत करणें हें प्रथमदर्शनीं त्रासदायक व अगदीं अप्रयोकपणाचें वाटेल. परंतु अशा प्रकारें नजर ठेविल्यानें कार्यभाग खातरीनें होणारा असल्यामुळें अनुभवांतीं हें फार सुलभ वाटेल.

गृहशिक्षणाचा विशेष महत्त्वाचा भाग.

शाळेंत नेमून दिलेले धडे मुलांकडून करविले, आणि त्यांची घरची व्यवस्था शाळेंतील व्यवस्थेशीं जुळती राहील अशी ठेविली, ह्मणजे गृहशिक्षण संपलें असें नाहीं. गृहशिक्षणाचा ह्याहून महत्त्वाचा व मोठा भाग पुढेंच आहे. मुलांची मानासिक आणि शारीरिक शक्ति उत्तरोत्तर वाढत जाईल अशा प्रकारें त्यांस उत्तेजन देऊन त्यांच्या आयुष्यक्रमास उत्तम वळण लावण्याचें सामर्थ्य एकंदरीनें आईबापांच्या आंगीं कितपत असतें, हें पुढील विवेचनावरून चांगलें ध्यानांत येईल. मुलांस उत्तम वळण लावण्यासाठीं हरएक उपाय योजणें ते त्यांची सर्व स्थिति विचारपूर्वक ध्यानांत आणून दृढ निश्चयानें योजिले पाहिजेत. मुलांच्या करमणुकीसाठीं उपाय योजणें ते बेताबातानेंच योजिले पाहिजेत. खेळण्याच्या संबंधानें त्यांजवर थोडाबहुत दाब असला पाहिजे; परंतु हा दाब फाजील झाला असतां त्यापासून नुकसान आहे. पिंजऱ्यांतील पोपटाप्रमाणें मुलांना सदा सर्वकाळ दाबांत ठेवणें इष्ट नाहीं. तथापि मुलांनीं कोणते खेळ खेळावे, कोणते खेळूं नयेत; तसेंच खेळण्याकडे त्यांनीं किती वेळ

खर्च करावा, हें आईबापांनीं ठरवून देणें अवश्य आहे. आपल्या स्वतःच्या करमणुकीची व्यवस्था लावण्याचें सामर्थ्य मुलांच्या आंगीं आलें, आणि ह्या संबंधानें आत्मसंयमन केव्हां करणें अवश्य आहे, हें त्यांना कळूं लागलें, ह्मणजे मोठेंच काम झालें. साधारणपणें मुलांनीं नेहमीं मुख्य उद्देश असा बाळगिला पाहिजे कीं, खरी गोष्ट कबूल करण्यास अगदीं मागें पुढें पहावयाचें नाहीं. **खरी गोष्ट कबूल करण्यास** माणसाच्या आंगीं एक प्रकारचें **बरेंच धैर्य लागतें.** परंतु आईबापांच्या वजनामुळें असें धैर्य मुलांच्या आंगीं आलें पाहिजे; व हें त्यांच्या आंगीं जितकें अधिक येईल तितकें त्यांजवर आईबापांचें चांगलें वजन आहे असें ठरेल. मुलांवर अधिकारांचा जोर तर असलाच पाहिजे; परंतु नुसत्या अधिकाराच्या जोरावर सर्व भिस्त टाकिल्यास फार नुकसान आहे. अधिकार कोठपर्यंत बजावावा, ह्याचा निर्णय आईबापांनीं आपल्याच मनाशीं विचारानें ठरविला पाहिजे. तसेंच मूल शांत होऊन वृत्तीवर आलें ह्मणजे त्यालाही वाटलें पाहिजे कीं, असा अधिकार बजावणें त्या प्रसंगीं रास्तच होतें. मुलांचा कल प्रायः लहर लागेल त्याप्रमाणें वागण्याकडे असतो; परंतु तसें न करितां विचारपूर्वक वागण्याचा नियम त्यांनीं ठरविला पाहिजे. असा नियम करणें महत् प्रयासाचें असून हें क्षणांत साध्य होण्याजोगें नाहीं. तथापि असा प्रयत्न लहानपणापासूनच आईबापांच्या देखरेखीखालीं त्यांनीं सुरू केला पाहिजे. तसेंच आईबापांनीं मुलांवर अधिकार चालविणें तो त्यांजविषयीं कळकळ बाळगून विचारपूर्वक चालविला असतां मुलांना

असा नियम करण्यास फार मदत होईल. मुलाला कोण-कोणत्या अडचणी येण्याचा संभव आहे त्या योग्य रीतीनें लक्षांत आणून त्या संबंधानें त्याला अवश्य ती मदत देण्यास हरकत नाहीं; परंतु त्याला आपल्याच तंत्रानें वागूं देऊन उपयोग नाहीं. सारांश, आईबाप व मुलें ह्यांमध्यें योग्य प्रकारचा संबंध राहणें फार नाजूक व अवघड काम आहे; आणि ह्या उभयतांकडून ह्या बाबतींत किंचितही प्रमाद घडूं नये अशी इच्छा असेल तर घरांतील एकंदर राहाणी अगदीं निर्दोष असली पाहिजे. आपण सर्व ज्या भूगोलावर राहतों त्यासभोंवतीं ज्याप्रमाणें सर्वत्र वातावरण आपणांस भासतें; त्याप्रमाणें हरएक घरगुती गोष्टींत नीतितत्त्वांचें व धर्मतत्त्वांचें वर्चस्व भासलें पाहिजे. कोणत्याही प्रकरणीं अखेरचा न्याय जाणण्याची सर्वांस आवश्यकता आहे. खरोखर सत्य गोष्ट कोणती हें जाणण्याची सर्वांस अवश्यकता आहे; आणि ज्याच्या अधिकाराविषयीं तिळमात्र शंका घेण्यास जागा नाहीं, असाही कोणी नियंता सर्वांस पाहिजे आहे. ह्यांतील पहिल्या दोन गोष्टींचा निर्णय नीतिशास्त्राच्या नियमांवरून ठरेल; आणि तिसऱ्या गोष्टींत दर्शविलेल्या प्रकारचा नियंता म्हटला म्हणजे प्राणिमात्रावर न्यायानें व दयार्द्रदृष्टीनें अधिकार चालविणारा जो ईश्वर तोच होय. ईश्वराची आज्ञा पाळणें आईबाप व मुलें ह्या उभयतांसही अवश्य आहे. म्हणून त्याचें श्रेष्टत्व उभयतांसही सारखेंच आहे. तेव्हां सर्व सत्ताधीश जो ईश्वर त्याची आज्ञा पाळण्यास मुलांना आईबापांनीं नेहमीं भाग पाडावें. ह्या कामीं त्यांनीं आपल्या अधि-

काराचा उपयोग केला असतां फार फायदा होईल. वर दर्शविल्या प्रकारें मुलांवर घरीं दाब ठेविला असतां मुलें बिघडण्याची अगदीं भीति राहत नाहीं; व घरांत शांतता राहते. कारण अशा रीतीनें घरची व्यवस्था ठेविली असतां, आतां एक विचार घटकनें एक विचार, अशी माणसाची चंचलवृत्ति राहत नाहीं. तसेंच क्षणांत राग, क्षणांत शांति, असाही प्रकार घडत नाहीं. मुलांविषयीं ममता आईबापांच्या अंतःकरणांत स्वभावतःच असते; परंतु तिच्या अनुरोधानें नेहमीं न चालतां ममता करण्याचा कांहीं स्पष्ट नियम त्यांनीं ठरविला पाहिजे. मुलांवर ममता असली ह्मणजे सर्व काम साधतें, अशी लोकांची साधारण समजूत आहे; परंतु ती केवळ भ्रांतिमूलक आहे. मुलांवर ममता असल्यामुळें त्यांचें बरें व्हावें, अशी आईबापांची इच्छा असते, हें खरें आहे. परंतु त्यांचें बरें कशांत आहे, हें विचारानेंच ठरविलें पाहिजे. ममता म्हणजे कांही क्षुल्लक मनोवृत्ति नसून फार महत्त्वाची आहे. **लाड** निराळे आणि **ममता** निराळी. म्हणून उठल्या बसल्या ममता न करितां योग्य प्रसंगींच केली पाहिजे. कारण ममता केव्हां करावी, केव्हां न करावी; अशाविषयींही कांहीं नियम आहेत. अव्यवस्थित रीतीनें किंवा अयोग्य रीतीनें मुलांवर ममता केली असतां, त्यांचें हित व्हावें अशी आपली इच्छा असली तरी, अहितच होतें. सर्वशक्तिमान् ईश्वराविषयीं पूज्यबुद्धि मनांत बाळगून विचारपूर्वक ममता करणें, हाच मानवी स्वभावांतील खरा उत्कृष्ट गुण होय. ह्मणून गृहकृत्यांत ह्या नियमानें वागणें अति वि-

चाराचें व हितकारक आहे. अशा रीतीनें ममता केली असतां आईबाप हे आपले स्नेही सोबतीच आहेत कीं काय, असें मुलांस वाटूं लागेल; आणि त्यांचें वजन मुलांवर गुप्त रीतीनें पडून मुलांच्या आंगीं अनेक सद्गुण येतील; व ह्या सद्गुणांच्या योगानें मोठेपणीं स्त्रीपुरुषांस शोभतील अशीं कृत्यें करण्याचें सामर्थ्य त्यांचे आंगीं येईल.

जेवणेंखाणें सुरू असतां मुलांस पुष्कळ शिक्षण देतां येतें.

मुलांस उत्कृष्ट गृहशिक्षण मिळण्याचें मुख्य साधन आईबापांचें त्यांजवर नेहमीं असणारें वजनच होय. तथापि घरची मंडळी भोजनास* बसते त्यावेळीं तर अति महत्त्वाचें शिक्षण मुलांस देण्यास फार चांगली संधी मिळते. भोजनाच्या वेळीं सर्व मंडळी एकत्र जमते, तेव्हां सर्वांस मन मोकळें करून बोलतां येतें; वडील, लहान, वगैरे भेदाभेद तेथें नसतो. तसेंच मनुष्याच्या आयुष्यक्रमासंबंधीं अनेक गोष्टींचा तेव्हां ओघानेंच तेथें खल होतो; आणि शिक्षण देण्याची उत्कृष्ट संधी अनेक वेळां प्राप्त होते. उत्तम रीतीनें शिकवितां येण्यास शिकविणाराचे आंगीं मुख्य गुण पाहिजे, तो हाच कीं, आपण मोठे विद्वान् आणि विद्यार्थी फार कमी, अ-

---

* आपल्या इकडील गृहस्थितीस हें वर्णन जुळणार नाहीं. मुलांशीं जेवणाच्या वेळीं मुळींच बोलावयाचें नाहीं, असा प्रघात बहुधा आपल्या कुटुंबांतून आढळतो. मुलें बोलूं लागलीं असतां त्यांस वडील माणसें रागें भरतात, व मुकाट्यानें जेवण्यास सांगतात. **बालोद्यानपद्धति, वस्तुदर्शनपाठ** इत्यादि पाश्चात्य गोष्टींचें अनुकरण इष्ट असेल, तर ह्यासंबंधानें करणेंही अवश्य आहे. (भा.क.)

सा भाव त्याचे ठिकाणीं मुळींच नसावा. तशी स्थिति भोजनाच्या प्रसंगीं असते; ह्मणजे आपण सर्व सारखीं आहों असें तेव्हां सर्वांस वाटत असतें; सर्वजण मोकळ्या मनानें बोलत असल्यामुळें प्रत्येकाच्या मनोवृत्ति व स्वभाव काय आहेत, हें स्पष्ट कळण्यास तेव्हां मार्ग असतो; आपल्या कित्येक शंकांचें निरसन दुसऱ्यांकडून होत असतें; ह्या संभाषणामुळें आपणास जास्त विचार करण्यास पक्की खातरी करून घेण्यास संधी मिळते; आणि असें संभाषण भोजन संपेपर्यंत सुरू असल्यामुळें फार फायदा होतो. तसेंच शिक्षक शाळेंत प्रत्यक्ष शिकवितात, तेव्हां जो एक प्रकारचा दाब मुलांच्या मनावर असतो तो भोजनाच्या प्रसंगीं मुळींच नसतो. सारांश, भोजनसमयीं शिक्षण फार उत्कृष्ट रीतीनें देतां येईल. कित्येकांस ही गोष्ट खरी वाटणार नाहीं. तथापि त्यावरून इतकेंच निष्पन्न होईल कीं, अप्रत्यक्ष रीतीनें फारसें शिक्षण देतां यावयाचें नाहीं, अशी त्याची समजूत असली पाहिजे. तसेंच त्यांची अशीही समजूत असली पाहिजे कीं, पंतोजी शाळेंत जें कांहीं शिकवितो तितकेंच मुलें शिकतात. तथापि ह्या समजुती अगदीं चुकीच्या आहेत. वस्तुस्थिति अगदीं भिन्न आहे. आपण प्रत्यक्ष शिकत आहों असें तर मुलांस वाटूं नये; परंतु त्यांस शिक्षण तर मिळत असावें; व अशा रीतीनें मिळेल तेंच सर्वोत्कृष्ट शिक्षण होय. एकादा सोबती एकाद्या पराक्रमाचें वर्णन करितो, किंवा एकाद्या भावी आनंदकारक प्रसंगाचें चित्र आपल्या समोर काढितो, तेव्हां त्याची आपल्यावर किती छाप बसते! एकादा खेळ कि-

त्येक न्यायानें खेळतात, व कित्येक दुसऱ्याला फसवून आपला डाव साधितात. अशा खेळांच्या संबंधानें किंवा शर्यती, कुस्त्या वगैरे इतर चढाओढीच्या गोष्टींसंबंधानें चर्चा सुरू असतां लहान मुलांना मोठी मौज वाटते! अशा प्रसंगींही नीतिविषयक सर्व प्रश्नांची वाटाघाट होऊन अनेक नवीन नवीन विषय वादविवादास उत्पन्न होतात. म्हणून शाळेंतील शिक्षणाशिवाय मुलांना जें दररोज थोडेंबहुत जास्त शिक्षण द्यावयाचें असेल, तें आईबापांनीं भोजनाच्या वेळींच दिलें पाहिजे. कारण गृहशिक्षण देण्यास ह्याहून उत्कृष्ट संधी शोधूं लागल्यास केव्हांही सांपडावयाची नाहीं. ज्या गोष्टी मुलांच्या नजरेस प्रत्यक्ष पडतात, त्यांजबद्दल त्यांना आईबापांनीं पूर्णपणें माहिती करून दिली पाहिज. त्याचप्रमाणें त्यांनीं आपल्या आयुष्यक्रमांतील अति महत्त्वाच्या गोष्टी मुलांना मोकळ्या मनानें सांगाव्या. आईबाप वडील असल्यामुळें मुलांपेक्षां त्यांच्या आयुष्यक्रमांत विशेष महत्त्वाच्या गोष्टी घडलेल्या असतात. म्हणून त्यांनीं आपल्या आयुष्यांतील ज्या गोष्टी मुलांस महत्त्वाच्या वाटण्यासारख्या असतील, त्यांचा संबंध त्यांच्या आयुष्यक्रमाशीं नीट लावून दिला पाहिजे. भोजन सुरू असतां अनेक प्रकारच्या विषयांवर चर्चा झाली पाहिजे. ते विषय मोजके असून उपयोग नाहीं. सार्वजनिक विषयांत मुलांना कांहीं मौज वाटणार नाहीं, अशी पुष्कळ लोकांची समजूत असते; मात्र ते उघड असें बोलून दाखवीत नाहींत. तथापि ही त्यांची मोठी चूक होय. सर्वांशीं ज्या गोष्टींचा संबंध पोहोंचतो, त्यांचें महत्त्व प्रत्येकास वाटतेंच; मात्र कोणास

कमी, कोणास जास्त वाटतें. आईबापांना अशा गोष्टींचें महत्त्व मुलांपेक्षां अधिक वाटतें. म्हणून त्यांनीं मुलांना त्यांचें महत्त्व नीट दाखवून दिलें पाहिजे. कुटुंबांतील मुख्य माणसांचें इतरांवर उत्तम वजन बसण्याची चांगली संधी सर्व माणसें ह्याप्रमाणें एकत्र जमतात तेव्हांच असते. मनुष्यांच्या मनोवृत्ति सुधारण्यास अशा प्रसंगीं चांगली संधी मिळते. आईबापांच्या आंगीं जितकी अवलोकनशक्ति, विचारशक्ति आणि अनुभव असेल त्या मानानें मुलांना त्यांच्या शिक्षणापासून फायदा होईल. वरील सर्व विवेचन प्रत्येकाच्या विचारास पटेल तर, हें उघडच ठरेल कीं, घरचीं सर्व मुलें नियमितपणानें भोजनाचे वेळीं हजर राहिलीं असतां शिक्षणासंबंधानें अति फायदा होईल. अशा प्रसंगीं मुलांना हुकूम फर्मावावयाचे नसतात; म्हणजे एकाद्या उच्च पदवीच्या मनुष्यानें कनिष्ट पदवीच्या माणसास जसें वागवावें, तसें मुलांना वागवावयाचें नसतें; जें संभाषण चालतें, त्यांत प्रत्येक मुलाचें आंग असून तसें करण्याविषयीं त्याला उत्तेजनही मिळतें; आणि आई व बाप ह्या दोघांचेंही वजन त्यांजवर फार उत्तम रीतीनें पडतें. कुटुंबांतील माणसें एकत्र जमून संभाषण चालतें तें मोठ्या विनोदाचें असतें; तेथें मजेचे विचार निघतात; अनेक कल्पनातरंग सुरू असतात. निरनिराळ्या सूचना निरनिराळ्यांकडून होत असतात; आणि ह्यामुळें विचारांचा एकच गोंधळ उडतो. इतके विलक्षण प्रकार संभाषणांत भोजनाचे प्रसंगाशिवाय इतर केव्हांही आढळत नसतील. गृहशिक्षणाचें काम उत्तम रीतीनें सुरू ठेवावयाचें म्हणजे भोजनाच्या

वेळेस मुलांनीं नियमित रीतीनें आईबापांबरोबर * हजर राहिलें पाहिजे. भोजनाचे वेळीं आईबापांस थोडीबहुत विश्रांति मिळणें अवश्य आहे, परंतु तीही ह्यामुळें नाहींशी होईल; ह्मणून कित्येकांस हा प्रकार फार त्रासदायक वाटण्याचा संभव आहे. परंतु ह्या विचारांत दुहेरी चूक घडते. कारण घरच्या मुलांमाणसांशीं संभाषण करण्यांत मेंदूला तसदी मुळींच पडत नाहीं; आणि अशा संभाषणामुळें गुप्त रीतीनें मनाचा थकवा नाहींसा होऊन तें उलट ताजेंतवानें होतें. कित्येक कुटुंबांतील व्यवस्था अशी असते कीं तेणेंकरून शिक्षण देण्याचे हे सर्वोत्कृष्ट प्रसंग व्यर्थ जातात; परंतु कित्येकांच्या व्यवस्थेमुळें ह्यांचा उत्तम उपयोग होतो. मुलांच्या भोजनांची व्यवस्था श्रीमंत लोकांनीं दायांच्या खोलींत लावून दिल्यास कित्येक बाबतींत कदाचित् सोय होईल. परंतु अशी व्यवस्था अगदीं लहान लहान मुलांपुरतीच केली पाहिजे. मोठमोठ्या लांची व्यवस्था अशीच लाविल्यास त्यांना शिक्षण देण्याची उत्तम संधी फुकट जाऊन तसें शिक्षण देण्याचें आपल्या आंगचें सामर्थ्य आईबापांनीं अगदीं व्यर्थ घालविल्याप्रमाणें होईल. मुलांना शिक्षण देण्याचें सामर्थ्य आईबापांच्या आंगीं जितकें असतें, तितकें एकाद्या दाईच्या आंगीं आढळावयाचें नाहीं. क्वचित् आढळलें तर

* आपल्याकडे लहान मुलांचें रात्रीचें जेवण आधीं आटोपून घेऊन नंतर वडील माणसांचें जेवण होण्याचा बराच प्रघात आहे. ह्यामुळें निदान रात्रीं वडील माणसांस मुलांशीं संभाषणाचा प्रसंग फार क्वचित् येतो. ( भा. क. )

तो अपवाद समजावा. दायांकडून योग्य प्रकारचें गृह-शिक्षण मिळणें बहुतेक अशक्य आहे. म्हणूनच ज्या आई-बापांस दाया वगैरे ठेवण्याची ऐपत नसते, परंतु जीं दायांपेक्षांही मुलांची व्यवस्था उत्तम प्रकारें ठेवितात, त्यांच्या मुलांस गृहशिक्षण फार चांगलें मिळालेलें आहे, असें आढळून येतें. तसेंच मुलांस गृहशिक्षण कितपत मिळालेलें आहे ह्याचा अंदाज करितांना हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, मुलांच्या रितीभातींत नुसती ठाकठीक आली म्हणजे काम झालें नाहीं; तर त्यांचे विचार सुधारून त्यांच्या स्वभावांत सुधारणा होणें हें विशेष महत्त्वाचें आहे. ह्या कामीं मुलांशीं चांगल्या रीतीनें संभाषण ठेवीत गेल्यास त्यांच्या मनावर जो परिणाम होतो, त्याची खरोखर किंमतही करितां यावयाची नाहीं. असें संभाषण ठेविलें असतां मुलांना देशांत घडलेल्या महत्त्वाच्या गोष्टींची माहिती होते; शूर पुरुषांच्या धैर्याच्या व स्वार्थत्यागाच्या ऐतिहासिक गोष्टी ऐकून त्यांच्या अंतःकरणांत स्फुरण उत्पन्न होतें; दुसऱ्याविषयीं खरी कळकळ बाळगण्याचें त्यांस शिक्षण मिळतें; आणि परोपकाराच्या कृत्यांना स्वतः हातभार लावण्याची त्यांना आस्था वाटूं लागते. सारांश, देशांत सार्वजनिक हितार्थ झटणाऱ्या लोकांची व त्यांच्या कृत्यांची मुलांस माहिती करून देऊन त्यांच्या आधारानें मुलांस जें शिक्षण देतां येण्यासारखें असेल तें देण्यास आईबापांना भोजनाच्या वेळीं चांगली संधी सांपडते. तसेंच स्वदेशांत किंवा परदेशांत घडलेल्या हरएक महत्त्वाच्या गोष्टीवरूनही मुलांना शिक्षण देतां येतें. भोजनाच्या वेळचें संभाषण म्हणजे नेहमींची वटवट

असून उपयोग नाहीं; म्हणजे भाजी तिखट झाली आहे, भात मऊ झाला आहे, भाकरी हिरवी आहे; अशाप्रकारचें तें नसावें. तर तें महत्त्वाच्या विषयांवर असावें; मग मुलांच्या वयाच्या मानानें विषय क्वचित् गहन असेल तरी एक वेळ चालेल. एकादी मौजेची गोष्ट उत्तम रीतीनें सांगणें, एकाद्या हृदयद्रावक गोष्टीचें मनाला पाझर फुटेल अशा रीतीनें वर्णन करणें; एकादी सार्वजनिक गोष्ट नीट समजावून देणें; एकाद्याच्या वर्तनक्रमाविषयीं मुद्दाम चर्चा करणें; निरनिराळ्या व्यक्तींच्या आचरणाबद्दल त्यांची उघड रीतीनें विचारपूर्वक व न्यायाला अनुसरून स्तुति किंवा निंदा करणें; इत्यादि सर्व गोष्टींचा शिक्षण देण्याच्या कामीं अति उपयोग होतो. अशा रीतीनें शिक्षण मिळालें असतां मुलांना कोणत्याही गोष्टीची खरी बाजू कळण्यास मदत होते; दुसऱ्याचें दुःख पाहून त्यांना दुःख होतें; सामाजिक बंधनें किती बिकट आहेत, तें कळूं लागतें; आणि न्यायाचें वर्तन कोणतें, अन्यायाचें कोणतें, हें ठरविण्याचें सामर्थ्य त्यांच्या आंगीं येतें. तसेंच आपल्या मुलांस आपण दिलेल्या शिक्षणाचे असे सुपरिणाम आईबापांच्या नजरेस पडले म्हणजे आपल्या श्रमांचें सार्थक्य झालें असें वाटून त्यांस समाधान होतें.

